जगद्विख्यात विनोदी अमेरिकन लेखक

# मार्क ट्वेन

## यांचें अल्पचरित्र

अनुवाद :
रंगनाथ कुळकर्णी

परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबअी ४

मूल्य अडीच रुपये

विश्वसाहित्य : २३

जगद्विख्यात विनोदी अमेरिकन लेखक

# मार्क ट्वेन

यांचें अल्पचरित्र

अनुवाद :

रंगनाथ कुळकर्णी

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबअी ४

मूल्य अडीच रुपये

१.

# क्लेमेन्स कुटुंबाचें मिसुरीस प्रयाण

खूप वर्षांपूर्वी क्लेमेन्स नांवाचें एक कुटुंब पूर्व-टेनेसी भागांतून पूर्व-मिसुरींत जाऊन राहिलें. वूल्फ नदीकांठचें त्याचें पहिलें पॉलमाल हें गाव जेवढें छोटें, अज्ञात होतें तेवढेंच त्यांचें नवें गांवहि छोटें अन् अज्ञात होते. त्याचें नांव फ्लॉरिडा. अन् ज्या छोट्या नदीच्या कांठीं तें वसलेलें होतं तिचें नांव सॉल्ट.

तो प्रवासहि खूपच दूरचा होता. कारण १८३५ च्या सुमारास दक्षिण आणि पश्चिम अमेरिकेपर्यंत कांहीं आगगाड्या पोंचल्या नव्हत्या. जॉन क्लेमेन्स अन् त्याचं कुटुंब दोन घोड्यांच्या चारचाकी गाडींतूनच प्रवासास निघालं होतं. शिवाय बरोबर दोन जादा घोडे होते. त्यांतल्या एकावर सर्वांत मोठा मुलगा ओरियन बसला होता. त्याचं वय असेल दहा एक वर्षांचं. अन् दुसऱ्या घोड्या-वर बसली होती गुलामकन्या जेनी !

घोडागाडींत आईवडलाजवळ उरलेलीं तीन मुलं होतीं—आठ वर्षांची पामेला, पांच वर्षांची मार्गारेट अन् तीन एक वर्षांचा छोटा बेंजामिन. ते दिवस होते वसंत ऋतूचे. अर्थात् या बाळालोकांना ह्या ऋतुराजाच्या वैभवाची फारशी जाणीव नसली तरी आठवड्याभराचा तो प्रवास त्यांना मोठा मजेशीर वाटला असणार खास. पश्चिमेकडील ह्या लाभदायक भूमीवर ते अशा रीतीनें येऊन ठेपले.

टेनेसींत असतांना क्लेमेन्स कुटुंब गरीब होतं. मुलांचे वडील जॉन मार्शल क्लेमेन्स हे वकील होते, चांगले सुशिक्षित गृहस्थ होते, पण तेवढेच स्वप्नाळूहि ! त्यांच्या बहुतेक योजना अपेशी ठरत ! त्यांचा जन्म व्हर्जिनियांत झाला. बालपण मात्र केन्टकींत गेलं त्यांचं. पुढें जेन लॅम्प्टनशीं त्यांचा विवाह झाला. जेन इंग्लिश घराण्यांतली असून त्या भागांत सौंदर्याविषयीं तिची ख्याति होती. केन्टकींतून ते टेनेसी प्रांतांत राहायला आले. या गांवाहून त्या गांवाला असे

ते बरेच फिरले. अन् दर वेळेला त्यांच्या वांट्याला अधिकाधिक छोटं गाव येत गेलं. जॉन क्लेमेन्सची वकिली चालत नव्हती. उत्पन्न हळूहळू इतकं कमी होत गेलं कीं, अखेरीस त्यांना एक छोटेसं दुकान घालावं लागलं. पण त्यानेहि प्राप्ति वाढली नाहीं ती नाहींच! व्हर्जिनियांतून वाडवडिलांपासून जवळ असलेल्या गुलामांपैकी आता फक्त जेनी हीच तेवढी गुलामकन्या उरली होती त्याच्यापाशीं. जेनीव्यतिरिक्त त्यांच्यापाशीं असलेली मालमत्ता म्हणजे घोडे, गाडी, अत्यंत थोडका पैसा, पूर्व-टेनेसींतली खूप मोठी पण विकतां येण्याजोगी नसलेली जमीन—हीच जमीन पुढें कधीं ना कधीं आपल्या पोराबाळांना सुखाचे दिवस दाखवील असं स्वप्न जॉन क्लेमेन्स कित्येक दिवस पाहत होता.

'गिल्डेड एज'च्या वाचकांना, हॉकिन्स कुटुंबानें टेनेसी ते मिसुरी प्रवास कसा केला तें स्मरत असेलच. अन् त्या कथेंत टेनेसींतील जमिनीला असलेलं महत्त्वहि त्याच्या ध्यानांत असेल. मार्क ट्वेननें लिहिलेली हीं प्रकरणं कपोलकल्पित ललित कथांमध्यें जमा होत असली तरी तीं वस्तुस्थितीवर आधारलेली होतीं. त्या कुटुंबाला सोसाव्या लागलेल्या अडचणी, त्यानं दिलेला झगडा याचं जें वर्णन मार्क ट्वेननं केलंय् तें मुळींच अतिशयोक्तिपूर्ण म्हणतां येणार नाहीं. हॉकिन्स कुटुंबाचं जंगी स्वागत करणाऱ्या कर्नल सेलर्सचं जे स्वभावचित्र त्यानं रंगवलं आहे तेंहि वास्तव आहे. प्रत्यक्षांत ती भूमिका जेम्स लॅम्प्टन नांवाच्या माणसानं केली होती. सौ. क्लेमेन्सचा हा भाचा सत्प्रवृत्त, उत्साही अन् नव्या नव्या योजना आंखणारा होता. इंग्लिश उमरावीचा वारस आपणच असं त्याला वाटे. अन् अवाढव्य संपत्ति अगदीं आवाक्यांत आलेलीच आहे असं सदैव त्याला भासत असे! तो मिसुरींत स्थायिक झालेलाच होता. अन् उलाढालीहि त्यानं मोठमोठ्या केल्या होत्या. अर्थात् सौ. क्लेमेन्सचा मेव्हणा जॉन क्वार्लेस् याच्याएवढी माया त्याच्यापाशीं नसेलहि कदाचित्. जॉन क्वार्लेस् हा स्वभावानं विनोदी, आशावादाची मूर्तिमंत प्रतिमा, अन् परिचयातील सर्वांनाच हवाहवासा वाटणारा होता.

जून महिन्यांतल्या एके दिवशीं सायंकाळीं क्लेमेन्स कुटुंब फ्लॉरिडांत येऊन दाखल झालं. तें गांव त्या वेळीं निःसंशय आकर्षक वाटलं त्यांना. प्रदीर्घ प्रवास संपला होता. आप्तस्वकीय मनःपूर्वक स्वागत करीत होते. भविष्य उज्ज्वल दिसत होतं! या छोट्या गांवांत जॉन क्वार्लेस्नं एक जनरल स्टोअर उघडलंच होतं. तो म्हणायचा, 'लौकरच फ्लॉरिडा हें मोठं शहर झाल्याशिवाय राहणार नाहीं.' सॉल्ट नदीवर कालवे-धरणं बांधलीं जातील अन् जहाजांची ये-जा सुरू होईल. जॉन क्लेमेन्सला त्यानं आपल्या धंद्यांत भागीदारी देऊं केली.

त्या वेळेच्या अन् गांवाच्या मानानें क्वार्लस् श्रीमंत होता. दुकानाव्यतिरिक्त त्याच्या मालकीचं एक शेत होतं अन् त्याच्यापाशीं तीस गुलाम होते. तेव्हां जॉन क्लेमेन्सपाशीं भांडवल असलं नसलं तरी त्याला तें सारखंच होतं. त्या दोघांच्या अर्धांगी बहिणीबहिणी हो या. अन् क्वार्लस्सारख्या स्वभावाच्या माणसाला तेवढं भांडवल पुरेस होतं. त्यामुळें नव्या भूमीवर जवळजवळ पाऊल ठेवतांक्षणींच जॉन क्लेमेन्सला पुन्हा एकदा व्यापारांत स्थैर्य लाभल्यासारखं वाटलं.

दुसरा प्रश्न होता घर शोधून काढण्याचा. फ्लॉरिडात एकवीस घरं होतीं. पण मोठं एकहि नव्हतं त्यात. जॉन आणि जेन क्लेमेन्स यांनीं अखेर निवडलेल्या घरात दोन मुख्य खोल्या अन् छोटसं स्वयपाकघर होत. श्रेष्ठपदाला चढलेली कुटुंबं प्रारंभीं जशा छोट्याशा घरात रहातात तसच! फ्लॉरिडामधल्या ह्या क्लेमेन्स कुटुंबाच्या लहानशा घरांत शरद् ऋतूंतल्या एका अंधाऱ्या दिवशीं—३० नोव्हेंबर १८३५ रोजीं—जें मूल जन्माला आलं त्यानच पुढें मार्क ट्वेन या नांवानं लिखाण करून थकल्या-भागलेल्या जगाला आनंदित अन् उत्साहित केलं. ह्या लहानसर अन् किरकोळ आकृतीच्या पोराच्या भावितव्याबद्दल प्रारंभीं बहुधा कुणीच फारसं चागलं बोललेलं नसावं. पितामहाचं सॅम्युएल हें नाव त्याला बहाल करण्यात आलं. त्याला लॉगहॉर्न हें एका जुन्या मित्राचें नामाभिधानहि जोडून देण्यात आलें. इवल्याशा पांथस्थाच्या खांद्यावर केवढं हें ओझं! हाक मारताना मात्र सारींजणं त्याला 'छोटा सॅम' किंवा 'सॅमी' म्हणत. साऱ्या बालपणांत मग हींच चिमुकलीं नावं त्याला चिकटली.

आज आपण जेव्हां विचार करूं लागतो तेव्हां त्याचं बालपण किती चमत्कारिक परिस्थितींत गेलं असं आपल्याला वाटतं. मिसुरी म्हणजे गुलामांचं राज्य. छोट्या सॅमला गोरे मित्र होते तसे काळेहि होते. बहुतक मुलांचे खेळगडी निग्रो होते अन् त्यांच्याविषयीं त्यांना प्रेमहि वाटे. त्यांचा काळा रंग त्यांना आवडे. ते दिसले नाहींत तर मुलाना चुकल्याचुकल्यासारखं होई. निग्रो मुलं साऱ्या गोष्टींत पटाईत होतीं. चामखीळ कसा नाहींसा करावा, दगड खरचटला तर चटकन् कशानं बरं करावं, पाऊस कसा पाडावा अन् हरवलेले पैसे कसे शोधून द्यावेत—सारं कांही निग्रो मुलाना ठाऊक होतं! अमुक दिसलं तर काय समजावं, तमुक दिसलं तर काय समजावं, स्वप्नांचा अर्थ, संकटं दूर ठेवण्याचे मार्ग अन् अनेक चित्तथरारक गोष्टी लहानमोठ्या सर्वच निग्रोना अवगत होत्या.

फ्लॉरिडांतल्या वास्तव्याच्या प्रारंभींच्या काळांत जॉन क्लेमेन्सला चांगली प्राप्ति झाली असावी. कारण त्याच्या घरांत आणखी एका गुलामाची भर पडली. त्याचं

नांव नेडकाका. नेडकाका वाटेल तें काम करी. जॉननं एक मोठं घरदेखील बांधलं. त्यांतल्या स्वयंपाकघरात शेकोटीची मोठीच सोय केलेली होती. चूलहि भली-मोठी होती अन् सरपणाला तर तोटाच नव्हता. जेवणं झाल्यावर मुलं या शेकोटी-भोवतीं जमत. जेनी अन् नेडकाकाहि येत. नेडकाका मुलाना गरिबांच्या अशा कांहीं विलक्षण गोष्टी सांगे कीं, त्याच्या अंगावर रोमाञ्च उभे राहत. निर्जन रस्ते, भुताटकी वगैरेंच्या गोष्टी ऐकून मुलें भीतीनें आणि आनंदानें थरथर कापत. ही कांहीं मोठी निकोप करमणूक नव्हती. पण त्यांतून सर्जनशील कल्पनाशक्तीची विलक्षण जोपासना झाली आणि त्यामुळेंच पुढें आपल्याला टॉम सॉयर आणि हक् फिन हीं विलक्षण व्यक्तिचित्रें लाभलीं!

फ्लॉरिडा अन् तिथली कामं यात जॉन क्लेमेन्सला समाधान वाटत नव्हतं. गांवाची विशेष वाढहि होत नव्हती. अन् जीं धरणं-कालवे बांधून सॉल्ट नदी जहाजांच्या वाहतुकीला उपयुक्त करायची योजना होती तीहि अयशस्वी ठरली. तशात १८३९ च्या ऑगस्ट महिन्यात काळ्याभोर डोळ्यांची, गुलाबी गालांची नऊ वर्षांची त्याची एक चिमुकली कन्या अचानक काळानं ओढून नेली. मग मात्र महिन्या दोन महिन्यात क्लेमेन्स कुटुंबान फ्लॉरिडाचा निरोप घेतला. सगळं सामानसुमान वॅगनमध्यें घालून ते मिसिसिपीच्या काठावरील हनिबाल गावीं आले. फ्लॉरिडापासून हें शहर तीसएक मैल असेल. आता मुलगी एकच उरली होती. पामेला. ती आता बारा वर्षांची झाली होती. मुलग्यात मात्र छोट्या हेन्रीची भर पडली होती. छोट्या सॅमपेक्षां हा तीन वर्षांनीं लहान होता. म्हणजे आतां एकूण चौघे मुलगे त्या कुटुंबांत होते.

हनिबाल हें गुलामांचें शहर असल्यानें सुस्तच होतें. तरी पण अगदीं मृतवत् नव्हतें. इथं धंदा चांगला चालेल असं जॉन क्लेमन्सला वाटलं. म्हणून त्यानं तिथं एक छोटंसं जनरल स्टोअर उघडलं. आतां ओरियन पंधरा वर्षांचा झाला असल्यानं तो दुकानात कारकुनाचं काम करूं लागला. नुसत्या वास्तव्यालाहि हें छोटं शहर मोठं आकर्षक होतं. या शहराची स्मृति मार्क ट्वेन सांगे, "उन्हाळांतल्या स्वच्छ सूर्यप्रकाशांत डुलकी घेणारं हें शुभ्र शहर...मैलभर रुंदीच्या पात्रांतून वाहणारी ती भव्य मिसिसिपी...पलीकडे दिसणारं तें घनदाट जंगल." शहराच्या पार्श्वभागीं हिरव्यागार टेकड्या होत्या. अन् नदीला लागूनच 'हॉलिडेज् हिल्' आणि 'लव्हर्स लीप' हीं ठिकाणं होतीं. पलीकडे थोड्याच अंतरावर एक गुंफा होती. ही गुंफा किती सुरेख होती तें टॉम सॉयरच्या वाचकांना चांगलं ठाऊक आहे. पलीकडे नदींतल्या त्या आनंददायक बेटावर पुढें टॉमचे चांचे एकत्र जमणार होते! अन्

नतर हक् आणि निगर जिमची ती लपण्याची जागा होणार होती.

खुद्द मिसिसिपी नदीच मोठी आकर्षक होती. बाहेरच्या जगांत घेऊन जाणाऱ्या हमरस्त्यासारखी. छोट्या होड्या प्रवाहाबरोबर जात, रंगीबेरंगी आगबोटी इकडून तिकडे दिमाखानें फेऱ्या घालीत, मालाची आणि उतारूंची देवाणघेवाण करीत. तिथल्या छोट्या झोपड्यातून निवास करणाऱ्या लोकानीं अद्याप आगगाडी अगर तारायंत्र पाहिलें नसल्यानें या आगबोटीविषयीं त्याना अखंड कुतूहल वाटत असे. हनिबाल हें शहर वस्तीला चागलें होतें. अन् छोट्या मुलांच्या विकासासाठीं तरी ती किती आकर्षक जागा होती!

मात्र छोट्या सॅमला अजून त्या बेटाची अन् गुंफेची मौज लुटतां येत नव्हती. अद्याप तो नाजुक, कल्पनेंत गुंगणारा अन् शात मुलगा होता. तो झोंपेत चालायचा. अनेकदां मध्यरात्रीं थंडीनं कुडकुडत असतांना तो एकाद्या कोपऱ्यात उभा असलेला सापडायचा. म्हातारपणीं त्याची आई त्याला एकदा म्हणाली होती, "दुसऱ्या कोणत्याहि मुलापेक्षा मला तुझी अधिक काळजी वाटायची." त्यावर तो म्हणाला, "मी जगणार नाहीं असं तुला वाटलं असावं बहुतेक!" आई मग हसून म्हणाली, "तसं नाहीं! तूं जगशील म्हणून!" ही सूक्ष्म विनोदबुद्धि हीच सॅमला आईकडून मिळालेली देणगी होय. सॅमची तिला अतिशय काळजी वाटे. ह्याच मुलाला आईच्या मायेची सर्वांत जास्त जरुरी आहे असं तिला वाटून तिचं मन त्याच्या बाबतींत हळुवार झालं होतं. ह्या पोरासाठींच ती दरसाल उन्हाळ्यात फ्लॉरिडाला येई अन् जॉन क्वार्ल्सच्या शेतावरच्या घरात राहत असे.

त्या वस्तीच्या मानानें तें शेत मोठं होतं. अन् तिथल घरहि चांगलं मोठं होतं. दोन घर शेजारीं शेजारीं अन् मध्यें छपरी रस्ता. ह्या मधल्या छपरी रस्त्यावरच उन्हाळ्याच्या दिवसांत निग्रो लोकाच्या पंगती उठत. खाद्यपदार्थांचीं भांडीं खुशाल तिथ ठेवून द्यायचीं अन् ज्यानं त्यानं येऊन आपापली पानं वाढून घ्यायचीं. शिजवलेल्या कोंबड्या, भाजलेलीं डुकरं, तुर्की कोंबड्या, बदकें, करकोचे, ताज्या हरणांचें मांस, खारी, ससे, तीतर, प्रेअरींतल्या कोंबड्या, हिरवेंगार धान्य, कलिंगडें—कोणत्याहि मुलाला आवडावे असेच हे सारे पदार्थ होते. छोट्या सॅमच्या दृष्टीनें तर ते जीवनदायी ठरले. अंगणाच्या कोपऱ्यांत मोठमोठीं झाडं होतीं. कुंपणाच्या पलीकडे टेकडीवर चढताना धान्याचं कोठार लागे, गव्हाण ओलांडलं कीं झरा दिसे! हा झरा म्हणजे गुडघाभर पाण्यांत इकडून तिकडे हिंडायचं एक अप्रतिम ठिकाण होतं.

तबिथा क्वार्ल्स् छोट्या सॅमच्याच वयाची होती. तीं दोघं एकमेकांशीं खेळत.

नांव नेडकाका. नेडकाका वाटेल तें काम करी. जॉननं एक मोठं घरदेखील बांधलं. त्यांतल्या स्वयंपाकघरांत शेकोटीची मोठीच सोय केलेली होती. चूलहि भली-मोठी होती अन् सरपणाला तर तोटाच नव्हता. जेवणं झाल्यावर मुलं या शेकोटी-भोंवतीं जमत. जेनी अन् नेडकाकाहि येत. नेडकाका मुलांना गरिब्रांच्या अशा कांहीं विलक्षण गोष्टी सांगे कीं, त्यांच्या अंगावर रोमाच उभे राहत. निर्जन रस्ते, भुताटकी वगैरेंच्या गोष्टी ऐकून मुलें भीतीनें आणि आनंदानें थरथर कांपत. ही कांहीं मोठी निकोप करमणूक नव्हती. पण त्यांतून सर्जनशील कल्पनाशक्तीची विलक्षण जोपासना झाली आणि त्यामुळेंच पुढें आपल्याला टॉम सॉयर आणि हक् फिन हीं विलक्षण व्यक्तिचित्रें लाभलीं!

फ्लॉरिडा अन् तिथलीं कामं यांत जॉन क्लेमेन्सला समाधान वाटत नव्हतं. गांवाची विशेष वाढहि होत नव्हती. अन् जीं धरणं-कालवे बांधून सॉल्ट नदी जहाजांच्या वाहतुकीला उपयुक्त करायची योजना होती तीहि अयशस्वी ठरली. तशात १८३९ च्या ऑगस्ट महिन्यांत काळ्याभोर डोळ्याची, गुलाबी गालांची नऊ वर्षांची त्याची एक चिमुकली कन्या अचानक काळानं ओढून नेली. मग मात्र महिन्या दोन महिन्यांत क्लेमेन्स कुटुंबानं फ्लॉरिडाचा निरोप घेतला. सगळं सामानसुमान वॅगनमध्यें घालून ते मिसिसिपीच्या काठावरील हनिबाल गांवीं आले. फ्लॉरिडापासून हें शहर तीसएक मैल असेल. आतां मुलगी एकच उरली होती. पामेला. ती आतां बारा वर्षांची झाली होती. मुलग्यांत मात्र छोट्या हेन्रीची भर पडली होती. छोट्या सॅमपेक्षां हा तीन वर्षांनीं लहान होता. म्हणजे आतां एकूण चौघे मुलगे त्या कुटुंबांत होते.

हनिबाल हें गुलामांचें शहर असल्यानें सुस्तच होतें. तरी पण अगदीं मृतवत् नव्हतें. इथं धंदा चांगला चालेल असं जॉन क्लेमन्सला वाटलं. म्हणून त्यानं तिथं एक छोटंसं जनरल स्टोअर उघडलं. आतां ओरियन पंधरा वर्षांचा झाला असल्यानं तो दुकानांत कारकुनाचं काम करूं लागला. नुसत्या वास्तव्यालाहि हें छोटं शहर मोठं आकर्षक होतं. या शहराची स्मृति मार्क ट्वेन सांगे, "उन्हाळांतल्या स्वच्छ सूर्यप्रकाशांत डुलकी घेणारं हें शुभ्र शहर...मैलभर रुंदीच्या पात्रांतून वाहणारी ती भव्य मिसिसिपी...पलीकडे दिसणारं तें घनदाट जंगल." शहराच्या पार्श्वभागीं हिरव्यागार टेकड्या होत्या. अन् नदीला लागूनच 'हॉलिडेज् हिल्' आणि 'लव्हर्स लीप' हीं ठिकाणं होतीं. पलीकडे थोड्याच अंतरावर एक गुंफा होती. ही गुंफा किती सुरेख होती तें टॉम सॉयरच्या वाचकांना चांगलं ठाऊक आहे. पलीकडे नदींतल्या त्या आनंददायक बेटावर पुढें टॉमचे चांचे एकत्र जमणार होते! अन्

नंतर हक् आणि निगर जिमची ती लपण्याची जागा होणार होती.

खुद्द मिसिसिपी नदीच मोठी आकर्षक होती. बाहेरच्या जगांत घेऊन जाणाऱ्या हमरस्त्यासारखी. छोट्या होड्या प्रवाहाबरोबर जात, रंगीबेरंगी आगबोटी इकडून तिकडे दिमाखानें फेऱ्या घालीत, मालाची आणि उतारूंची देवाणघेवाण करीत. तिथल्या छोट्या झोपड्यांतून निवास करणाऱ्या लोकांनीं अद्याप आगगाडी अगर तारायंत्र पाहिलें नसल्यानें या आगबोटींविषयीं त्यांना अखंड कुतूहल वाटत असे. हनिबाल हें शहर वस्तीला चागलें होतें. अन् छोट्या मुलांच्या विकासासाठीं तरी ती किती आकर्षक जागा होती !

मात्र छोट्या सॅमला अजून त्या बेटाची अन् गुंफेची मौज लुटतां येत नव्हती. अद्याप तो नाजुक, कल्पनेंत गुंगणारा अन् शांत मुलगा होता. तो झोपेंत चालायचा. अनेकदां मध्यरात्रीं थंडीनं कुडकुडत असतांना तो एकाद्या कोपऱ्यांत उभा असलेला सांपडायचा. म्हातारपणीं त्याची आई त्याला एकदां म्हणाली होती, "दुसऱ्या कोणत्याहि मुलापेक्षां मला तुझी अधिक काळजी वाटायची." त्यावर तो म्हणाला, "मी जगणार नाहीं असं तुला वाटलं असावं बहुतेक !" आई मग हसून म्हणाली, "तसं नाहीं ! तूं जगशील म्हणून !" ही सूक्ष्म विनोदबुद्धि हीच सॅमला आईकडून मिळालेली देणगी होय. सॅमची तिला अतिशय काळजी वाटे. ह्याच मुलाला आईच्या मायेची सर्वांत जास्त जरुरी आहे असं तिला वाटून तिचं मन त्याच्या बाबतींत हळुवार झालं होतं. ह्या पोरासाठींच ती दरसाल उन्हाळ्यात फ्लॉरिडाला येई अन् जॉन क्वार्ल्स्च्या शेतावरच्या घरांत राहत असे.

त्या वस्तीच्या मानानें तें शेत मोठं होतं. अन् तिथलं घरहि चांगलं मोठं होतं. दोन घरं शेजारीं शेजारीं अन् मध्यें छपरी रस्ता. ह्या मधल्या छपरी रस्त्यावरच उन्हाळ्याच्या दिवसांत निग्रो लोकांच्या पंगती उठत. खाद्यपदार्थांचीं भांडीं खुशाल तिथं ठेवून द्यायचीं अन् ज्यानं त्यानं येऊन आपापलीं पानं वाढून घ्यायचीं. शिजवलेल्या कोंबड्या, भाजलेलीं डुकरं, तुर्की कोंबड्या, बदकें, करकोचे, ताज्या हरणांचें मांस, खारी, ससे, तीतर, प्रेअरींतल्या कोंबड्या, हिरवेंगार धान्य, कलिंगडें—कोणत्याहि मुलाला आवडावे असेच हे सारे पदार्थ होते. छोट्या सॅमच्या दृष्टीनें तर ते जीवनदायी ठरले. अंगणाच्या कोपऱ्यांत मोठमोठीं झाडं होतीं. कुंपणाच्या पलीकडे टेकडीवर चढताना धान्याचं कोठार लागे, गव्हाण ओलांडलं कीं झरा दिसे ! हा झरा म्हणजे गुडघाभर पाण्यांत इकडून तिकडे हिंडायचं एक अप्रतिम ठिकाण होतं.

तबिथा क्वार्ल्स् छोट्या सॅमच्याच वयाची होती. तीं दोघं एकमेकांशीं खेळत.

तबिथाला सारीं जणं म्हणत 'पस!' सॅमची दुसरी खेळगडी मेरी. ही गुलाम-कन्या त्याच्याहून सहा वर्षांनीं मोठी होती. मुलांनीं कांहीं खोड्या करूं नये म्हणून तिला देखरेख करायला ठेवलं होतं. कुरणांतल्या झाडांना झोके बांधले होते. अन् ह्या मुलांचे पाय फांद्यांना लागेपर्यंत मेरी त्यांना झोके देई. आजूबाजूच्या वृक्ष-राजीवर रंगीबेरंगी फुलपांखरें असत. जंगली करवंदाच्या जाळीचें कुंपण त्या कुरणाला घातलेलें होतें. झाडांतून चंडोल पक्षाचें सुस्वर गायन कानांवर येई. सफरचंद, पीच आदि फळें झाडांवर दिसत अन् शेतांतल्या धान्यांत अनेक खरबुजें पिकत. टरबुजांच्या प्रकरणांत एकदा सॅमला चांगलाच फटका बसला. बिनपिकलेल्या टरबुजाच्या खूप फोडी त्यानं खाल्ल्या. अन् थोड्याच वेळांत त्याला अशा कांहीं आंकड्या येऊं लागल्या कीं, घरांतल्या लोकांच्या तोंडचं पाणीच पळालं. अनेकांना वाटलं, आतां हा कांहीं जगत नाहीं. पण त्याची आई म्हणाली, "सॅमी बरा होईल. अशा रीतीनं मरण्यासाठीं कांहीं तो जन्माला आलेला नाहीं." सॅमी म्हणजे एक चमत्कारिक पोर आहे असंच सर्वांना वाटे. कधीं कधीं स्वप्नाळू अन् शांत असे तर मधूनच माथें भडकून आरडाओरडा करीत एकाएकीं थयथय नाचूं लागे, हवेंत वेडेवाकडे हातवारे करी अन् खदखदां हसून जमिनीवर कोसळे किंवा गवतांत गडबडा लोळूं लागे!

जॉनकाकाच्या शेतावरचीं निग्रोंचीं घरं हें एक विशेष आकर्षण होतं. एका खोलींत बिछान्याला खिळून असलेली एक म्हातारी हजार वर्षांची असून ती खुद्द 'मोझेस'शींहि बोलून आलेली आहे असं सांगत. ती भुतांना पळवून लावी अन् मंत्रांच्या मदतीनें जादू नष्ट करून टाकी. दुसरं आवडतं माणूस म्हणजे डॅनियलकाका. हा अत्यत मायाळू अन् सरळ अंतःकरणाचा माणूस पुढें टॉम सॉयर आणि हकलबेरी फिनच्या गोष्टींतल्या निगर जिमसारखा सबंध जगाचं प्रेम अन् सहानुभूति मिळवूं शकेल—असा होता.

अशा ह्या मायेच्या आवरणाखालच्या रमणीय काळांत सॅम हसत खिदळत, स्वप्नें पाहत वाढत होता. बालपणींच्या त्या काळांत दर उन्हाळ्यांत तो ह्या शेतावर येई. कडक हिंवाळा सुरू होऊन मुलें घरांतल्या त्या मोठ्या, धगधगत्या शेकोटी-पाशीं जमायला लागेपर्यंत त्याची आई त्याला तिथं राहूं देई. साठ वर्षांनंतर त्यानं लिहिलंय्: "ती खोली अजून माझ्या डोळ्यांसमोर जशीच्या तशी उभी राहते. तिथल्या सर्व वस्तु, एकूण एक तपशील मी अजून सांगूं शकेन. एका कोपऱ्यांत गुंडाळून ठेवलेला बिछाना, दुसऱ्या कोपऱ्यांतला तो चरखा, त्याच्या चाकाचा तो कुरकुर आवाज दुरूनहि स्पष्ट ऐकूं येई. तो आवाज मला दुसऱ्या कोणत्याहि

आवाजापेक्षां अधिक दुःखदायक वाटे अन् एकदम मला घराची आठवण येई. गळून-थकून गेल्यासारखं वाटे. मेलेल्या माणसांचीं भुतं माझ्या अंवतींभंवतींच्या वातावरणांत फिरताहेत असं वाटायला लागे. ती भली मोठी शेकोटी, तिच्यांत धगधगणारे ते लाकडी ओंडक्यांचे ढीग, त्या लाकडांतून बुडबुड्यासारखा बाहेर येणारा साखरेचा रस—हा रस आम्ही वायां जाऊं देत नसूं—खरवडून काढून खात असूं!...चुलाण्याच्या ओबडधोबड दगडावर तें आळशी मांजर अंग ताणून देत असे. दाराच्या चौकटीला पेंगुळलेली कुत्रीं हातपाय लांब करून पाठ घांशीत घांशीत डोळे मिचकावीत असत. धुराड्याखालच्या कोपऱ्यांत माझी मावशी बसे अन् दुसऱ्या कोपऱ्यांत माझा चुलता पाईप ओढीत बसलेला असायचा!"



२.

## शिक्षण : शाळेंतलें व बाहेरचें

पहिल्याच उन्हाळ्यांत हनिबालहून परत आल्याबरोबर जेन क्लेमेन्सनं सॅमला शाळेंत घालायचं ठरवल. तेव्हां तो पांच वर्षांचा झाला होता अन् 'व्रात्य पोरटा' म्हणून एव्हानाच त्यानं नांव मिळवलं होतं. "तो घरांत असला कीं त्याच्या खोड्यांनीं मला वेड लागायची पाळी येते—" त्याची आई म्हणायची, "अन् तो घराबाहेर गेला कीं, दर मिनिटाला मला वाटायचं— याला आतां कुणी तरी अर्धमेल्या अवस्थेंत घरीं आणून सोडील." टॉम 'सॉयर' ह्या कथेंतील ऑट पॉली हें स्वभावचित्र मार्क ट्वेननं आपल्या आईच्या व्यक्तिचित्रावरूनच रेखाटलेलं आहे. स्पष्टवक्ती, हजरजबाबी, उदारधी अशा ह्या स्त्रीची ओळख करून घ्यावीशी कुणाला वाटणार नाहीं? मुलांशीं मात्र ती वेळप्रसंगीं कठोरपणें वागूं शकत असे. अन् त्याचे दोषहि तिच्या ध्यानीं येत. छोट्या सॅमचा कल प्रत्येक वेळीं अतिशयोक्ति करण्याकडे असे. तिचा शेजारी एकदां तिला म्हणाला, "मला वाटतं, ह्या पोराच्या बोलण्यावर बहुतेक वेळां तुम्ही विश्वास ठेवीत नसाल." ती म्हणे, "अर्थातच.—त्यांतलं किती बाद घालायच असतं तें मला चांगलं ठाऊक आहे. नव्वद टक्के मी वजा करतें. पण मग ठरतं तें मात्र शंभर नंबरी सोनं असतं." दिवसांतला थोडा वेळ तरी आपल्यापासून त्याला कुणी तरी दूर नेऊन 'रीतिरिवाज' शिकवायला तयार असेल तर त्याला आपण मेहनताना देऊं असं तिनं सर्वांना सांगून टाकलं. ह्या कामासाठीं कोणी एक श्रीमती ई. होर नांवाची स्त्री निवडण्यांत आली.

हनिबालच्या मेन स्ट्रीटवरची श्रीमती होर यांची शाळा जुन्या वळणाची होती. सर्व वयाचे विद्यार्थी तींत होते अन् तिसऱ्या रीडरपर्यंत आणि पांच आंकडी भागाकारापर्यंत तिथं सारं कांहीं शिकवलं जाई. दर विद्यार्थ्यामागें श्रीमती होर यांना आठवड्याला पंचवीस सेंट मिळत. आदर्श वागणुकीच्या नियमांचं वाचन

रोज होत असे. अगदीं पहिल्या दिवशींच छोट्या सॅमला ह्या नियमांची गंमत वाटली. हे नियम मोडून आपण सुटून जाऊं शकूं अशी त्याची जवळजवळ खात्रीच झाली होती. सकाळच्याच तासांत त्यानं तसे प्रयोग केले अन् त्याला इशारा देण्यांत आला. आपण पुन्हां पकडले जाणार नाहीं असं त्याला वाटलं होतं. पण जेव्हां त्याला शिक्षा होईल असं मुळींच वाटल नव्हतं तेव्हांच नेमका पकडला गेल्यामुळें तो आश्चर्यचकित झाला. त्याला शिक्षा करण्यासाठीं एक छडी बाहेर जाऊन घेऊन येण्याची त्यालाच आज्ञा झाली. अशा कामासाठीं छड्या कशा निवडतात हें त्याला मुळींच ठाऊक नव्हतं; जेन क्लेमेन्स नेहमीं हाताचाच वापर करी. तो गोंधळला. पण तेवढ्यांत परत एकदां आज्ञा झाली व मग त्यानें योग्य दिशेनें पावलें टाकलीं. मिसुरीच्या जंगलांतून तो एकादी छडी निवडून आणूं शकला असता. पण त्या फार मोठ्या अन् उपयुक्त होत्या. रस्ता ओलांडला कीं समोरच पिपे तयार करणाऱ्याचें दुकान होतें. दुकानाबाहेर ढलप्या पडलेल्याच होत्या, त्यांतली एक उडून याच्यापुढें येऊन पडली. त्यानं ती ढलपी उचलली अन् मोठ्या गंभीरपणें वर्गात येऊन ती होरबाईच्या हातांत दिली. पुढें ज्या विनोदानें छोट्या सॅमला ख्यातनाम केलें त्या विनोदाचा उपलब्ध असा हा पहिला दाखला.

मात्र येथें विनोद निष्प्रभ ठरला. श्रीमती होर यांच्या विनोदबुद्धीनें कदाचित् त्याला क्षमा केली असती; पण शिस्तहि ठेवायलाच हवी होती. त्या म्हणाल्या, "सॅम्युएल लँगहॉर्न क्लेमेन्स, (असल्या अनिष्टसूचक पद्धतीनं आपलं हें सारं नांव त्यानं यापूर्वी कधींच ऐकलं नव्हतं.) मला तुझी लाज वाटते! जिमी डनलॅप जा अन् ह्या सॅमीसाठीं एक छडी घेऊन ये पाहूं."—आणि जिमी डनलॅपनं आणलेली छडी छोट्या सॅमला शाळेबद्दल कायमचा तिरस्कार वाटायला लावणारी होती. आपल्याला शिक्षणाची मुळींच पर्वा नाहीं, असं त्यानं दुपारींच आईला सांगून टाकलं. तो म्हणाला, "मला नाहीं 'मोठा माणूस' व्हायचं." रेड इंडियन व्हावं अन् होरबाईसारख्या माणसांच्या डोक्याचीं सालडीं काढावींत, असं त्याला त्या वेळीं वाटलं.

छोटा सॅम पुन्हां शाळेंत गेला, पण शाळेबद्दलचं प्रेम तो कधींच शिकला नाहीं. पुन्हां वसंत ऋतूचे दिवस आले, वर्गात बसल्या जागेवरूनच बाहेर हिरव्यागार टेकडीवर पसरलेला स्वच्छ सूर्यप्रकाश त्याला दिसूं लागला, नदीच्या पाण्यावरची चकाकी अन् त्यापलीकडची आकाशांतली अंजिरी पोकळी त्यानं पाहिली कीं त्याला वाटे अशा वेळीं वेब्स्टरचं स्पेलिंगचं पुस्तक अन् तिरसट पंतोजीसह चार

भिंतींत कोंडून घेणं माणसाच्या सहनशक्तीच्या पलीकडचं आहे. इतकं असूनहि तो थोडंफार शिकला असला पाहिजे. कारण आतां त्याला वाचायला येऊं लागलं होतं, अन् त्याच्या वयाच्या मानानं त्याचं स्पेलिंगहि चांगलं होतं.

१८३९ मध्यें हनिबालला येऊन दाखल झाल्यावर क्लेमेन्स कुटुंब त्या वेळच्या पॅव्ही हॉटेलच्या भागांत राहायला गेलं होतं. पुढील काहीं वर्षांत त्यांनीं दोनदां बिऱ्हाड बदललं; आणि १८४४ साली जज्ज क्लेमेन्स—होय, याच नांवानं त्याला सारे ओळखीत असत—हिल स्ट्रीटवर बांधलेल्या घरांत राहायला गेले. हें घर अजून आहे अन् 'मार्क ट्वेनचं घर' म्हणून प्रसिद्ध आहे.

हनिबालमधील वास्तव्यात जॉन क्लेमेन्सनं अनेक भलेबुरे पावसाळे पाहिले. 'जस्टिस् ऑफ पीस' ह्या पदावर त्याची नियुक्ति झाल्यावर त्यांना जरा बरी प्राप्ति होत असे, पण धंद्यात त्याना एवढा तोटा आला कीं, अखेरीस त्यांना गुलामकन्या जेनी हिला विकून टाकणें भाग पडलें. कालांतरानें त्यांना धंद्यात पूर्ण अपयश आलें. गाई अन् फर्निचरसकट सारं सारं त्यांनीं सावकारांना देऊन टाकलं आणि केवळ वकिलीवर अन् 'जस्टिस फी' वर ते गुजराण करूं लागले. त्यानीं कशी तरी टेनेसीलगतची जमीन तेवढी सांभाळलेली दिसते. तिच्यासंबंधीं त्याच्या सावकाराच्या मनात कधीं विचारदेखील आलेला दिसत नाहीं. त्यांनीं स्वतः मात्र शेवटपर्यंत या जमिनीवरची आपली श्रद्धा ढळूं दिली नव्हती. कांहीं काळपर्यंत जीवन बिकट होऊन बसलें. ओरियन आतां सतरा वर्षांचा झाला होता. मुद्रणव्यवसायांत त्यानं प्रवेशहि मिळवला होता. अन् आपल्या कमाईतून तो कुटुंबाला मदतहि करीत होता. त्याची आई घरींच कांहीं माणसांना स्वयंपाक करून जेवायला घाली व राहायला जागा देई. अशा ह्या आपत्काळांतच छोटा बेंजामिन वारला. त्या वेळीं तो दहा वर्षांचा होता. क्लेमेन्स कुटुंबावरील विपत्तीनें परिसीमा गांठली होती.

मग परिस्थिति हळूहळू सुधारूं लागली. वकिली बरी चालूं लागली अन् 'जस्टिस फी'चें उत्पन्नहि वाढलें. १८४४ मध्यें जज्ज क्लेमेन्स, वर सांगितलेलं घर बांधूं शकले. तें एक साधंसुधं, स्वस्त बांधणीचं घर असलं तरी तो निवारा होता, तें त्यांचं स्वतःचं घर होतं.

या वेळीं सॅमचं वय नऊ होतं. आतां त्याचं बालपण सुरू झालं होतं. आतांपर्यंत तें एक पोर होतं—चिडखोर, खोडकर, बहुधा त्रास देणारं, एक इवलंसं नाजुक बाळ! ज्याची काळजी घ्यावी, आईनं ज्याचं संगोपन करावं किंवा हळूच ढुंगणावर चापट मारून बिछान्यावर झोपवून द्यावं—असं! आतां नवव्या वर्षी त्याची प्रकृति जरा सुधारली होती; स्वतःची काळजी घेण्याची कुवत त्याच्यांत

आली होती. ते सारे म्हणत, "सॅम, आतां मोठा झाला." अन् नवव्या वर्षाच्या मानानं त्याला अक्कलहि जास्तच आली होती. तशी त्याची वृत्ति किंवा वागण्याची पद्धत पोक्त होती अशांतला भाग नाहीं. पण शाळेंत न शिकवल्या जाणाऱ्या अनेक गोष्टी तो शिकला होता, एवढं खरं. निसर्गांतलं अन् वनस्पतिशास्त्रांतलं तो बरंच कांहीं शिकला होता. बालपणींच्या ह्या अभ्यासाचा पुरावा आपल्याला मार्क ट्वेनच्या लिखाणांत आढळतो. त्याच्या लिखाणांतील झुडुपं, ढेकूण किंवा इतर प्राणी वर्तणुकींत कधींहि चूक करतांना सांपडत नाहींत. माणसांबद्दलहि तो पुष्कळच शिकत होता. अन् बहुधा तें फारसें आनंददायक नसे.

एकदां 'मेन स्ट्रीट'वर भर दुपारीं एका वृद्ध माणसाला गोळी घालून मारतांना त्यानं पाह्यलं. त्याला घरीं नेलं, बिछान्यावर झोपवलं, घरांतलं बायबलचं पुस्तक उघडून त्याच्या छातीवर ठेवण्यांत आलं—तें ऐरणीइतकं जड वाटत होतं, हें सारं सॅमनं पाह्यलं. परदेशांतून आलेल्या एका तरुणाच्या छातींत दारुड्या दोस्तानं खंजीर खुपसलेला त्यानं पाह्यला. दोघां तरुणानीं आपल्या चुलत्याचा खून करायचा प्रयत्न कसा केला, एकानं त्याला धरून ठेवून दुसऱ्यानं वारंवार पिस्तूल झाडलं, पण व्यर्थ—हें सारं सॅमनं पाह्यलं होतं.

एका वेलशमनच्या घरावर हल्ला करण्याचा प्रयत्न दारुबाज दंगलखोर पुंडानें केला, तेव्हांची ती मनस्वी उकाडा होत असलेली भीतिदायक संध्याकाळ. जॉन ब्रिग्ज नांवाच्या आनंदी साथीदारासह तो सुरक्षित अंतरावरून त्या जमावाच्या पाठोपाठ गेला होता. आपल्या मुलीला घेऊन एक विधवा तिथं राहत होती. आपल्याजवळ भरलेली बंदूक आहे असा इशारा त्या बाईनं त्या अगांतुकांना दिलेला ह्या मुलांनीं ऐकला. 'जर का इथं थांबाल तर गोळीं झाडीन,' असं ती स्वच्छ म्हणाली होती. प्रत्युत्तरादाखल त्यानं शिव्यांची लाखोली वाहिली. मग तिनं त्याला स्वच्छ सांगितलं, "मी दहा अंक मोजतें आणि त्यानंतर एक सेकंदभरहि तूं इथं थांबलास तर मी बंदुकीचा चाप ओढीन." तिनें संथपणें अंक मोजायला प्रारंभ केला. पांच अंक मोजीपर्यंत तो थट्टेनें हसतच होता. सहाव्या अंकाला तो स्तब्ध झाला, पण तेथून गेला नाहीं. ती मोजीतच होती—सात, आठ, नऊ. नंतर बराच वेळ स्तब्धता. मग दहावा अंक तिनं मोजला अन् क्षणमात्र थांबून तिनं गोळ्या झाडल्या. त्या माणसाच्या छातीची चाळण झाली. त्याच क्षणीं बाहेर जमून आलेल्या ढगांत वादळाचा गडगडाट झाला. ह्या मुलांनीं धूम ठोकली. त्यांना वाटलं, हरवलेला आत्मा हस्तगत करण्यासाठीं खुद्द सैतान येऊन ठेपला आहे.

हनिबालसारख्या गांवांत असल्या घटनांची उणीव नव्हती. शिवाय गुलाम-

गिरीच्या संदर्भांतल्या घटनाहि तिथं घडत. एकदां तर किरकोळ चुकीसाठीं एका गुलामाला लोखंडी पट्टीनें ठार केल्याचें दृश्य सॅमनें पाहिलें. गुलामगिरीचा कायदा रद्द करा, असें म्हणणाऱ्या एका इसमाला जमावानें ठेंचून मारलें असतें. परंतु 'तो वेडा असावा' अशी रदबदली करून एका मेथॉडिस्ट पाऱ्यानें मध्यें पडून त्याला वांचविलें. मार्क ट्वेनच्या पुस्तकांच्या—विशेषतः हक् आणि टॉमच्या कथांच्या—वाचकांना ह्या घटना ऐकून फारसें आश्चर्य वाटणार नाहीं. कारण ह्या ग्रंथकाराच्या बालपणींच्या शिक्षणाचा बराच मोठा भाग ह्या असल्या घटनांनींच व्यापलेला होता. अर्थात्, निदान त्या वेळीं तरी सॅम ह्या घटनांना 'शिक्षण' मानीत नव्हता. चांगल्या जीवनाची आवड आपल्यांत निर्माण व्हावी म्हणून मिळालेले हे इशारे किंवा ह्या शिक्षा आहेत, असें तो समजत असे.

ही त्याच्या आईची कल्पना होती. आणि अशा बाबतींत आईचं मत तो शिरोधार्य मानीत असे. एकदां काय झालं, गांवांत ज्याला सारेजण टरकून असत अशा एका कॉर्सिकन माणसाला सॅमच्या आईनं रोखलं होतं. एक मोठा दोरखंड घेऊन तो आपल्या प्रौढ मुलीच्या मागें लागला होता. तिच्या अंगावर तडाखे ओढून तिचे तुकडे करतों, असें तो ओरडत होता. अशा स्थितींत जेन क्लेमेन्सनं दार उघडून त्या पळणाऱ्या पोरीला आश्रय दिला आणि दोन्ही हात पसरून ती दार रोखून उभी राहिली. तो माणूस तोंडाला येईल तें बडबडला. त्यानं हातांतल्या दोरखंडाचाहि तिला धाक घातला, पण भीतीचं एवढंसंहि चिन्ह तिनं दाखवलं नाहीं. ती तिथंच उभी राहिली. अखेरीस लज्जित होऊन तो तिथून गुपचुप निघून गेला. बऱ्याच उंचीवरून कोसळल्यासारखा, पुरेपूर जिंकला गेल्यासारखा. सॅमला वाटे, 'आपल्या आईइतका शूर जो कोणी असेल त्याचं अंतःकरण अगदीं शुद्ध असलं पाहिजे. अन् त्याचं जतन कसं करावं हेंहि त्याला ठाऊक असलं पाहिजे.' अंधारांत तो प्रार्थना म्हणे, आणि विशेषतः वादळांतला गडगडाट होऊं लागला म्हणजे तर तो अधिक चांगल्या जीवनास प्रारंभ करण्याची प्रतिज्ञा करी.

सॅमच्या बालपणांतले सारेच दिवस काहीं अशा भयंकर घटनानीं काळवंडले होते असें नाहीं. बहुधा तर ते किती तरी आनंददायक घटनांनींच भरलेले होते. कधींकधीं सहली निघत, कधीं होड्यांतून जलविहार होई, अन् कोणत्याहि दिवशीं जंगलांत भटकावें, मासे पकडावे—मग कुणी बरोबर असो अगर नसो. आश्चर्यकारक गोष्टींनीं भरलेली गुहा होतीच. शिवाय 'बिअर' खाडीहि होती—तिथंच तो पोहायला शिकला. दोन खेळगडी बुडालेले त्यानं पाहिले, त्याला स्वतःला दोनदां मरणोन्मुख स्थितींत ओढून किनाऱ्यावर आणावं लागलेल

होतं—एकदां एका गुलामकन्येनं अन् दुसऱ्यांदा पॅव्हे हॉटेल भागांतल्या नील क्लॅम्प या गुलामानं. पण त्यानं चिकाटीनं प्रयत्न चालू ठेवले अन् अखेरीस यश मिळवलं. त्याच्या वयाच्या कुणाहि खेळगड्यापेक्षा तो अधिक चांगलं पोहूं शकत होता. त्याला सर्वांत जास्त आवडायची नदी. बाहेरच्या विशाल जगांत नेणारा तो मार्ग होता. तासन्तास तो नदीकाठीं बसून स्वप्नें पाही. तिच्या सर्व अवस्था व लहरी जाणून घेण्यास तो शिकला होता.

नदींतून नेहमीं ये-जा करणाऱ्या मोठ्या, चपळ आगबोटींवरून एकदां प्रवास करण्याची आंस त्याला जगांतल्या दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीपेक्षा अधिक लागली होती. याबद्दल पुढें तो एकदां म्हणाला होता, “सतत डोळ्यांसमोर येणाऱ्या-जाणाऱ्या त्या बोटी पाहायच्या अन् एकदांहि त्यावरून प्रवास करायला मिळूं नये या गोष्टीचं दुःख त्या काळांत लहान मुलाला किती होत असेल याची तुम्हांला कल्पना येणार नाहीं.” आतां यापुढं आपल्याला हें सहन होणार नाहीं असं नवव्या वर्षी त्याला कळून चुकलं. एके दिवशीं एक मोठी टपाल-बोट हनिबाल येथें थांबतांच तो बोटींत गुपचुप घुसला आणि वरच्या डेकवरील एका छोट्या होडीखालीं लपून बसला. मग इशाऱ्याचे भोंगे वाजले, बोट सुरू झाली आणि मुख्य प्रवाहांत येऊन ठेपली—म्हणजे खरोखरच त्याचा बोटीचा प्रवास सुरू झाला होता. होडीखालून बाहेर येऊन तो पाण्याकडे पाहत बसला. अशा रीतीनें तो त्या विलोभनीय देखाव्यांची मौज लुटीत असतांनाच पाऊस पडूं लागला—अगदीं धुंवाधार. पुन्हा तो होडीखालीं लपून बसला. पण त्याचे पाय बाहेरच राहिले. बोटीवरल्या नोकरांपैकीं एकानें त्याला पाहिलें. लगेच त्याला ओढून बाहेर काढण्यांत आलें आणि पुढल्याच मुक्कामाला किनाऱ्यावर उतरवून देण्यांत आलें. तें लुइझिआनामधलं एक गांव होतं. तिथें लॅम्प्टन नामक त्याचे कुणी आप्तेष्ट होते. त्यांनीं त्याला घरीं नेलें. त्यानंतर स्वगृहीं पुनरागमन त्याला कांहीं फारसें सुखाचें झालें नसणार. पण सामान्य शिक्षणांत त्याला आणखी एक ‘धडा’ मिळाला होता खास.

यानंतरहि दरसाल उन्हाळ्यांत तो मळ्यांत जाई. आतां केवळ मुलींचे खेळ आणि झोके यांत तो रमत नसे. ती कृष्णकाय दाई सतत त्याच्यामागें असे. त्याचे मोठे चुलतभाऊ मोठ्या माणसांबरोबर दिवसा कवड्यांच्या आणि रात्रीं कून आणि पॉसम नामक प्राण्यांच्या शिकारीसाठीं फिरत—त्यांच्याशीं तो खेळत असे. कधीं कधीं हा छोटा पोर रात्रभर त्या शिकाऱ्यांमागें फिरे. अन् प्रातःकाळच्या त्या तेजोमय आणि सुगंधित वातावरणांत विजयी व भुकेलेल्या अवस्थेंत नेमका न्याहरीच्या वेळीं घरीं परते. त्याच्या शिक्षणापैकीं कांहीं बाबतींत—उदा. : धूम्रपान

व ग्राम्य भाषा—संशयाला जागा असल्यास आश्चर्य नाहीं. 'टॉम सॉयर' सारख्या पुस्तकांत ह्या बाबतींतील त्याचे अनुभवहि लक्षांत घेण्यासारखे असल्याचें दिसून येतें.

सॅम क्लेमेन्स हा कांहीं विशेष आकर्षक मुलगा नव्हता. तसा त्याचा बांधा लहानसरच होता आणि त्याचं डोकं तर शरिराच्या मानानं वाजवीपेक्षां मोठं वाटे. त्याच्या डोक्यावर हलका व पिंगट केशभार होता. केस कुरळे होऊं नयेत म्हणून ते तो चिकटवून ठेवीत असे. त्याचे डोळे तीक्ष्ण आणि निळे होते. त्याचा चेहरा जरासा पसरट होता. त्याच्या नाजुक त्वचेचा वर्ण उजळ आणि त्याची वर्तणूक सौम्य अन् खेंचक होती. सुहास्यवदन आणि संथपणें बोलण्याची ढब यामुळें तो मित्रमंडळींना अतिशय आवडत असे. तो फारसें बोलत नसे. बहुतेकांना वाटे तो मठ्ठ असावा. मात्र कोणत्या कां कारणानें असेना, जेव्हां तो बोले तेव्हां त्याचे सारे खेळगडी हातांतलें सगळें काम टाकून त्याचें बोलणें ऐकत असत. कधीं एकादी नव्या खेळाची योजना असे किंवा दुसरीच एकादी गंमत असे. कधीं कधीं तर त्याचें एकादें साधें विधान देखील त्याच्या त्या हेल काढून हळूहळू बोलण्याच्या पद्धतीमुळें मनोरंजक वाटे. त्याच्या ह्या हळूहळू बोलण्याच्या पद्धतीचा उल्लेख त्याची आई 'सॅमचें प्रदीर्घ भाषण' असाच सदैव करीत असे. तीन वर्षांनीं धाकटा असलेला त्याचा भाऊ हेन्री बहुतेक सगळयाच बाबतींत सॅमच्या अगदीं उलट होता. तो छोटा मुलगा दिसायला सुरेख अन् वागायला आज्ञाधारक होता. खोडकर सॅमला त्याला चिडविण्यांतच मौज वाटे. 'सिड'पेक्षां कितीतरी चांगलं व्यक्तिमत्त्व असूनहि हेन्री 'टॉम सॉयर'चा 'सिड' होणार होता. छोट्या बेंजामिनच्या मृत्यूमुळें सॅम व हेन्री परस्परांकडे अधिक आकर्षित झाले. त्यांचें एकमेकांवर विलक्षण प्रेम होतें. सॅमनें हेन्रीशीं केल्या नसतील एवढ्या मारामाऱ्या हेन्रीसाठीं केल्या.

'टॉम सॉयर' ह्या पुस्तकांतील घरगुती घटनांपैकीं बऱ्याचशा प्रत्यक्षांत घडलेल्या आहेत. पोहून घरीं परतल्यावर रंगीत दोऱ्यानं सदरा शिवला म्हणून खोड्यांत आणल्याबद्दल सॅमनं हेन्रीला खरोखरीच चिखलानं मारून काढला होता. कुंपणाला सफेदी देण्यासाठीं त्यानें खरोखरच अनेक मुलांना फुसलावलें होतें. पीटर नांवाच्या मांजरीला त्यानें 'पेनकिलर' (दुःखनाशक औषध) खरंच दिलं होतं. अपकृत्यांसाठीं होणाऱ्या शिक्षेंतून सुटणें हा तर त्याचा दिनक्रम होता. जशी वेळ असेल तशी युक्ति तो योजी. कारण 'टॉम सॉयर'च्या अनेक वाचकांनीं हेरल्याप्रमाणें सॅम क्लेमेन्स हाच बव्हंशीं टाम सॉयर होता.

♤ ♤ ♤

## ३.

# टॉम सॉयर आणि त्याची टोळी

'टॉम सॉयरचीं साहसें' या पुस्तकाच्या प्रारंभींच लेखकानं म्हटलं आहे कीं, 'या पुस्तकांत नमूद केलेलीं साहसं प्रत्यक्षांत घडलेलीं आहेत.' हक् फिन् हें व्यक्तिचित्र प्रत्यक्ष जीवनांतून घेतलेलं आहे, असंहि लेखकानं सांगितलं आहे. तसंच टॉम सॉयर जरी एकाच व्यक्तीवरून घेतलेला नसला तरी मार्क ट्वेनला ठाऊक असलेल्या तीन मुलांच्या व्यक्तित्वांतून तयार झालेली ती संमिश्र व्यक्तिरेखा आहे. तीं तीन मुलें म्हणजे बव्हंशीं तो स्वतः आणि जॉन् ब्रिग्ज व विल बोवेन ह्या त्याच्या दोन शाळामित्रांतील कांहीं अंशभाग होय. जॉन ब्रिग्जवरून ज्यो हार्पर हा 'सागरी राक्षस' घेतलेला आहे. लाल हाताच्या हक् फिनची व्यक्तिरेखा तर टॉम ब्लॅकनशिप नांवाच्या अनाथ पोरावरून, जशीच्या तशी घेतलेली आहे—कथेंत त्यांत थोडादेखील बदल करण्याची आवश्यकता लेखकाला वाटली नाहीं.

ब्लॅकनशिप कुटुंबाचें उदरनिर्वाहाचें साधन अनिश्चित होतें. कधीं तें मासे मारी, नाहीं तर शिकार करी. प्रथम तें झाडाखाली तीन काठ्यांवर उभारलेल्या खोपटांत राही. पण नंतर हिल स्ट्रीटवर क्लेमेन्स कुटुंबानं बांधलेल्या घरामागें असलेल्या धान्यगुदामासारख्या इमारतींत तें राहूं लागलें. त्या घरांत तिघे पुरुष होते. आळशी व चंगीभंगी बाप म्हातारा बेन, शंकास्पद चारित्र्य असलेला पण अंगीं कांहीं चांगले गुण विशेष असलेला थोरला तरुण मुलगा बेन आणि टॉम—म्हणजेच हक. त्याचं वर्णन केलंय् तसाच तो होता. अंगावर फाटक्या चिंध्या, अंतःकरणाचा दयाळू अन् आपल्या वर्तणुकीचा जाब कुणालाहि न देणारा. त्याला वाटेल तेव्हां तो येऊं शके व जाऊं शके. त्याला कधींहि काम करावं लागलं नाहीं कीं शाळेंत जावं लागलं नाहीं. इतर मुलांना ज्या गोष्टी कराव्याशा वाटत पण त्यांना मनाई असे अशा सार्‍या बर्‍यावाईट गोष्टी तो करूं शकत असे.

त्यांना तो स्वातंत्र्याचं प्रतीक वाटे. मासे धरणं, सापळे टाकणें याबाबतचं आणि जंगल-नदीविषयींचं त्याचं ज्ञान त्याच्या समाजाला मोल आणून देत असे. हिल स्ट्रीटवरील घराच्या अगदीं मागल्याच बाजूला ते राहत असल्यानें सॅम क्लेमेन्सनें पहिल्या दृष्टिक्षेपांतच त्यांचा स्वीकार केला. त्यांचें स्वतंत्र जीवन त्याला अनुरूप वाटलें. दिवसांतल्या कोणत्याहि वेळीं तो त्यांच्याकडे सांपडणें शक्य होतें. टॉम रात्रीच्या वेळीं मांजरासारखा आवाज काढीत असे. तो ऐकून सॅम घराच्या मागच्या कौलावर येई, तिथून छोट्या जाळीवरून जिना उतरून तो पळत पळत आपल्या आनंदी सहकाऱ्यांच्या गटांत सामील होई. या गटांत टॉमखेरीज बहुधा जॉन ब्रिग्ज, विल पिटस् आणि बोवेन कुटुंबांतले दोघे छोटे मुलगे असत.

त्यांना आपल्या कामगिरीसाठीं विशाल क्षेत्र मोकळें होतें. उत्तरेकडील 'हॉलिडे हिल' पासून दक्षिणेकडील त्या गुहेपर्यंत पसरलेल्या सर्व शेतांतून, जंगलांतून ते फिरत असत. नदीचे दोन्ही कांठ, बेटें आणि इलिनॉइसचा खोल व अज्ञात किनारा या सर्वांचें संशोधन ते करीत. तुर्की कोंबड्यासारखे ते पळत अन् बदकासारखे पोहत. जणुं होडींतच जन्म घेतल्यासारखे ते ती चालवीत. कोणतीहि फळबाग किंवा खरबुजांचा मळा त्यांच्यापासून सुरक्षित नसे. मालकांच्या संमतीनें अगर संमतीविना ते कुणाचीहि होडी उसनी घेत. त्यांना त्याची विशेष फिकीर नसे.

हनिबालपासून दोन मैल अंतरावर असलेल्या 'टर्टल आयलंड' पर्यंत ते वारंवार होडींतून जाऊन येत. आणि सबंध दिवसभर मौज करीत. तिथें भरपूर कासवें आणि त्यांचीं अंडीं मिळत. कालवें अन् मासेहि तिथें खूप सांपडत. मासे धरणें आणि पोहणें हे त्यांचे प्रमुख छंद असले तरी मधून मधून साहसी हल्लेहि ते करीत. बेटापर्यंतचें अंतर पुरेसें होतें. ह्या भागांतच त्या पुस्तकांतला टॉम सॉयर आपल्या लुटारू टोळींतील सदस्य जमवीत असे. ह्याच भागांत पुढें हक्‌ला निगर जिम भेटला. अनेक वेळां सायंकाळच्या सुमारास ते पोहून या बेटावर जात. सुमारें तासभर वाळूच्या धक्क्यावर मौज मारल्यावर मिसिसिपीचा संथ पण जोरदार प्रवाह कापीत ते तांबडें फुटण्याच्या सुमारास परत येत असत. सॅम क्लेमेन्स एकदां लहानपणीं इलिनॉइसच्या बाजूला पोहत गेला. तिथून वळून न थांबतां तो तसाच परतला. म्हणजे जवळजवळ दोन मैलांचें अंतर त्यानें तोडलें होतें. परततांना त्याला आंकडी आली. त्याचे पाय निकामी झाले अन् अखेरीस उरलेलें अंतर फक्त हातांच्या जोरावर त्याला तोडावें लागलें.

सॅम क्लेमेन्स आणि त्याचे मित्र यांच्या साहसांनीं 'टॉम सॉयर'च्या आका-

राचे अनेक ग्रंथ भरतील. त्या काळीं पैसा मिळविणें कांहीं सोपें नव्हतें. अन् हीं मुलें तर अनेकदां निष्कांचन असत. एकदां तर हक् ब्लॅकनशिपनें पकडलेल्या कून प्राण्याचें कातडें विकून त्याला भाडवल उभें करावें लागलें. सेल्म स्टोअरमध्यें कूनच्या कातड्याला दहा सेंट मिळत असत. पण ते पुरेसे नव्हते. त्या कातड्याची अधिक किमत यावी म्हणून या मुलांनीं एक योजना आंखली. सेल्म स्टोअरची मागील खिडकी उघडी असे. हक्नें पुढल्या दारानं जाऊन तें कातडं दहा सेंटला विकलं. सेल्मनं तें मागच्या गठ्यावर फेंकून दिलं. मग हक् मागील बाजूला आला अन् बराच वेळ थाबून हळूच पुढें सरकून त्यानं खिडकी उघडली, तें कूनचं कातडं हस्तगत केलं, अन् तें पुन्हा सेल्मला विकलं. त्या दिवशीं दुपारीं त्यानं बऱ्याच वेळां हा उद्योग केला. त्यांतूनच त्या टोळीचं भाडवल वाढलं. पण अखेरीस सेल्मचा कारकून जॉन पिअर्स म्हणाला, "मिस्टर सेल्म, हें पाहा, ह्यांत कांहींतरी चुकतंय्, तो पोरगा दुपारभर सारखा कूनचीं कातडीं आपल्याला विकतोय्." सेल्मनं मागच्या बाजूला जाऊन गठ्ठा तपासला. तिथं मेंढयांचीं कातडीं, गाईचीं चामडीं अनेक होतीं. पण कूनचं कातडं मात्र एकच होतं—त्यानं नुकतंच विकत घेतलं होतं तेवढंच! पुढें अनेक वर्षे सेल्म स्वतः ही गोष्ट एक मोठा विनोद म्हणून लोकांना सागत असे.

मधून मधून हीं मुलं 'हॉलिडे हिल' वर जाऊन वरून मोठमोठे दगड उतारावरून सोडून देत. त्यामुळें टेकडीजवळून ज्यांच्या मोटारी जात त्यांना फार भीति वाटे. वरून सोडलेला दगड वेगानें खाली जाई अन् रस्त्यावर तर एकाद्या तोफेच्या गोळ्यासारखा दाणकन् आदळे. ही मुलं एकादा दगड आणून तोलून धरीत अन् खालून माणसाची एकादी टोळी येईपर्यंत ते वाट पाहत. मधल्या अंतराचा अंदाज घेत आणि मग तो गोटा सोडून देत असत. त्या मंडळींच्या मार्गांत कांहीं यार्ड अंतरावर हा असा प्रचंड धोंडा पडल्यामुळें त्यांच्यावर काय परिणाम होतो याचा अंदाज घेण्यासाठीं हीं पोर झाडाझुडपामागें लपून बसत. अखेरीस ह्या गोटे सोडण्याच्या प्रकारांतील आजवरच्या सर्व प्रयत्नांवर मात करील अशी एक भव्य योजना त्यांनीं आंखली. जणुं कांहीं टेकडीवरून खालीं घसरण्यासाठींच सज्ज होऊन बसलेला एक भला मोठा राक्षसी धोंडा टेकडीवर होता, त्याला फक्त गति देण्याचाच अवकाश होता. खाणकामगारांचं खडक फोडण्याचं काम जवळच चालू होतं. त्यांनीं आपल्या कुदळी व फावडीं तिथंच ठेवलीं होतीं. मुलांनीं तीं हत्यारं उसनीं घेतलीं आणि तो अवजड धोंडा खालीं ढकलण्याच्या तयारीला ते लागले. हें काम अनेक तास चाललें होतें.

अखेरीस त्यांचें खणण्याचें काम चालू असतांनाच एकाएकीं तो धोंडा ढिला झाला व खालीं जाऊं लागला. एका गाडींतून येणाऱ्या एका कृष्णवर्णीय माणसाखेरीज रस्त्यावरून कोणीहि येत नव्हतें. त्यांचा एवढा मोठा धोंडा फुकट जात होता.

पण तो फुकट जात होता असं म्हणतां आलं नसतं. कांहींतरी रोमांचकारी अनुभव यावा म्हणून त्यांची ही योजना होती. आणि ती पार पाडली जात असतांना चित्तथरारक घटना घडत होत्या. धोंडा गडगडूं लागला तेव्हां तो विल बोवेनच्या अंगावर अगदीं येणार होता. जॉन ब्रिग्जनं त्याच क्षणीं खणण्याचं काम थांबवलं होतं; अन् विल्च्या हातीं कुदळ दिली होती. विल आपल्या पाळीचं काम सुरू करणार तोंच सॅम क्लेमेन्सनं जोरानं किंचाळून बाजूला उडी घेतली. तो म्हणाला, "बघा रे पोरांनो! धोंडा येतोय्!" तो अवजड धोंडा प्रथम जमिनीला लागून सरपटत होता, पण थोडा वेग येतांच प्रचंड आवाज करीत जोरानें खाली जाऊं लागला. टेकडीवरून खाली निम्म्या अंतरावर तो एका झुडुपावर आदळला अन् तें झुडुप त्यानं साफ चेमटून टाकलं. त्यामुळें त्याचा मार्ग कांहीसा बदलला. तो आवाज ऐकून गाडींतल्या त्या निग्रोनं हा अवजड धोंडा आपल्याच रोखानं येत असल्याचं पाह्यलं अन् खेचराला जोरान दामटण्यासाठीं जिवाचा आटापिटा केला. आतां तीं मुलं त्या धोंड्याचे प्रताप पाहण्यासाठीं मोठ्या औत्सुक्यानें टपून बसलीं होतीं. तो सरळ त्या निग्रोच्या आणि रस्त्यापलीकडील पिंपें तयार करण्याच्या दुकानाच्या रोखानें वेगानें येत होता. त्यावेळीं त्या दुकानांत कुणी नव्हतं. पण बाकी जो कांहीं उत्पात होणार होता त्याची कसून चौकशी झालीच असती. मुलांनीं श्वास रोखून धरले होते आणि त्यांचीं तोंडें उघडीं पडलीं होतीं. तेवढ्यांत असा चमत्कार झाला कीं, त्यांचा स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास बसेना. रस्त्याच्या थोडं वरच्या बाजूला पुढं आलेल्या उंचवट्यावर तो धोंडा आदळला, हवेंत त्यानं एक उंच उशी घेतली अन् निग्रो आणि त्याचं खेंचर यांच्या डोक्यावरून अलगद पलीकडे जाऊन रस्त्यापलीकडच्या उकिरड्यावर तो थांबला. दुकानाला निसटता धक्का बसल्यानें थोडंसं नुकसान झालं. पण त्याचा पार चुराडा झाला नाहीं. त्यांनीं लोटलेला तो अखेरचाच धोंडा ठरला.

या उपद्व्यापी टोळीचा नायक सॅम क्लेमेन्सच होता हें आतां कबूल करण्यांत कसलाच धोका नाहीं. त्याचं ऐकायला तीं पोरं सदैव तत्पर असत. त्याचं बोलणं ऐकण्यासाठीं हातांतलं मच्छिमारीचं कामहि तीं थांबवीत. त्याच्या योजना पार पाडण्यास तीं अतिशय उत्सुक असत. नव्या कल्पनांसाठीं आणि मार्गदर्शनासाठीं

तीं त्याच्याकडे पाहत. त्या पुस्तकांतल्या टॉम सॉयरला वाटे त्याप्रमाणेंच सॅमलाहि पुढारी होण्यांत आणि आपल्या सवंगड्यांवर कौशल्यानें छाप पाडण्यांत मोठा अभिमान वाटे.

वाङ्मयीन प्रसिद्धीचें सॅमला कधीं स्वप्नहि पडलें नसेल. हनिबालमधल्या प्रत्येक मुलाची आद्य अन् अविचल आकांक्षा असे तांडेल होण्याची. बसायला सुरेख कांचेची खोली, हातीं सर्वश्रेष्ठ अधिकार, राजपुत्रासारखा लठ्ठ पगार घेणारा तांडेल म्हणजे त्यांना सर्व मानवप्राण्यांतला अत्यंत श्रेष्ठ असा वाटे. तांडेल होतां आलें नाहीं तर सॅमला वाटे आपण चांचे, लुटारू किंवा फांसेपारध्याचा हेर तरी व्हावें—काहीं तरी भव्य, आश्चर्यानं थक्क करून सोडणारं, जिथं त्याचा शब्द, त्यानं हलवलेली मान म्हणजे कायदा असेल असें व्हावें.

सॅम क्लेमेन्सला त्या गुहेचा कधींच कंटाळा येत नसे. तो केव्हाहि मासे धरायला, पोहायला, खरबुजांच्या शोधार्थ तीन तीन मैल जायला मागें पुढें पाहत नसे. असं चालून आल्यावर तीं मुलं ह्या गूढ गुहेच्या तोंडाशीं येत. गुन्हेगारांना विश्रांति घ्यायला ही अगदीं योग्य गुहा आहे असं सॅमला वाटे. तींत बसून अनेक साहसांच्या कल्पना त्यानं शोधून काढल्या अन् त्या प्रत्यक्षांत आणल्या. त्याच्या विश्वासू अनुयायांना सारंच काही समजलं असेल असं नाही. अर्थात् तेवढ्यासाठीं ते त्यातली मजा चाखूं शकले नसतील असं थोडंच आहे ! 'टॉम सॉयर' मध्यें ज्यो नांवाच्या रेड इंडियनचा मृत्यु गुहेंतच होतो. प्रत्यक्षांत तो तेथं मरण पावला नव्हता. पण एकदां चुकला मात्र होता. तो दुराचारी होता आणि घातकी मानला जात असला तरी पुस्तकांत रंगवला आहे तेवढा तो वाईट नव्हता. आणि एके रात्रीं तो प्रत्यक्ष मरण पावला तेव्हां वादळी ढगांचा एवढा प्रचंड गडगडाट झाला कीं, सॅमला आपल्या घरीं बिछान्यांत बसल्या बसल्या वाटलें, त्याचा आत्मा घेऊन जाण्यासाठीं सैतान स्वतः आला असला पाहिजे. त्यानें तोंड झांकून घेतलें अन् भयचकित औत्सुक्यानें प्रार्थना म्हटली. न जाणां, एक खेप वांचविण्यासाठीं सैतान याच दौऱ्यांत आपल्यालाहि घेऊन जायचा.

पुस्तकांत गुप्त खजिना खोदण्याचें जें साहस दाखवलेलें आहे त्याचा प्रत्यक्षांतला आधार असा : सांपळे लावणाऱ्या दोघां फ्रेंच माणसांनीं सोन्याची एक तिजोरी हनिबालच्या वर दोन मैल अंतरावर पुरून ठेवली असून अजून ती तिथंच आहे असं सांगितलं जात असे. एक दिवस सकाळीं टॉम ब्लॅकनशिप (हक्) म्हणाला, "ही संपत्ति निश्चित कुठं आहे त्याबद्दल मला एक स्वप्न पडलंय. तुम्हीं जर माझ्याबरोबर येऊन खणायला मदत केली तर तुम्हांलाहि थोडासा हिस्सा मी

देईन. स्वप्नावर आणि विशेषतः हकूच्या स्वप्नांवर मुलांची विशेष श्रद्धा असे. जवळजवळ सबंध दिवसभर ते खणीतच होते. हकूनें स्वतः मात्र खणलें नाहीं. कारण स्वप्न पाहण्याचं काम त्यानं केलेलंच होतं. तोच त्याचा वांटा होता. त्या दिवशीं त्यांना संपत्ति सांपडली नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यांनीं लोखंडाच्या दोन लांबलचक सळ्या घेतल्या अन् त्या जमिनींत कशाला तरी अडकेपर्यंत आंत घुसविल्या. पण त्यांना केव्हांच धन हातीं लागलं नाहीं. आतां मात्र आणखी खणायचं नाहीं, असं त्या रात्रींच मुलांनीं ठरवून टाकलं. पण एव्हांना हकूला दुसरं स्वप्न पडलं होतं. सोनं नेमकं छोट्या पॉ पॉ झाडाखालीं असल्याचं त्यांत त्यानं पाह्यलं होतं. त्या विशिष्ट परिस्थितींत त्यांना तें खरं वाटलं अन् आणखी एक दिवसभर त्यांनीं खणण्यांत घालवला. त्यानंतर मात्र हकनंहि तो नाद सोडला. तो म्हणाला, तुमच्या खणण्याच्या पद्धतींत कांहीतरी चूक असली पाहिजे. टॉम सॉयरमधील गुप्त धन-संशोधनाच्या घटनेपेक्षां ही बरीच निराळी आहे. पण ज्या पाजी माणसावरून हक् फिनचें व्यक्तिचित्र रंगविण्यांत आलें त्याच्याविषयीं त्या मुलांच्या मनांत किती आदरभाव होता तें मात्र दिसून येते. हकूच्या व्यक्तिचित्रांत टॉम ब्लॅकनशिपचा भाऊ बेन याचाहि उपयोग करून घेण्यांत आला होता. बेन वयानं बराच मोठा होता. लहान मुलांना तो अतिशय छळत असे. मुलांना त्याच्याबद्दल फारच थोडें प्रेम वाटत असे. असं असूनहि बेन ब्लॅकनशिपच्या स्वभावांत एक सुरेख, औदार्ययुक्त, मानवतावादी असा भाग होता. त्याच्या आधारानंच मार्क ट्वेन निगर जिम्‌ला आसरा देण्याचा तो अविस्मरणीय प्रसंग चितारूं शकला. त्यामागील खरी कथा अशी आहे: मिसुरींतल्या मनरो कौंटीमधून एक गुलाम पळाला, आणि नदी ओलांडून इलिनॉईसमध्यें शिरला. तिथल्या त्या दलदलीच्या भागांत बेन मासे पकडी किंवा शिकार करीत असे. त्याला एके दिवशीं तो गुलाम दिसला. त्या काळांत, पळून गेलेल्या गुलामांना परत मालकाकडे पोंचविणें हें अत्यंत सज्जनपणाचें कृत्य समजत असत. उलट तसं न करणं हा गुन्हा मानला जाई. खेरीज अशा कामगिरीबद्दल ५० पौंडांचें बक्षीस मिळे. बेनसारख्या दरिद्री, समाजानं वाळीत टाकलेल्या माणसाला ही रक्कम म्हणजे मोठं घबाडच होतं. त्या गुलामाला मालकाच्या स्वाधीन करून बक्षिसावर हक्क सांगण्याच्याऐवजीं बेननें सबंध उन्हाळाभर त्या गुलामाला त्या पाणथळ जागेंत लपवून ठेवलं. मग हळूहळू या गोष्टीला वाचा फुटली. कांहीं लाकूडतोडे मग त्या फरारी गुलामाचा शोध घेत घेत 'बर्ड स्लफ्' पर्यंत गेले. तिथें नदी ओलांडीत असतां अखेरीस तो गुलाम प्रवाहांत बुडून मरण पावला. 'टॉम

सॉयर'मध्यें हक्च्या मनांत एका बाजूला सारासारविवेक आणि कायदा व दुसऱ्या बाजूला सखोल मानवी सहानुभूति यांच्या दरम्यान झगडा कसा चालू होता याचें चित्रण आढळतें. बेन ब्लॅकनशिपच्या मनांत झगडा झालाच असल्यास तो सहानुभूति कीं बक्षिसाची रक्कम यांमध्यें झाला असणार. त्याला सारासारविवेक किंवा कायदा यांची फिकीर असणेंच शक्य नव्हतें. त्याच्या स्वकीयांविषयींच्या आत्मीयतेनं त्यास त्या फरारी गुलामाला आसरा द्यायला लावलं, अर्थात् ५० डॉलरच्या बक्षिसाचा मोह त्याला टाळायला लावण्याइतकी ती आत्मीयता जबरदस्त व प्रामाणिक असली पाहिजे.

बालपणांतले ते दिवस भयानक घटनांनींच भरलेले असावेत असं वाटतं. 'दि इनोसन्ट्स् ॲब्रॉड' मध्यें लेखकानें आपल्याला वडिलांच्या कचेरींत एक रात्र कशी काढावी लागली आणि तिथं एका माणसाचा खून झालेला कसा आढळतो, तें दाखवलंय्. ही प्रत्यक्ष घडलेली घटना होती. दुपारीं त्या इसमाला भोंसकून घरांत आणून ठेवण्यांत आलेलं होतं. सॅम आणि जॉन ब्रिग्ज दिवसभर कामचुकारपणें खेळत होते. त्यामुळें त्याना या गोष्टीची मुळींच कल्पना नव्हती. घरीं त्याची आई त्याच्यासाठीं ताटकळत बसलेली असणार. म्हणून घरापेक्षां कचेरीच त्याला अधिक सुरक्षित वाटली. तो खिडकींतून आंत चढला आणि व्हरांड्यांत पडून राहिला, पण झोपला नाहीं. थोड्याच वेळांत त्याला जमिनीवर एक विचित्र आकृति दिसली. त्यान आपलं तोंड भिंतीकडे वळवून तें सारं विसरायचा प्रयत्न केला. पण तें शक्य नव्हतं. विलक्षण दुःखानं तो त्या आकृतीकडे पाहत राहिला. अखेरीस चंद्रप्रकाशांत उजळलेल्या चौकोनांत त्याला जे दृश्य दिसलं तें तो पुढें कधींहि विसरूं शकला नाहीं. त्या पुस्तकांत त्यानं म्हटलं आहे, "मी तिथून निघून गेलों. मी कांहीं तिथनं घाईघाईनं निघून गेलों असं मी म्हणत नाहीं. फक्त मी निघून गेलों—एवढं म्हटलं कीं बस्स. मी खिडकींतनं बाहेर पडलों. कंबरपट्टा बरोबर घेतला. तसं पाह्यलं तर त्या पट्ट्याची मला गरज नव्हती. पण तो तिथं टाकून देण्यापेक्षां बरोबर घेणंच अधिक सोपं होतं. म्हणून मीं तो घेतला. मी कांहीं भ्यालों नव्हतों, मनस्ताप मात्र मला फार झाला होता."

सॅम अद्याप बारा वर्षांचा झाला नव्हता. कारण सॅम १२ वर्षांचा झाला तेव्हां त्याचे वडील हयात नव्हते. एवढ्या अल्पवयांत अनुभवाची केवढी मोठी शिदोरी त्याच्यापाशीं जमली होती !

योग्य वेळीं स्केअर भागांतील श्री. क्रॉस यांच्या शाळेंत सॅम जाऊं लागला. तिथं त्याच्या स्वभावांतील सत्प्रवृत्तींना साद घालणारे सहाध्यायी त्याला मिळाले.

लॅटिन भाषेवर प्रभुत्व असलेला जॉर्ज अन् सतत सद्वर्तनाचं पारितोषिक पटकाविणारा जॉन हे दोघे रॉबर्ट–बंधु त्या शाळेंतच होते. स्पेलिंगमध्यें उत्कृष्ट गति असलेला बक ब्राऊन तिथं होता. जॉन गार्थ अन् जिमी मॅक्डॅनिएल यांची ओळख असणंहि फायद्याचं होतं. कारण त्यांच्या वडिलांची बेकरी होती अन् हीं मुलं शाळेंत केक अन् कॅंडी नेहमीं आणीत असत. बऱ्याचशा मुलीहि होत्या त्या शाळेंत. बेटी ओर्म्सले, आर्टेमिशिया ब्रिग्ज आणि जेनी ब्रॅडी या मुलींची त्याला पुढें किती तरी वर्षें आटवण येत असे.

इतक असूनहि सॅमला टॉम सॉयरप्रमाणेंच फक्त एकच निष्ठावंत प्रिया लाभली होती, असं दिसतं. पुस्तकांत तिचं नांव आहे बेकी थॅचर, तर प्रत्यक्षांत तें होतं लॉरा हॉकिन्स. क्लेमेन्स आणि हॉकिन्स कुटुंबं समोरासमोर राहत आणि दोन्ही कुटुंबांतल्या मुलांची लौकरच गट्टी जमली. हा 'ब्लॅक ॲव्हेंजर ऑफ दि स्पॅनिश मेन' घरीं खेळत असे तेव्हां अतिशय मवाळ असायचा. एकदां लॉराच्या मदतीनं घर बांधण्याचं काम चालू असतांना लॉराच्या बोटांवर एक वीट पडली तेव्हां तिच्यापेक्षां मोठ्यांदा तोच ओरडला; अन् तिचं रड ओसरलं तरी ह्याचं स्फुंदणं चालूच होतं ! स्वभावानं तो अगदीं हळवा होता. तो जनावराला देखील कधीं शिवी देत नसे. अर्थात् 'पेनकिलर' सारख्या घटनांतली त्याची खोडकर वृत्ति वर उफाळून येई तेव्हांचे अपवाद वगळायचे. त्याला माजरी भारी आवडत. दर उन्हाळ्यांत तो आपलं मांजर टोपलींत घालून बरोबर नेई अन् टेबलावर तें सदैव त्याच्याजवळ बसून राही.

सॅम क्लेमेन्सच्या शालेय जीवनापासून हें थोडं विषयांतर झालं. तसं आतां त्यांत सांगण्यासारखं फारसं राह्यलेलं नाहीं. जगांतल्या दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीपेक्षां सॅमला शाळेचा तिटकारा अधिक. कोणती ना कोणती सबब शोधून तो तिथून सटकायला बघायचा. त्याचं कारण सांगतां येणं कठिण, पण तिथले ते निर्बंध अन् तासन् तास बांधून ठेवल्यासारखं बसून राहणं बहुधा त्याला पसंत नसावं. दर शुक्रवारीं दुपारीं वर्गात स्पेलिंगची स्पर्धा होई तिच्यामुळें मात्र सॅमला शाळेंत जावंसं वाटे. स्पेलिंगच्या बाबतींत तो आघाडीवर होता. ती एक त्याला देणगीच होती म्हणा ना. श्री. क्रॉस नांवाप्रमाणेंच तिरसट असूनहि स्पेलिंगमुळें सॅमला त्यांच्याकडून देखील शाबासकी मिळत असे. त्या शाळेंत असलेल्या दोन पदकांपैकीं निदान स्पेलिंगचं एक पदक तरी सॅमच्या छातीवर सदैव लटकत असे. एकदां 'फेब्रुआरी' शब्दांतला पहिला 'आर' विसरल्यामुळें त्यानं तें पदक गमावलं. लॉरा हॉकिन्स प्रतिपक्षाकडे होती. अन् सॅमहि स्वभावानं

उमदा होता. त्याच्या जागीं बक ब्राऊन असता तर त्यानं मात्र छाप पाडण्यासाठीं त्या महिन्याचं स्पेलिंग आणि इतर महिन्यांचं स्पेलिंगहि पुन्हा म्हणून दाखवलं असतं.

आणि मग एके दिवशीं सॅम स्वतंत्र झाला. इतकं दुर्दैव सोसूनहि जज्ज क्लेमेन्सचा मानवतेवरचा विश्वास कधींहि उडाला नव्हता. बऱ्याच मोठ्या रकमेसाठीं तो एका शेजाऱ्याला जामीन राहिला होता. ती रक्कम त्याना भरावी लागली. पुन्हां एकदां त्यांची सारी मालमत्ता गेली. सेंट लुईमधल्या एका चुलत भावानं कसंबसं घर तेवढं वांचवलं. पण आतां क्लेमेन्स कुटुंबाला त्या घरांत राहणं परवडण्यासारखं नव्हत. समोर राहणाऱ्या एका कुटुंबांतच त्यांनीं आपलाहि संसार थाटला.

जज्ज क्लेमेन्स यांना आतां एकच आशा होती. बिशपच्या प्रतिनिधीच्या कोर्टांतील कारकुनाच्या जागेसाठीं ते एक उमेदवार होते. ती जागा चांगली होती अन् आपली नियुक्ति होणार याविषयींहि त्याला खात्री होती. तरीहि ते गाफील राहिले नाहींत. हवामानाचा विचार न करतां जिल्ह्यांतल्या प्रत्येक घरांत त्यांनीं प्रचार केला. त्याचा परिणाम अखेर त्यांच्या प्रकृतीवर झाल्याशिवाय राहिला नाहीं.

फेब्रुवारीच्या अखेरीस ते पाल्मिरा ह्या कौंटींतल्या मुख्य गांवीं घोड्यावरून गेले. उभ्या वादळांतनं ते तसेच घरीं परत आले, ते जवळजवळ गारठूनच. त्यांना नवज्वरानं गांठलं अन् थोड्याच दिवसांत ते मृत्युपंथास लागले. टेनेसीमधील जमीन हें अजून त्यांचं एक आशास्थान होतं. 'तिच्यामुळें आपण सारे सुखी व श्रीमंत होऊं' असें ते म्हणत. एकदां त्यांनीं हळूच सांगितलें होतें, "जमीन घट्ट धरून ठेवा. जमिनीला घट्ट धरून ठेवा अन् वाट पाहा. कुणालाहि फसून ती जाऊं देऊं नका." त्यांचा स्वभाव असा होता कीं, मुलांविषयींचें प्रेम ते क्वचितच व्यक्त करीत. पण एवढ्यांत त्यांनीं पामेलाला खूण करून जवळ बोलावलें. आतां ती एकोणीस वर्षांची सुरेख मुलगी झालेली होती—अन् तिच्या मानेला विळखा घालून त्यांनीं तिचा मुका घेतला. तिचा असा मुका त्यांनीं गेल्या किती तरी वर्षांत घेतला नव्हता. "आतां मला मरूं द्या—" असं त्यांनीं म्हटलं. अन् त्यानंतर ते बोलले नाहींत. थोड्याच वेळांत त्यांच्या सर्व चिंता नष्ट झाल्या. १८४७ च्या मार्चमधली घटना ही. जॉन क्लेमेन्स पुरते ४९ वर्षें देखील जगले नव्हते. सॅमला विलक्षण पश्चात्ताप झाला. त्याला आपली सारी पुंडाई आठवली, अवमानिलेल्या आज्ञा आठवल्या, त्या त्या

वेळीं क्षुल्लक वाटणाऱ्या पण आतां हृदयाचें पाणी पाणी करणाऱ्या हजारों गोष्टी त्याला आठवल्या.

त्याच्या पित्याचा देह ठेवला होता त्या खोलीत नेतांना आईनं त्याचं सांत्वन केलं अन् त्याच्याशीं एक वचन मागितलं. तिच्या कुशींत शिरत शिरत, हुंदके देत देत तो म्हणाला, "कसलंहि वचन देतो, पण मला शाळेंत जायची सक्ति करूं नकोस ! मग कसलंहि वचन घे !" क्षणभरानें आई म्हणाली, "नाहीं बरं, सॅमी ! आतां तुला शाळेंत जायची जरुरी नाहीं. तूं आपली वागणूक सुधारशील एवढंच वचन मला दे. माझ्या अंतःकरणावर आणखी घाव घालणार नाहीं असं वचन दे." अगदीं थेट बापासारखा विश्वासु, उद्योगी अन् सरळ-वृत्तीचा माणूस होण्याचं वचन त्यानं आईला दिलं. असं वचन देणं ही एक गंभीर घटना होती. अन् सॅम क्लेमेन्स वर वर कसाहि असला तरी अंतर्यामीं गंभीर प्रवृत्तीचा मुलगा होता. नोव्हेंबरांत त्याला बारावं वर्ष लागणार होतं. पण तो आपलं वचन खात्रीनं पाळील असंच त्याच्या आईला वाटत होतं.

ओरियन क्लेमेन्स सेंट लुईहून परत आला. तिथं त्याला आठवड्याला दहा डॉलर पगार मिळत होता. त्या काळाच्या मनानं हा आंकडा मोठाच होता. त्यांतनं तो तीन डॉलर दर आठवड्याला आपल्या कुटुंबियांसाठीं धाडीत असे. पामेला संगीताच्या शिकवण्या करी अन् अशा रीतीनं कौटुंबिक प्राप्तींत भर घाली. काम करण्याचं हेन्रीचं अजून वय नव्हतं. पण वर्षभरानं ॲमेंट नामक मुद्रकाकडे सॅमला मात्र उमेदवार म्हणून ठेवण्यांत आलं. ॲमेंटनं हनिबालला येऊन 'दि कूरियर' नावाचं एक साप्ताहिक विकत घेतलं होतं.



४.

# उमेद्वार आणि कसबी मुद्रक

त्या काळांत सर्वांच्या वांट्याला येत त्याच अटींवर सॅम्युएल क्लेमेन्स हाहि उमेद्वार म्हणून राहिला—जेवण आणि कपडे. याबद्दल मार्क ट्वेन म्हणे, "जेवण कपड्यांपेक्षां थोडं अधिक, पण दोन्ही फारसं नाहीं." दरवर्षी मला दोन सूटस् मिळायचे असं ठरलं होतं. पण ते मला मिळत नसत. एक सूट मला मिळे. अन् उरलेले मला ॲमेंटच्या जुन्यापान्या कपड्यांतनंच घ्यावे लागत. त्याचे ते कपडे माझ्या अंगाला कधींच चांगले येणं शक्य नव्हतं. मी अंगानं त्याच्याहून जेमतेम निम्मा होतों. अन् त्याचा एकादा सदरा मीं अंगांत घातला कीं, सर्कसचा तंबू अंगावर घेतल्यासारखं वाटत असे. दुसरा एक उमेद्वार—वेल्स मॅक्कॉर्मिक त्याचं नांव—तो अंगापिंडानं चांगलाच गलेलठ्ठ होता. ॲमेंटचे एवढे मोठाले डगलेदेखील त्याला खूपच अपुरे होत असत. पहिल्यापहिल्यांदा सॅम अन् वेल्स स्वयंपाकघरांत जेवीत. पण मग पुढें ते श्री. ॲमेंट, सौ. ॲमेंट अन् एक कसबी मुद्रक पेट मॅक्मरे यांच्याबरोबर टेबलावर जेवूं लागले. मॅक्मरे हा एक सुखी प्राणी होता. त्यानं खूप दूरवरचा प्रवास केला होता अन् खूप ज्ञान संपादन केलं होतं. या दोघां उमेद्वारांना जें अद्याप ठाऊक नव्हतं तें पेट मॅक्मरे त्यांना शिकवूं शकत होता. वर्तन सुधारण्याचं वचन सॅम क्लेमेन्सनं दिलं होतं. अन् इतर मुलांच्या मानानं तो होताहि चांगला—उद्योगी, नियमितपणें काम करणारा, कुठलीहि नवी गोष्ट चटकन् शिकून घेणारा, मायाळू आणि सत्यप्रिय.

कचेरींत सॅम लौकरच लोकप्रिय झाला अन् योग्य वेळीं 'राखीव' म्हणून त्याचा पहिला क्रम लागला. एक वर्षभर उमेद्वारी केल्यावर तो चांगल्या तऱ्हेनें खिळे जुळविण्यांत, जॉब प्रेस चालविण्यांत तरबेज झाला अन् वांटप-खात्याचं कामहि त्याच्याकडे देण्यांत आलं. म्हणजेच तो वर्तमानपत्राचे गठ्ठे वाहूं लागला.

अन् हेंच खरं महत्त्वाचं काम होतं. कारण लांब तारांची वाकलेली कमान, नदी ओलांडून हनिबालला येऊन पोचली होती. आणि मेक्सिकन युद्धाच्या आघाडी-वरची ताजी बातमी देणाऱ्या दूताचा दर्जा खात्रीनं उंचावत असे. एक प्रकारचं संपादन-कार्यहि तो करी. ॲमेंट कचेरींत नसला अन् मजकुराची गरज भासली कीं सॅम त्याला शोधून आणी; सारी परिस्थिति त्याला समजावून देई; अन् आवश्यक तेवढा मजकूर त्याच्याकडून मिळवी. लेखन करण्याची महत्त्वाकांक्षा त्याला नव्हती—त्या वेळीं नव्हती. पेटसारखा कसबी मुद्रक व्हायचं होतं त्याला. सगळीकडे हिंडून सारं जग पाहायचं होतं. कधीं कधीं त्याला वाटे विदूषक, नाहीं तर शाहिरी फडांतला शेवटला झिलकरी व्हावं.

पण तो छापखान्यांतच चिकटून राहिला अन् लौकरच एक चागला, लायक कामगार बनला. दुपारीं तीनच्या सुमारास त्याचं रोजचं नेमून दिलेलं काम संपे. मग तो आपल्या जुन्या मित्रांसह नदीवर नाहीं तर गुहेकडे जात असे. नाहीं तर कधीं कधीं 'प्रेमिकांची झेंप' या नांवानं महशूर असलेल्या, नदीच्या वरच्या उंच सुळक्यावर लॉरा हॉकिन्सला घेऊन तो कोलंबाईनचीं फुलं आणायला जाई. हिंवाळ्यांत हीं दोघं कधीं कधीं 'स्केटिंग' करीत करीत 'बीअर' खाडीपर्यंत जात किंवा जिथं 'रिंग-अराऊंड-रोझी' आणि 'डस्टी मिलर' सारखे जुने खेळ एवढीच करमणूक असे, अशा मेजवान्यांना दोघं मिळून जात. 'गिल्डेड एज'-मध्यें बारा वर्षांच्या लॉरा हॉकिन्सचं असं वर्णन केलेलं आहे: "रंगीत फितीच्या नक्षीदार वेलबुट्टीच्या खिशांत आपले सुबक हात घालून ती उभी राहिली कीं,... अगदीं रुक्ष माणसालाहि उत्तेजित करील अन् शोकमग्न माणसाला आनंदित अन् उत्साहित करील असंच तें दृश्य असे." त्या पुस्तकांतल्या गोष्टींचं वस्तुस्थितीशीं कांहींच साम्य नाहीं. पण हें चित्र मात्र लॉराचं होतं.

नेमक्या ह्याच वेळेला अशी एक घटना घडून आली कीं, जी सॅम क्लेमेन्सच्या आयुष्याला निराळं वळण लावणारी ठरली असं आतां म्हणायला कांहींच हरकत नाहीं. एके दिवशीं दुपारीं कचेरींतनं परततांना त्यानं वाऱ्यावर उडत असलेला एक कागदाचा कपटा पाहिला. त्याच्या पाठोपाठ पळून त्यानं तो कपटा हस्तगत केला. जोन ऑफ आर्कच्या इतिहासाच्या जुन्या पुस्तकाचं तें एक पान होत. रोवेन येथील टॉवरवरील त्या कुमारिकेच्या दुर्दैवाची कहाणी—गुंडानीं तिला पकडून तिच्याशीं गैरवर्तणूक कशी केली, शिवीगाळ कशी केली—तें सारं त्यावर छापलेलं होतं. जोनसंबंधीं सॅमनं पूर्वीं कांहींच ऐकलं नव्हतं. त्याला इतिहासांतलं कांहींहि ठाऊक नव्हतं. तो फारसं वाचीतहि नसे. पण आतां त्याच्या अंतःकरणांत्

दयेची आणि तिरस्काराची तीव्र भावना निर्माण झाली अन् त्या दुःखद कथेविषयीं आणखी बरंचसं जाणून घेण्याची उत्कट इच्छा त्याला झाली. हें औत्सुक्य त्याच्या हयातभर टिकलं. आणि त्यांतूनच एक दुर्मिळ पुस्तक लिहिलं गेलं. जोनसंबंधीं जें जें मिळण्यासारखं होतं तें त्यानं हस्तगत केलं. त्यांतून सर्वसाधारण फ्रेंच इतिहासांत त्यानं पदार्पण केलं. एवढंच नव्हे तर प्रत्येक प्रकारच्या समग्र इतिहासांत तो डोकावूं लागला. सॅम्युएल क्लेमेन्स अकस्मात् वाचक बनला —जवळजवळ विद्यार्थीच म्हणा ना! तो जुलमी सत्तेचा द्वेष करूं लागला, दुर्बलांचा कैवारी बनला.

पांचशें डॉलर्सला गहाण पडलेलं 'दि जर्नल' हें हनिबालचं पत्र विक्रीस निघालं होतं. ओरियन क्लेमेन्स सेंट लुईहून परत येत होता. त्यानं कुठून तरी पैसे उसने आणले अन् तें पत्र विकत घेतलं. सॅमची ॲमेटकडची दोन वर्षांची उमेदवारी पूर्ण झाली होती. अन् दोघं मिळून वर्तमानपत्र चालवून यश मिळवूं असं ओरियनला वाटत होतं. हेन्री आतां अकरा वर्षांचा झाला होता. त्याला देखील शाळेंतून काढून खिळे जुळवायला बसविण्यांत आलं. चालक म्हणून काम पाहण्यापेक्षां ओरियन मुद्रक या नात्यानं चांगलं काम करी. कुटुंबांतल्या इतर मंडळींप्रमाणेंच त्यालाहि दूर दृष्टि होती, स्वभावानं तो सौम्य अन् भोळसर होता—कोणत्याहि नव्या कल्पनेमागें तो चटकन् धावे. तो मोठया आशेनं आणि उत्साहानं कामाला लागला. तो स्वतः गुलामासारखं काम करी अन् दुसऱ्या कुणाचीहि गय करीत नसे. विशेषतः सॅमवर फार ताण पडे. आतां दुपारीं त्याला मोकळा वेळ मिळेनासा झाला. ओरियन क्लेमेन्सनं पुढल्या आयुष्यांत लिहून ठेवलंय: "माझं सॅमशीं होणारं वर्तन जुलमी अन् अन्याय्य होतं. चांगल्या कसबी कामगाराइतका तो जलद अन् सुबक काम करी. मी त्याला कांहीं तरी लिहून घ्यायला सांगें. अन् तें काम त्यानं चांगलं केलं तरी मग मी, वेळ लावल्याबद्दलच कुरकुर करीं अन् त्याला आणखी काम करायला लावीं."

सुरुवातीला तरी तें पत्र यशाची वाटचाल करीत असल्यासारखं दिसलं. पण ओरियननं फार मेहनत घेतली. नको एवढ्या योजना हाताळल्या. वर्षअखेरीस 'दि जर्नल' उतरतीस लागलं. पैशाची निकड फारच वाढली तेव्हां ओरियननें टेनेसीला जाऊन जमिनीवर कांहीं मिळतंय का पाह्यलं. हो, ती जमीन अजून होती त्यांच्यापाशीं. सॅमकडे त्यानं पत्राची सारी जबाबदारी सोपवली. पत्राचा चालक रिक्त हस्तानें परतला. पण त्याचा हा प्रवास फलदायी ठरला—कारण ह्याच काळांत सॅम्युएल क्लेमेन्सनं आपल्या नव्या कर्तबगारीची मुहूर्तमेढ रोवली—

तिच्यांतनंच पुढें एक दिवस मार्क ट्वेन निर्माण झाला. खप वाढेल अशा पद्धतीनं पत्राचं संपादन केलं पाहिजे असा निष्कर्ष सॅमनं काढला. अद्याप छापण्यासाठीं त्यानं कांहींच लिहिलं नव्हतं. पण वर्गणीदारांना काय हवं असतं तें आपल्याला नेमकं ठाऊक आहे असा त्याला आत्मविश्वास होता.

प्रपिस्पर्धी पत्राच्या संपादकाचा प्रेमभंग झाला होता अन् त्यामुळें तो नदींत जीव देण्याच्या विचारांत आहे असं बोललं जात होतं. या प्रकरणाचा इतिहास, नांवं अन् तपशील देऊन सॅमनं लिहून काढला अन् तो छापला. नंतर बिले छापण्यासाठीं वापरावयाच्या दोन मोठ्या लाकडी अक्षरांच्या पाठीवर त्यानें एक व्यंगचित्र काढलें : सोबतच्या लेखांतला प्रेमवीर जीव देण्यासाठीं नदीपाशीं आला आहे अन् काठीनें पाण्याची खोली अजमावीत आहे, असं त्यांत दाखवलं होतं. झालं. अंक प्रसिद्ध झाला, अन् त्याला एवढी मागणी आली कीं, त्याचा वॉशिंग्टन हॅंड प्रेस सारखा चालू ठेवावा लागला. प्रेमवीर संपादकानं निरोप धाडला कीं, 'जर्नल' च्या एकूण एक साऱ्या नोकरांना झोडपून काढण्यासाठीं आपण येत आहोंत. पण असं कांहीं करण्याऐवजीं तो गांव सोडून पळून गेला. कारण एव्हांना सारा गांव त्याला हसत होता.

सॅमनं एक कविताहि केली. तिनं पुराणमताभिमानी मंडळींना जबर धक्का दिला. मग ओरियन परत आल्यावर त्यानं सॅमला पुन्हा पदच्युत केलं. पुढें त्याला आपली चूक कळून आली. त्यानं लिहून ठेवलंय, "सॅमची कुवत ओळखून मीं त्याला तसंच स्वातंत्र्य दिलं असतं तर त्या परिस्थितींतहि मी इतर स्पर्धकांना मागें टाकूं शकलों असतों. फक्त लायक माणसांना त्यानं दुखवूं नये एवढीच खबरदारी घेतली असती तरी बस्स होतं." सॅम निरुत्साही झाला नाहीं. लिहिलेला मजकूर छापून येण्यांतली गोडी त्यानें आतां चाखली होती. त्यानं दोन कथा लिहून फिलाडेल्फियाच्या 'सॅटर्डे ईव्हिनिंग पोस्ट' कडे पाठवून दिल्या. दोन्ही स्वीकारण्यांत आल्या—अर्थात् त्या काळांतल्याप्रमाणें विना-मोबदला; आणि त्या प्रसिद्ध झाल्या तेव्हां तर सॅम हवेंत चालत होता. ही १८५१ मधली गोष्ट.

नंतर मात्र 'पोस्ट' साठीं त्यानं कांहींच लिहिलं नाहीं. सॅमनं काढलेलीं दोन चित्रं ओरियननं 'जर्नल' मध्यें छापलीं. एव्हांना तें अगदीं डबघाईला आलं होतं. वर्षामागनं वर्षं जात होतं. गहाणखताचे हप्ते ओरियन भरूं शकत नव्हता. कुटुंबाला अगदीं साधं अन्न अन् कपडा तो कसाबसा देई. अर्थात् सॅम नि हेन्रीला पगार मिळत नव्हताच. आणि मग ती दुर्घटना घडली. एक दिवस रात्रीं एक

गाय छापखान्यांत शिरली. दोन 'टाईप केसेस' तिनं पालथ्या केल्या अन् दोन कॉम्पोझिशन रोलर्स खाऊन फस्त केले. थोड्या वेळानें आग लागली अन् तींत बरंच नुकसान झालं. कांहीं वस्तूंचा विमा उतरलेला होता. त्यांतल्या रकमेंतनं कांहीं अत्यावश्यक वस्तु घेण्यांत आल्या. अन् भाडं वांचवण्यासाठीं हिल स्ट्रीट-वरल्या घरांतल्या पुढल्या खोलींत त्यानं कचेरी नेली. सॅम्युएल क्लेमेन्सला आतां अठरावं वर्ष लागलं होतं अन् हनिबालमध्यें आतां आपली जरुरी नाहीं असं त्याला वाटायला लागलं होतं. तो लायक कामगार होता. इथं त्याच्याजोगं काम फारच थोडं होतं अन् त्याचा मोबदलाहि मिळत नव्हता. ओरियनची वागणूकहि नेहमीं चांगली नसे. दरम्यानच्या काळांत पामेलाचं लग्न होऊन ती सेंट लुई येथें सुस्थितींत होती. सॅमनं आईला सांगितलं कीं, "पामेलला भेटून येतों अन् गांव कसं आहे तेंहि पाहून घेतों. सेंट लुईमध्यें चांगल्या पगारावर काम मिळूनहि जाईल." त्याला सेंट लुईहून बरंच पुढें जायचं होतं, पण तसं आईला सांगायचा धीर होत नव्हता. जेन क्लेमेन्सनं त्याला रुकार दिला. अन् त्याच्या किरकोळ सामानाची बांधाबांध करतांना एक प्रदीर्घ उसासा सोडला अलीकडे तो चांगलं वागूं लागला होता. पण त्याच्यांतल्या मोहाचा प्रतिकार करण्याच्या शक्तीवर तिचा विश्वास नव्हता. तिनं झटकन् 'बायबल' ची एक प्रत काढली अन् ती म्हणाली, "सॅम! हें दुसरं टोक हातांत घेऊन मला वचन दे. आतां मी म्हणेन तें तूं माझ्या मागनं म्हण : मी इथनं गेल्यावर एकदांहि पत्ते खेळणार नाहीं किंवा दारूच्या एका थेंबालाहि स्पर्श करणार नाहीं." त्यानं प्रतिज्ञा घेतली. तिनं त्याचा मुका घेतला आणि ती म्हणाली, "सॅम, हें ध्यानांत ठेव. अन् आम्हांला पत्र पाठवीत जा."

सेंट लुई येथील आपली बहीण पामेला हिला भेटायला सॅम्युएल गेला आणि लौकरच 'ईव्हिनिंग न्यूज' साठीं खिळे जुळवूं लागला. न्यूयॉर्क सिटीपर्यंत जातां येईल एवढे पैसे मिळवणं हें त्याचं उद्दिष्ट होतं. एव्हांना सेंट लुईपर्यंत आगगाडी येऊन पोंचली होती. अन् गाडीच्या प्रदीर्घ प्रवासाचा लज्जतदार अनुभव घ्यायची त्याची मनीषा होती. शिवाय न्यूयॉर्कच्या क्रिस्टल पॅलेसमध्यें जागतिक प्रदर्शन भरलेलं होतं. १८५३ सालीं आगगाड्या फार हळू चालत. सेंट लुईहून न्यूयॉर्कला जायला बरेच दिवस लागत. पण सॅमच्या दृष्टीनं तो प्रवास सुखकरच होता. अखेरीस थोडेसे डॉलर खिशांत घेऊन आणि कोटाच्या अस्तरांत दहा डॉलरची एक नोट शिवून अखेरीस तो एकदांचा न्यूयॉर्कमध्यें येऊन दाखल झाला.

त्याच्या अपेक्षेपेक्षां न्यूयॉर्क थोडं मोठंच शहर होतं. मॅनहटन बेटाचा खालचा सगळा भाग त्यानं व्यापला होता. ४२ व्या रस्त्यावरील ६ व्या अॅव्हेन्यूवर तो क्रिस्टल पॅलेस होता. जगांतलीं नव्यांतलीं नवीं आश्चर्ये तिथल्या प्रदर्शनांत पाहायला मिळत होतीं—डोळे दिपवणारंच होतं तें प्रदर्शन. आपली बहीण पामेला हिला लिहिलेल्या पत्रांत—मार्क ट्वेनच्या लिखाणापैकीं प्रारंभींचं असं हें पत्र जपून ठेवण्यांत आलं आहे—सॅमनं ते प्रचंड प्रदर्शन आपल्याला किती आवडलं ते कळविलंय : "गॅलरींतून (दुसरा मजला) आपल्याला फारच भव्य देखावा दिसतो. प्रदशनांत भाग घेतलेल्या निरनिराळ्या देशांचे ध्वज, एक उंच असा घुमट, चमचमणारीं हिरे-माणकं, भडक रंगाचं वेलबुट्टीदार कापड वगैरे. लोकांचे घोळके सारखे इकडून तिकडे जातांना दिसतात; त्यामुळं हा राजवाडा अगदीं परीकथेंतल्या राजवाड्यासारखा, केवळ अवर्णनीय असा वाटतो. तळमजल्यावर यंत्रांचा बिभाग आहे, पण आतां बराच उशीर झाला असल्यानें (रात्रीचा १ वाजून गेला आहे) मी त्यांचा तपशील कळवू शकत नाहीं. प्रदर्शनांतलं सारं पाहायचं तर आठवड्याहून जास्त वेळ हवा. अन् मी तर आज रात्रीं अवघा दोन तास तिथं होतों. एक तृतीयांश वस्तु मीं ओझरत्या पाहिल्या. पण माझी स्मरणशक्ति दुबळी असल्यानं त्यातल्या मुख्य मुख्य वस्तूंचंहि वर्णन करूं शकलों नाहीं. ह्या पॅलेसला रोज सरासरी ६०००—म्हणजे हनिबालच्या लोकसंख्येच्या दुप्पट लोक भेट देतात. प्रवेश-फी ५० सेंट असल्यानें रोज ३००० डॉलर जमा होतात. लॅटिंग वेधशाळा (२८० फूट उंच) ह्या पॅलेसजवळच आहे. तिच्यावरून सबंध शहराचं अन् सभोंवतालच्या ग्रामीण परिसराचं दृश्य छान दिसतं. शहराला पाणी-पुरवठा करणाऱ्या क्रोटन-नलिका म्हणजे मीं आतांपर्यंत पाहिलेल्या गोष्टींत तरी एक आश्चर्यच म्हणावं लागेल. हार्लेम नदीच्या पात्रांतून मोठमोठे नळ टाकून ग्रामीण भागांतून थेट वेस्ट चेस्टर कौंटीपर्यंत आणले आहेत. जणुं कांहीं सबंध नदीचा प्रवाह बदलून तिला न्यूयॉर्क शहरांत आणून सोडलं आहे. न्यूयॉर्क शहरांतलं जलसंचयकेंद्र अन् वेस्ट चेस्टर कौंटीमधलं जलसंचयकेंद्र यांतलं अंतर ३८ मैल आहे. जरूर पडल्यास न्यूयॉर्क शहरांतल्या प्रत्येक कुटुंबाला ते दररोज शंभर पिंप पाणी-पुरवठा करूं शकतील!... आईला सांग, मीं तिला दिलेलं वचन पुरेपूर पाळतोंय्. अन् माझं सारं कांहीं ठाकठीक जमलं तर येत्या वसंत ऋतूंत मी तिला 'की' येथें घेऊन जाईन. त्यासाठीं मी पैसे सांठवतोंय्. (आतांच दोनाचे ठोके पडले. मी रोज सहाला उठतों अन् सातला कामाला जातों.) मी संध्याकाळचा काय करतों, असं तूं विचारशील.

इथं माझ्याशीं बोलायला कुणी नाहीं, अन् अवघ्या पाव मैल अंतरावर 'मुद्रकांचं मोफत वाचनालय' आहे. त्यांत ४००० ग्रंथ आहेत. मग मी संध्याकाळीं दुसरीकडे कुठं जाणार? एलाला मी लौकरच पत्र लिहिणार आहें. तुझं उत्तर लौकर येऊं दे.—तुझा भाऊ, सॅमी."—"ता. क. : तूं किंवा आई वाचूं शकणार नाहीं एवढ्या मंद प्रकाशांत मीं हें पत्र लिहिलंय्."

ह्या पत्रावरून सतरा वर्षांच्या सॅम्युएल क्लेमेन्सविषयीं आपल्याला बरीचशी कल्पना येऊं शकते. एक गोष्ट निश्चित कीं, तो चांगलं, सुस्पष्ट इंग्रजी लिहूं शकत होता. त्याच्या लिखाणांत वेधक, चटकदार घटनांची माहिती भरलेली असे. तो उत्साही वाटतो, पण शब्दांची उधळपट्टी करीत नाहीं. सहस्रावधि ग्रंथांनीं परिपूर्ण अशा मुद्रकांच्या वाचनालयांत तो रमलाय्. सारांश, सॅम्युएल क्लेमेन्सनं टॉम सॉयर, ज्यो हार्पर, हक् फिन मंडळींना केव्हांच त्या मनोहर ग्रामीण भागांत सोडून दिलंय् असं आपल्याला वाटूं लागतं.

क्लिफ स्ट्रीटवरील सर्वसाधारण मुद्रक जॉन ए. ग्रे अँड ग्रीन या कंपनींत सॅमला काम लागलं. त्याला आठवड्याला चारच डॉलर मिळत; अन् तेहि 'वाईल्ड कॅट मनी'—म्हणजे खासगी बँकांनीं छापलेल्या नोटा-नाण्यांत मिळत. ह्या नोटा वगैरे बहुधा कमी किंमतीला खपत किंवा कधीं कधीं तर त्यांची किंमत शून्य भरे. पण पगार कमी असला तरी त्या काळांत राहणीहि स्वस्ताईची होती. त्यामुळें शनिवारीं जेवणाचे, धुलाईचे पैसे देऊनहि कधीं कधीं सॅमपाशीं ५० सेंट शिल्लक उरत. सुदैवानं वैभवाच्या आशेनं तो बाहेर पडला नव्हता, तर तो जग पाहायला निघाला होता. १८५३ च्या उन्हाळ्यांत तो न्यूयॉर्कमध्यें रेंगाळला. पण आतां फार दिवस तिथं तो राहणार नव्हता. त्या काळांतलीं त्याचीं फारच थोडीं पत्रं उपलब्ध आहेत.

ऑक्टोबरांत पामेलाला लिहिलेल्या पत्रांत त्यानं म्हटलंय्, "गेले दोन आठवडे मी रोज न्यूयॉर्क सोडून जाणार या कल्पनेनं स्वतःची फसवणूक करून घेतोंय्." नंतर एडविन फॉरेस्टचं काम पाहायला ब्रॉडवे थिएटरांत गेल्याचं सांगून तो म्हणतो : "ग्लॅडिएटर नांवाचं नाटक होतं तें. त्यांतला बराचसा भाग मला कांहीं आवडला नाहीं. पण कांहीं भाग मात्र अत्यंत उत्कृष्ट होता. शेवटच्या अंकांतल्या उत्तरार्धात त्याच्या अभिनयाशीं माणसाचं सारं अंतःकरण जणुं एकरूप होऊन जातं. त्याचं तें काम पाहून आपण अगदीं चकित होऊन जातों....सोमवारीं रात्रीं फिलाडेल्फियांत पुन्हां त्याचा खेळ होणार आहे."

सॅम क्लेमेन्स कदाचित् फॉरेस्टच्या मागं फिलाडेल्फियाला गेलाहि असेल.

कसेंहि असो, तूर्त तो तिथं होता. 'इन्क्वायरर'च्या छापखान्यांत दुय्यम जुळारी म्हणून, दिवसाला दहा हजार 'एम' जुळवीत होता अन् त्या प्रमाणांत पगार घेत होता. त्याला काम मिळत नसे तेव्हां तो फिलाडेल्फियामधलीं वाचनालयें, कला-प्रदर्शनें आणि ऐतिहासिक स्थळें पाहण्यांत वेळ घालवी. प्रेक्षणीय स्थळं पाहणं हा त्याचा मुख्य व्यवसाय होता अन् त्या साध्यासाठीं छापखान्यांतलं काम हें साधन होतं. संध्याकाळीं कडक थंडींत तो खानावळींत परते तेव्हां त्याचा खोली-मित्र—समनेर नांवाचा इंग्रज होता तो—छोट्याशा शेगडीवर एकादा हेरिंग मासा भाजी, अन् मग तीच त्यांना मोठी मेजवानी वाटे. त्यानं लिखाण करण्याचा प्रयत्न केला, फिलाडेल्फिया 'लेजर'साठीं त्यानं मृत्युगीतं लिहिली. पण तीं स्वीकारण्यांत आली नाहींत. बऱ्याच वर्षांनीं याविषयीं त्यानं म्हटलं होतं, "माझे प्रयत्न त्यांना पसंत पडले नाहींत."

फिलाडेल्फिया आपल्याला आवडतंय् असं सॅमला दिसून आलं. थोड्याशा पैशांची बचत करून ते तो आईला पाठवूं शकला. रक्कम थोडी असली तरी तिकडे त्यांना ती हवीच होती. "आम्हांला इथं कोणत्या प्रकारच्या नाण्यांत पगार मिळतो त्याचा नमुना म्हणून" त्यानं एकदां एक सोन्याचा डॉलर तिकडे पाठवून दिला होता. कामाबद्दल तो लिहितो: "येत्या १ एप्रिलपर्यंत एका माणसानं मला दर रविवारीं त्याच्यासाठीं काम करण्याकरतां नेमलंय. त्यानंतर मात्र मी घरीं येईन अन् आईला 'की' येथें घेऊन जाईन. मला हवं असल्यास आठवड्यांतल्या प्रत्येक रात्रीं मला काम मिळूं शकेल. संध्याकाळीं ७ वाजल्यापासून दुसऱ्या दिवशीं पहाटे ३ वाजेपर्यंत मी काम करतों...इकडे बहुधा 'ॲगेट' जातीचे आणि 'मिन्यन' आकाराचे खिळे जुळवावे लागतात; क्वचित् 'बूर्झ्वा' हा लॉंग प्रायमर व ब्रीव्हरदरम्यानचा टाईपहि असतो. 'ॲगेट'मध्यें जर आपण चांगली गति दाखवली तर पैसा चांगला मिळतो. गेल्या रविवारीं मीं अडीच डॉलर मिळविले."

दरम्यान, ओरियन क्लेमेन्सनं आयोवामधील मस्कटाईन येथें एक वर्तमानपत्र विकत घेतलें. अन् बिऱ्हाड तिकडे नेलें. एव्हांना या कामीं आपल्या भावाची मदत किती बहुमोल आहे याची निःसंशय जाणीव त्याला झाली होती. कारण त्याला पाठवलेल्या एका पत्रांत सॅमनं म्हटलं आहे, "मधून मधून मी आपल्या पत्रासाठीं लिहीत जाईन. पण माझीं पत्रं अनाकर्षक होतील अशी धास्ती मला वाटते. कारण या रात्रपाळीनें माणसाची कल्पनाशक्ति बोथट होऊन जाते." दरम्यान, सॅमला अठरावं वर्ष लागलं. हिंवा-ळ्याचे दिवस सुरू झाले अन् आतां त्याला घर सोडून सहा महिने होऊन गेले

होते. घरीं जाण्याचा विचार प्रथमच आतां त्याच्या मनांत डोकावूं लागला होता. "अस्तित्वांत नसलेल्या मित्राला गंमतीचीं पत्रं कशीं लिहावींत हें शिकायचं झालं तर फक्त घर सोडून दूर गेलं म्हणजे झालं!" असं त्यानं लिहून ठेवलंय्. भटकण्यांतलं नावीन्य नष्ट झालं होतं अन् परिचित चेहरे पाहण्यास तो उत्सुक होता. कौटुंबिक सुखाची तहान त्याला लागली होती. पण तो गेला नाहीं. केवळ प्रेक्षणीय स्थळें पाहण्यासाठीं जानेवारींत एकदां तो वॉशिंग्टनला चक्कर मारून आला अन् परत फिलाडेल्फियाला येऊन 'लेजर' अन् 'नॉर्थ अमेरिकन' पत्रांत काम करूं लागला. मग एके दिवशीं तो न्यूयॉर्कला परत गेला अन् तिथून त्यानं सेंट लुईचं तिकीट काढलं. १८५४ च्या उन्हाळ्याच्या अखेरच्या दिवसांतली ही गोष्ट.

सेंट लुईला पोंचेपर्यंत सॅम अतिशय थकून गेला होता. 'किओकक' ची टपालाची बोट लौकरच निघणार होती. फक्त पामेलाला भेटण्यापुरता तो तिथं थांबला अन् लगेच बोटीवर येऊन तो आपल्या बर्थवर जो झोपला तो ३६ तासांनीं आयोवामधल्या मस्कटाईन गावीं बोट पोंचली तेव्हां उठला. तो बोटींतनं उतरला तेव्हां पहाटदेखील झालेली नव्हती. अशा वेळीं घरच्या लोकांना कशाला उठवायचं म्हणून सकाळ होण्याची वाट पाहत तो एका छोट्या हॉटेलच्या कचेरींत बसून राहिला. तिथल्या टेबलावर पडलेलं एक पुस्तक त्यानं उचललं. त्यांत इंग्लिश राजांचीं चित्रे अन् त्यांच्या कारकीर्दीतील ठळक घटनांची नोंद होती. बसल्या बसल्या सॅमनं ती सगळीं माहिती तोंडपाठ केली. एक–दोन तासांत ती त्याच्या मनांत इतकी पक्की रुजली कीं, पुढें जन्मांत कधीं त्याला तिचं विस्मरण झालं नाहीं. अशा रीतीनें इकडून तिकडून गोळा केलेलं ज्ञान त्याला पुढील आयुष्यांत फार उपयुक्त ठरलं. सबंध इंग्लिश इतिहासाचा त्यानं घातलेला तो पाया होता.

मस्कटाईनलाच राहण्याच्या बाबतींत भावाचं मन वळवण्याच्या कामीं ओरियनला यश आलं नाहीं. सॅम पुन्हां सेंट लुईमधल्या आपल्या 'ईव्हिनिंग न्यूज' मधील जुन्या नोकरीवर हजर झाला. तिथं तो जवळजवळ वर्षभर राहिला. वसंत ऋतूच्या सुमारास ओरियननं लग्न केलं अन् मस्कटाईनमधली सारी चीजवस्त विकून टाकली. तो मग आयोवामधील कियोकक येथें राहूं लागला. एक दिवस सॅम त्याला भेटायला आला तेव्हां ओरियननं त्याला जेवूनखाऊन आठवड्याला पांच डॉलर कबूल केले. सॅमनंहि संमति दिली. हेन्री एव्हांना सतरा वर्षांचा झाला होता अन् तोहि ओरियनकडेच नोकरीला होता. डिक हिंघॅम नांवाचा आणखी एक पोरगा ओरियनकडे होता. हेन्री आणि सॅम कचेरींतच झोपत.

तिथंच वरच्या खोलींत राहणारा ब्राऊनेल नांवाचा तरुण आणि डिक हे दोघे संध्याकाळचे येत अन् चौघांचाहि वेळ मजेंत जाई.

त्यांचे ते दिवस खरोखरच फार मजेंत गेले. खालच्या मजल्यावर एक संगीत शिक्षक होता. त्याच्या वर्गाला ह्या चौकडीचा उपद्रव होई. प्रथम त्यानं ह्यांना दमदाटी करून पाहिली, पण व्यर्थ. उलट उपद्रव आणखीच वाढला. मग सभ्यपणानें त्यानं थोडेसे प्रयत्न केले अन् त्याला यश आलं. नाचणं, बागडणं बंद करून हीं पोरं त्याच्या वर्गात दाखल झालीं. सॅमला संगीतांत फारशी गति कधींच नव्हती, पण विनोदवृत्ति, बोलण्याची संथ अन् चमत्कारिक ढब अन् बुद्धीची चमक या गुणांमुळें लोकप्रियतेच्या बाबतींत तो अजोड होता. तो आतां वीस वर्षांचा झाला होता अन् बहुधा तरुण स्त्रियांसमवेत असायचा. मात्र कुणालाहि लग्नाची मागणी घालण्यापर्यंत मजल न मारतां तो प्रियकराचीच भूमिका करीत होता. तो सर्वांचाच सुहृद् होऊन बसला. जी कुणी येईल तिच्या संगतींत तो आनंदानें वेळ काढीत असे.

कुणाच्याहि कल्पनेपेक्षां तो अधिक वाचन करीत असे. रात्रीं बिछान्यांत रेलून—त्याची ही संवय अखेरपर्यंत टिकली—बहुधा तो खूप उशिरापर्यंत वाचीत बसे. अशा वेळीं तो धूम्रपानाचाहि आस्वाद घेई. एक भला मोठा जमिनीवर ठेवतां येण्याजोगा वाडगा अन् त्याला लाबलचक रबरी नळी व तींत शेवटीं पाईप अशी धूम्रपानाची व्यवस्था त्यानं स्वतः करून घेतली होती. ती कांहींशी तुर्की गुडगुडीसारखी वाटे. अनावश्यक श्रम करणं सॅम क्लेमेन्सला कधींच आवडलं नाहीं. एकदां रात्रीं त्याचा पाईप विझून गेला. तेवढ्यांत त्याच्या खोली-वरून ब्राऊनेल हा तरुण कारकून वरच्या मजल्यावरच्या आपल्या खोलीकडे जात असल्याची चाहूल त्याला लागली. सॅमनं त्याला बोलावून म्हटलं, "एड, जरा इकडं ये तर!"

ब्राऊनेलनं दारांतून आंत डोकावलं; अन् विचारलं, "सॅम, तुला काय हवंय?"

"आंत ये, एड. हेन्री झोपलाय अन् मी थोडासा अडचणींत सांपडलोंय्. माझा पाईप कुणी पेटवून देईल तर पाहत होतों."

"तूं स्वतःच उठून कां नाहीं पेटवीत?" ब्राऊनेलनं विचारलं.

"पेटवला असता रे, पण मला ठाऊक होतं, थोड्याच वेळांत तूं इकडनं जाशील अन् माझ्यासाठीं तेवढं करून टाकशील म्हणून."

ब्राऊनेलनं काडी ओढली अन् खालीं वाकून पाईपला लावली. "तूं काय वाचतोस, सॅम?"

"कांहीं नाहीं रे. हें एक तथाकथित विनोदी पुस्तक आहे. लौकरच ह्याच्याहि पेक्षां विनोदी पुस्तक मी स्वतःच लिहिणार आहें."

ब्राऊनेल हसून म्हणाला, "छेः सॅम, तूं इतका आळशी आहेस कीं, तुझ्या-कडून कधींच पुस्तक लिहून होणार नाही."

पुढें बऱ्याच वर्षांनीं किओककमध्यें व्याख्यान देत असतांना मार्क ट्वेन म्हणाला, "जगांतला एक अत्यंत असत्यभाषी मनुष्य ह्या किओककमध्यें राहत असे. अन् त्याचं नांव होतं एड ब्राऊनेल."

ओरियन क्लेमेन्सला समृद्धि कधींच लाभली नाहीं. सॅमला पगार देणं अशक्य झालं तेव्हां त्यानं त्याला भागीदार करून घेतलं. म्हणजे सॅमला मुळीं पगारच मिळे-नासा झाला. कचेरींतल्या गैरव्यवस्थेमुळें तो अस्वस्थ होई. पद्धत नसेल तिथं आपल्याला काम करतां येत नाहीं, असं त्यानं घरीं कळवून टाकलं. थोड्याच दिवसांत आपण किओकक सोडून जाणार असंहि त्यानं कळवलं अन् खरोखरच तो फार मोठ्या साहसाची योजना आंखीत होता—त्याला ॲमेझॉनपर्यंत सफर करायची होती.

◆ ◆ ◆

५.

# ॲमेझॉनचा प्रदीर्घ प्रवास

एक पुस्तक वाचल्यापासून सॅमचं ॲमेझॉनविषयींचं आकर्षण जागृत झालं होतं. बिछान्यांत रेलून तें पुस्तक वाचण्यांत अनेकदां संध्याकाळच्या वेळीं तो गढून जाई. कोको आणि इतर दुर्मिळ वस्तु जमवून रात्रीच्या वेळीं, प्रचंड संपत्ति जमवीत असल्याचीं स्वप्नं पाहत असतांनाच त्यानं निश्चय केला कीं, आतां निष्कारण उशीर न करतां स्वतःच 'अप्पर ॲमेझॉन'च्या प्रवासाला निघायचं. पुढें दिसणाऱ्या उज्ज्वल भवितव्याच्या शक्यतेमुळें तिथं जाऊन पोंचण्याच्या मार्गातील अडचणी त्याला दिसूंच शकल्या नाहींत. आई आणि वडील ह्या दोघांकडून त्याला मिळालेला हा वारसा होता. त्याची मात्र अशी श्रद्धा होती की, आपण ॲमेझॉनसंबंधीं अत्यंत काळजीपूर्वक विचार केलेला आहे. अगदीं थोड्याच वेळांत महान् मोहिमेवरून आपण तिथं जाऊन पोहोंचूं आणि अभूतपूर्व संपत्ति गोळा करण्याच्या कामला लागूं. डॉ. मार्टिन आणि वॉर्ड नावाचा एक तरुण मनुष्य अशा दोघां साहसी इसमांच्याहि कल्पनाशक्तीला त्यानें प्रेरणा दिली.

त्या वेळीं हेन्री सेंट लुई येथें होता. ५ ऑगस्ट १८५६ ला त्याला लिहिलेल्या पत्रांत सॅमनं म्हटलंय् : "रविवारीं सकाळीं मीं आणि वॉर्डनं खूप वेळ विचार-विनिमय केला. परिणामीं आम्हीं दोघांनीं ब्राझिलला जाण्याचा निश्चय पक्का घेतला. शक्य झाल्यास सहा आठवड्यांच्या आंत येथून निघून आम्ही तिथं जाऊं अन् तिथली परिस्थिति काळजीपूर्वक पाहून डॉ. मार्टिन यांना कळवूं म्हणजे ते १ मार्चला आमच्या मागोमाग येतील." पैशाच्या अडचणीनें तो त्रस्त झाला होता. एका विशिष्ट रकमेसाठीं ओरियनवर अवलंबून राहतां येत नव्हतं. अन् अप्पर ॲमेझॉनपर्यंत जायचं नुसतं भाडंच केवढं मोठं होतं. ही रक्कम उभी करण्याच्या अनेक योजना सॅमनं आंखल्या. न्यूयॉर्क किंवा सिनसिनाटी इथं जाऊन

आपल्या व्यवसायांतलं काम करून पैसा सांठवायचा ही एक योजना होती. मग न्यूयॉर्कहून तो थेट जाणार होता किंवा बोटीनं न्यू ऑर्लीन्सला जाऊन तिथून मग पुढं जाणार होता. अप्पर ॲमेझॉनला सदैव बोटी जात असणारच. ठरविल्या-प्रमाणें वॉर्ड त्याच्याबरोबर निघाला नाहीं. वॉर्ड आणि मार्टिन यांनीं ही ॲमेझॉन प्रवासाची कल्पना जवळ जवळ सोडून दिल्यासारखीच होती. सॅम्युएल क्लेमेन्सचं तसं नव्हतं. त्याचं वाचन चालूच होतं. अन् एकीकडे तो किओककमधून बाहेर पडण्यापुरता पैसा जमवीत होता. त्याच्या हातीं एकाएकीं रक्कम आली ती परमेश्वराच्या कृपेमुळें कीं, भवितव्यतेमुळें ? कांहींहि असो, ती परिस्थिति इतकी आश्चर्यकारक होती कीं काल्पनिक कथाकादंबऱ्यांतहि अशा चमत्कारिक घटनांना स्थान नसतं.

हनिबालमध्यें एक दिवस सॅम क्लेमेन्सच्या हातांत जोन ऑफ आर्कच्या पुस्तकांतला एक कागद वाऱ्यावर उडून आला होता आणि ती घटना त्याच्या मानसिक जीवनाला कलाटणी देणारी ठरली. आणि त्या घटनेनंतर आतां सात वर्षांनीं वाऱ्यानेंच त्याच्या भवितव्याची दिशा निश्चित केली. नोव्हेंबराच्या पूर्वार्धातला दिवस होता तो. किओककमधल्या मेन स्ट्रीटवरून सॅम्युएल क्लेमेन्स जात होता. कागदाचा एक कपटा त्याच्याजवळून उडत गेला अन् एका इमारतीपाशीं पडला. कसं कुणास ठाऊक, पण त्याचं लक्ष गेलं अन् त्यानं तो हस्तगत केला. ती पन्नास डॉलरची नोट होती! आपल्याला एक रमणीय स्वप्न पडतंय असं त्याला वाटलं. हा धनलाभ खिशांत घालून गुपचुप बसण्याचा मोह त्याला होत होता. पण एका वर्तमानपत्राच्या कचेरींत जाऊन, आपल्याला मोठी रक्कम सांपडली असल्याबद्दलची जाहिरात त्यानं दिली. नंतर बऱ्याच दिवसांनीं या घटनेबद्दल तो म्हणाला, "मीं विशेष तपशीलवार वर्णन केलं नाहीं. दररोज मला धास्ती वाटे, मालक येईल अन् माझं वैभव घेऊन जाईल. पुढें मला तें मुळींच सहन होईना. माझी विवेकबुद्धि एव्हांना मला टोंचणी देईनाशी झाली होती. ती रक्कम धोक्यापलीकडे घेऊन जावी असंहि तोंवर मला वाटूं लागलं होतं." वस्तुतः तो बरेच दिवस थांबला. पण ते पैसे न्यायला कोणीहि आलं नाहीं.

प्रथम सिनसिनाटीला तळ ठोकायचं सॅमनं ठरवलं. तिथून तो ॲमेझॉनची बोट पकडण्यासाठीं न्यूयॉर्कला किंवा न्यू ऑर्लीन्सला जाणार होता. सेंट लुईला तो जाऊन आला. त्याची आई त्या वेळीं तिथं होती. पुन्हां एकदां तिनं पत्ते अन् दारूला स्पर्श न करण्याची शपथ त्याच्याकडून घेवविली. याच सुमारास त्याला

एक वाङ्मयीन कल्पना स्फुरली. किओककला परत येऊन त्यानं 'सॅटर्डे पोस्ट' ह्या चांगल्या चालणाऱ्या साप्ताहिकाच्या लोकांपुढें आपली ही कल्पना मांडली. तो प्रवासवर्णनाचीं पत्रं लिहून पाठवणार होता. पुढें त्याचा संग्रह करून एकादं पुस्तकहि छापतां येणार होतं. 'पोस्ट' चा मालक जॉर्ज रीज यानं प्रत्येक पत्राला पांच डॉलर देण्याचं कबूल केलं. त्या वेळेच्या अन् काळाच्या मानानं, आणि आजच्या दर्जानं पाहूं गेल्यास त्या पत्रांचं जेवढं मोल आहे त्यापेक्षां हा मोबदला अधिक होता. पहिलं पत्र १४ नोव्हेंबर १८५६ रोजीं त्यानं सिनसिनाटीहून पाठवलं, अन् तें वाङ्मयीन दृष्टया कांहीं फारसं आशादायक नव्हतं. विनोदी लिखाणासाठीं अमुकच भाषा वापरायची असते अशा एके काळच्या समजुती-प्रमाणें त्यानें अत्यंत हास्यास्पद अशा भाषेंत तें लिहिलं होतं.

वयाच्या २१ व्या वर्षी सॅम्युएल क्लेमेन्सनं तें अन् नंतरचं इतकं रद्दी पत्र कसं लिहिलं अन् पुढें दहा वर्षांनीं 'दि इनोसंटस् ॲब्रॉड' हें पुस्तक कसं लिहिलं हें एक वाङ्मयीन आश्चर्य आहे. त्या पत्राखालीं 'स्नॉडग्रास' अशी सही तो करी. अशीं दोनच पत्रं उपलब्ध आहेत. हीं पत्रं लिहिणं हें कांहीं सोपं काम नाहीं ही गोष्ट स्नॉडग्रासच्या ध्यानांत आली असावी. कारण त्यानं मोबदला वाढवून मागितला. अन् सुदैवानं ही 'पत्रावळ' संपुष्टांत आली! १८५७ च्या एप्रिलपर्यंत सॅम सिनसिनाटी येथेंच राहिला. त्या वेळीं तो सर्वसाधारण मुद्रक राईटसन आणि कंपनींत नोकरीला होता अन् एका स्वस्त्या खानावळींत राहून आपल्या महान् साहसासाठीं जमेल तो पै-पैसा सांठवीत होता. खानावळींत त्याला एक दोस्त मिळाला. वयानं दुप्पट, बांध्यानं सडसडीत, कधींहि न हसणाऱ्या अशा त्या स्कॉच माणसाचं नांव होतं मॅक्फरलेन. तो काय करीत असे तें सॅमला कधींच कळलं नाहीं. कसलं तरी कष्टाचं काम करून त्याच्या हाताला घट्टे पडले होते. सकाळीं सहाला तो जाई तो संध्याकाळीं जवळजवळ सहाला येई. आपण काय काम करतों हें त्यानं कधीं सागितलं नाहीं अन् सौजन्यशील स्वभावामुळें सॅमनंहि कधीं त्याला विचारलं नाहीं.

मॅक्फरलेन साधा माणूस नव्हता. त्यानें अनेक ग्रंथ वाचले होते. तो एक विचारवंत होता. इतिहास आणि तत्त्वज्ञान यांचा त्याचा अभ्यास चांगला होता. त्यानं स्वतःविषयीं दोन विधानें केलीं होतीं. एक म्हणजे, त्यानं हें सारं ज्ञान वाचनांतून प्राप्त करून घेतलं होतं, शाळेंत जाऊन नव्हे. अन् दुसरं म्हणजे इंग्रजी शब्दकोशांतला प्रत्येक शब्द त्याला अवगत होता. सॅम क्लेमेन्सनं अनेकदां त्याची चांचणी घेतली. पण त्याला अर्थ सांगतां आला नाहीं असा एकहि शब्द

नव्हता. जीवनाच्या मूलभूत समस्यांवर चर्चा करण्यास मॅक्फरलेन केव्हांहि तयार असे आणि त्याच्या स्वतःपाशीं अनेक आश्चर्यकारक असे सिद्धांत होते. त्या वेळीं 'डिसेंट ऑफ मॅन' हें डार्विनचं पुस्तक प्रसिद्ध झालेलं नव्हतं. तरीहि त्या पुस्तकांतल्यासारख्या कल्पना तो पुढें माडीत असे. तो डार्विनच्याहि पुढें जाई. मानवाच्या नैतिक उत्क्रांतीविषयीं त्याच्या विस्मयकारक कल्पना होत्या. आणि त्या तो आपल्या ह्या तरुण श्रोत्यांच्या कानांत ओतीत असे. त्या हिंवाळ्यांत मॅक्फरलेनच्या खोलींत सॅम्युएल क्लेमेन्सनं ऐकलेलीं हीं प्रवचनं खळबळकारक होतीं. त्याच्या पुढील विचारमंथनावर त्यांचा परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं.

ते एप्रिलचे अखेरचे दिवस म्हणजे वसंत ऋतूचा ऐन बहर होता. अप्पर ॲमेझॉनच्या प्रवासाला निघायची हीच वेळ आहे असं ह्या भावी कोका-भक्ताला वाटलं. न्यू ऑर्लीन्सला तो बोटीवर चढूं शकत होता. अन् निदान न्यू ऑर्लीन्सपर्यंत जातां येईल एवढे तरी पैसे त्यानं जमवले होते. शिवाय, मिसिसिपीमधल्या संथ प्रवासाला तो प्रारंभ करूं शकत होता. खलाशी होण्याच्या खालोखाल हेंहि एक त्याचं अत्यंत आवडतं स्वप्न होतं. 'लाईफ ऑन दि मिसिसिपी' मध्यें आपण वाचतों कीं, साऱ्या वैभवाचा त्याग करून ग्रंथकार पळून जातो—खलाशी झाल्याखेरीज घरीं परत येणार नाहीं असा प्रतिज्ञापूर्वक निश्चय करून. पण हा झाला कल्पित भाग. त्याला ती नदी सदैव आवडे. तांडेल होण्याचं त्याचं बालपणचं स्वप्न वरचेवर डोकावे, पण मॅक्फरलेनला रामराम करून त्यानं 'पॉल जोन्स' बोटीवर पाय ठेवला तेव्हां त्याच्या मनांत महत्त्वाचा विचार तो नव्हता. त्या छोट्याशा बोटीचं नांव मात्र त्यानं अमर करून ठेवलंय्.

◆ ◆ ◆

६.

## जुन्या महत्त्वाकांक्षेचें पुनरुज्जीवन : नदीवरील दिवस

मार्क ट्वेनचं मिसिसिपीसंबंधींचं पुस्तक वाचून वाचकाची अशी समजूत होते कीं, लेखक त्या नदीची माहिती मिळविण्यासाठीं बाहेर पडला तेव्हां तो १७ वर्षांचा मुलगा असावा; आपल्याला केवढं मोठं काम करायचं आहे याची त्याला यत्किंचितहि जाणीव नसावी. पण त्या कथेंतला हा झाला कल्पित भाग. पॉल जोन्स बोटीनं सॅम्युएल क्लेमेन्स निघाला तेव्हां तो २१ वर्षांचा होता आणि त्याला तांडेलाचं काम चांगलंच अवगत होतं. कारण हनिबालमधून अनेक तांडेल निर्माण झालेले आहेत. त्या नदीविषयींची माहिती मिळविणं हें सोपं काम नाहीं, हें ज्यानं कधीं प्रयत्न केलेलेच नाहींत अशा कुणाहि माणसाप्रमाणें सॅम क्लेमेन्स-च्याहि लक्षांत येणं स्वाभाविक होतं. असं असूनहि ती छोटीशी बोट धुंदपणें सुस्कारे सोडीत अधिक उष्ण आणि नरम प्रदेशांतून जाऊं लागली तसतशी त्याची बालपणीं बद्धमूल झालेली आकांक्षा पुनश्च डोकं वर काढूं लागली, आणि दूरवरच्या ॲमेझॉनची आणि कोकाची आंस पुसट होत गेली.

पॉल जोन्स या बोटीचा तांडेल होरेस बिक्स्बी हा बत्तीस वर्षें वयाचा मनुष्य ३५ व्या क्रमांकाच्या बेटापाशीं बोटीच्या नाळाकडे पाहत उभा होता तोंच त्याच्या कानांवर मंजुळ आवाजांतले शब्द आले—"गुड मॉर्निंग." बिक्स्बी हा लहान-सर बांध्याचा आणि सरळ प्रवृत्तीचा मनुष्य होता. मागें वळून न पाहतांच तो थोड्याशा झटक्यानेंच म्हणाला, "गुड मॉर्निंग, महाशय!" तांडेलांच्या खोलीत त्याला भेटायला येणाऱ्या पाहुण्यांची तो फारशी कदर करीत नसे. आतां आलेला मनुष्य थोड्याशा अंतरावर त्याच्या मागे उभा होता. "एका तरुणाला ह्या नदीची माहिती मिळवायची आहे. तुमचं काय मत आहे?" त्याच शांत, निश्चयी सुरांत विचारलेला प्रश्न कप्तानाला ऐकूं आला. त्यानं किंचित् मान कलती करून तिरप्या नजरेनं पाह्यलं तेव्हां त्याला एक किरकोळ शरिराचा,

ढिल्या अवयवांचा, बायकी गोऱ्या रंगाचा अन् डोक्यावर पिंगट, कुरळ्या केसांचा भार असलेला तरुण दृष्टीस पडला. "नाहीं आवडणार मला तें. असले बच्चे तांडेल उपयोगी पडण्याऐवजीं त्रासदायक ठरतात जास्त. फायदा कांहीं नाहीं अन् नुसती कटकट मात्र."

पुन्हा शांत स्वर तांडेलाच्या कानांवर आला, "माझा व्यवसाय आहे छापखान्याचा. माझ्या बाबतींत नाहीं तुमचं म्हणणं लागू पडत. दक्षिण अमेरिकेंत जायची माझी इच्छा आहे."

बिक्स्बीनं आपली नदीवर खिळलेली नजर वर उचलली नाहीं. पण त्याच्या सुरांतून औत्सुक्य स्पष्ट दिसत होतं. तो म्हणाला, "बोलतांना पण तूं शब्द असे 'ओढल्या'सारखे कां उच्चारतोस?" 'हेल काढणं' असं म्हणण्याऐवजीं 'ओढणं' हा खलाशांच्या धंद्यांतला शब्द त्यान वापरला. आतां तो तरुण, पाहुण्यासाठीं ठेवलेल्या बांकावर आरामशीरपणें बसून आणखीच संथपणें बोलूं लागला, "त्याचं उत्तर माझी आईच देऊं शकेल. ती सुद्धां असेच शब्द ओढते!" कप्तान बिक्स्बी हसला. ज्या पद्धतीनं उत्तर मिळालं तिचं त्याला हसूं आलं. पाहुणाहि उत्तेजित झाला. त्यानं विचारलं, "बोवेन बंधूंना आपण ओळखतां? सेंट लुई अन् न्यू ऑर्लीन्सला तांडेल आहेत ते?"

"त्या तिघांनाहि मी चांगलाच ओळखतों."

"ते माझे हनिबालमधले शाळासोबती! त्यांतल्या त्यांत सॅम अन् विल यांच्याशीं माझी विशेष घसट असायची."

आतां बिक्स्बीचा सूर स्नेहपूर्ण झाला होता. तो म्हणाला, "इकडे ये अन् माझ्याजवळ उभा राहा. नांव काय तुझं?"

अर्जदारानं नांव सांगितलं. अन् मग दोघेहि त्या सूर्यप्रकाशांत चमकणाऱ्या पाण्याकडे पाहत उभे राहिले.

"मद्य घेतोस?"

"नाहीं."

"जुगार खेळतोस?"

"नाहीं, महाशय."

"शपथा घेतोस?"

"अं, केवळ गंमत म्हणून नाहीं घेत; दडपण आलंच तर घेतों."

"कांहीं तरी सतत चघळतोस?"

"नाहीं, कधींच नाहीं. फक्त मला धूम्रपानाचं व्यसन आहे."

"कधीं कांहीं वल्हविलं आहेस का?"

"मला वाटतं, नदींत मीं आगबोटीखेरीज सारं कांहीं हाकारलंय."

"ठीक तर. हें घे सुकाणूं हातांत अन् बघ या बोटीचं काहीं जमतंय् का. सध्यां चाललीय अशीच चालूं दे, तें तिथं झाड रुतून बसलेलं दिसतंय् ना तिथपर्यंत."

बिक्स्बीचा एक पाय दुखत होता. थोडा वेळ विश्रांति मिळाल्यानं तो आनंदित झाला. जिथून बोटीच्या मार्गावर काळजीपूर्वक नजर ठेवता येत होती अशा बेतानं तो बांकावर टेकला. मग थोड्या वेळानं तो हलकेच म्हणाला, "हें शिकायला एखाद्या तरुणाला ठेवून घ्यायचा एकच मार्ग मला दिसतो—अन् तो म्हणजे पैशाचा."

"किती... पैसे... आकाराल... आपण?"

"पांचशें डॉलर्स. अन् मला कसलाहि खर्च करावा लागतां कामा नये."

'मजजवळ रोकड पांचशें डॉलर तर नाहींत.' असं मनांत येऊन सॅम विचार करूं लागला. पामेलाचा नवरा विल्यम मॉफेट याला कर्ज काढायला न लावतां आपण त्याच्याकडून शंभर डॉलर उसने आणूं शकूं. तो म्हणाला, "ठीक तर. शंभर डॉलर मी तुम्हांला रोख देतो. आणि माझी मिळकत सुरू झाली कीं बाकीचे देऊन टाकीन."

कसं कुणास ठाऊक, पण या तरुणानं होरेस बिक्स्बीचं मन जिंकून घेतलं होतं. त्याचं संथ आणि मंजुळ बोलणं, शांत अन् स्वस्थ चित्तान सुकाणूं हातांत धरण्याची त्याची पद्धत अन् उघड उघड दिसणारा त्याचा साधेपणा अन् प्रामाणिकपणा—! त्याच्या अटी मान्य झाल्या. न्यू ऑर्लीन्सपर्यंतच्या उरलेल्या प्रवासांत हा नवा विद्यार्थी बराच वेळ सुकाणूं धरून बसला होता. श्री. बिक्स्बी दुखऱ्या पायावर इलाज करीत करीत त्याला सूचना देत होते. सॅम्युएल क्लेमेन्सच्या मनांत अजून रेंगाळणाऱ्या वाङ्मयीन महत्त्वाकांक्षा आतां पार नाहींशा झाल्या. अन् तो न्यू ऑर्लीन्सला पोंचला तेव्हां तर, आपण कधीं काळीं छापखान्यांत काम करीत होतों या गोष्टीचं त्याला जवळजवळ पार विस्मरण झालं. ॲमेझॉन अन् कोकाबद्दल बोलायचं तर नंतर अनेक वर्षांत एकहि बोट जणुं तिकडं गेलीच नाहीं. आतां ह्या संभाव्य साहसी प्रवाशाला या गोष्टीची जरा गंमतच वाटली. कारण त्याच्या पुरातन आणि चिरवांछित स्वप्नांच्या अनुरोधानंच परमेश्वर त्याचं आयुष्य नियंत्रित करीत होता.

न्यू ऑर्लीन्सला गेल्यावर बिक्स्बींनीं पॉल जोन्स बोट सोडून सेंट लुईच्या एका सुरेख बोटीवरची नोकरी पत्करली. अन् आपल्या 'बच्च्या' तांडेलालाहि

बरोबर घेतलं. वैभव पायाशीं येत होतं. पण पुढं दुःखहि वाढून ठेवलं होतं. अद्याप त्यानं नदींतनं मार्ग काढण्याचं शिक्षण घ्यायला सुरुवात केलेली नव्हती. फक्त मार्गदर्शनानुसार तो मार्ग आक्रमीत होता. नदींतनं मार्ग काढणं अवघड आहे हें त्याला ठाऊक होतं, पण तें किती अवघड आहे याची त्याला मुळींच जाणीव नव्हती.

त्या काळांत मिसिसिपी नदींतला तांडेल म्हणेल तो कायदा अशी परिस्थिति होती. त्याच्या वर असें कुणीहि नसे. तो वाटेल तशी बोट नेऊं शकत असे. कोणाचाहि सल्ला न घेतां—कप्तानाचाहि—धंद्याचं नुकसान होईल वगैरे कुठलाहि विचार न करतां तो कुठल्याहि ठिकाणीं बोट नांगरूं शकत असे. अगदीं खास विनाशाप्रत जाईल अशा मार्गानेंहि तो बोट नेत असला तरी कप्तानाला चुंबीत सारं सहन करावं लागे. कारण तांडेल म्हणेल तो कायदा होता ना!

शिवाय तांडेल म्हणजे एक सद्‌गृहस्थ असे. त्याचं काम स्वच्छ अन् शारीरिक दृष्ट्या कमी कष्टाचं असे. बंदरांत नांगर टाकला कीं त्याचं काम संपे अन् पुन्हां प्रवाहांत शिरण्यास बोट निघेतोंपर्यंत सुरू होत नसे. आणखी त्या काळाच्या मानानें त्याला पगार मिळे राजासारखा. अमेरिकेच्या उपाध्यक्षाला त्याच्यापेक्षां जास्त पगार नसे. आतां प्रतिष्ठेच्या दृष्टीनं म्हणाल तर मिसिसिपींतला तांडेल एकदां आपल्या त्या कांचेच्या खोलींतल्या उच्चासनावर विराजमान झाला कीं, अत्यंत अद्ययावत् कपडे घातलेल्या ह्या सुविख्यात अन् भपकेदार प्राण्याकडे सारीं जणं पाहत आणि त्याचा हेवा करीत असत. अर्थातच नदीची आवड आणि प्रतिष्ठेची बालसुलभ आसक्ति यामुळें हा शाही दर्जा आपल्याला मिळावा असं सॅम क्लेमेन्सला वाटल्यास नवल तें कसलें? अन् आतां खऱ्याखुऱ्या उमेदवार तांडेलासारखा त्यानं महान् नदीचा प्रवास सुरू केला तेव्हां अभिमानानं त्याचा ऊर कसा भरून आला असेल त्याची कल्पना आपण करूं शकतों. आज त्याचा शिक्षक जसा उभा आहे तसाच तो एकदोन वर्षांत हें सुकाणू धरून उभा राहणार होता. राजासारखी प्राप्ति होईल अन् सारं कांहीं—जें जें त्या महान् नदीच्या संदर्भात त्याच्या डोक्यांत भरलेलं होतं तें सारं मिळणार होतं. अन् ह्या शेवटच्या गोष्टींतच संकटाची चाहूल दडलेली होती.

न्यू ऑर्लीन्सहून निघाल्यावर प्रथम थोडा वेळ श्री. बिक्स्बी यांनीं स्वतःहून नदीची माहिती अगदीं सहजतेनं दिली. आपल्या पहाऱ्याचे चारहि तास ते बोलत होते. त्यांचा दुसरा पहारा सुरू झाला मध्यरात्रीं—! तांडेलांना बोटी चालवण्यासाठीं रात्रीचं उठावं लागतं हें पाहतांच आपल्याला किती आश्चर्य

वाटलं अन् किती चीड आली तें मार्क ट्वेननं पुढें सांगितलं. समोर काळाकुट्ट अंधार पसरलेला असतांना श्री. बिक्स्बी जणुं काहीं स्वच्छ सूर्यप्रकाशांत आपण बोट चालवतोंयू अशा थाटांत बोट पुढें नेत असलेले पाहून तर त्याला विलक्षण आश्चर्य वाटलें. मार्क ट्वेननं म्हटलं आहे, "थोडयाच वेळांत ते माझ्याकडे वळून म्हणाले, 'न्यू ऑर्लीन्स सोडल्यानंतरचा पहिला टप्पा कोणता?' या प्रश्नाचं उत्तर तावडतोब देतां आलं, याचं मला समाधान वाटलं. मीं म्हटलं, 'मला ठाऊक नाहीं!'

'ठाऊक नाहीं?' त्यांचा तो सूर ऐकून मला धक्काच बसला. 'तूं तर चांगला हुषार मुलगा आहेस.'—श्री बिक्स्बी म्हणाले, 'बरं, नंतरच्या टप्प्याचं नांव काय?'—अन् पुन्हा 'मला ठाऊक नाहीं.'

'आतां कमाल झाली बुवा! हें बघ, आपण निघतों कुठून? बाराव्या मैलाचा टप्पा गेल्यावर काय ओलांडतों आपण?'

'म—मला ठाऊक नाहीं.'

'त—तुला ठाऊक नाहीं?'—बोलतांना अडखळण्याची नक्कल करीत त्यांनीं विचारलं, 'मग तुला काय ठाऊक आहे?'

'म—मला—कांहींच ठाऊक नाहीं.'

बिक्स्बी हे चिडखोर, तापट अन् तडातडा बोलणारे गृहस्थ होते. थोडंसं दूर जाऊन ते बरंचसं फाड फाड, लागण्यासारखं बोलले. अन् मग म्हणाले, 'हें बघ, तीं टप्प्यांचीं नांवं तुला कशाकरतां मीं सांगितलीं होतीं असं वाटतं तुला?'

थरथर कांपत मीं क्षणभर विचार केला अन् मग कुठल्या सैतानानं मला बळ दिलं कुणास ठाऊक, पण मीं म्हटलं, "मला—वाटलं–आपलं–स–सहज गंमत म्हणून.'

रागानं त्यांचा नुसता भडका उडाला. (त्या वेळीं नदीपार करून ते बोट नेत होते.) रागानं ते अगदीं आंधळे झाले असावेत. कारण रागाच्या भरांत त्यांनीं आपली बोट व्यापारी–होडीच्या वल्ह्यावरून नेली. अर्थात् त्या व्यापाऱ्यांनीं त्यांना शिव्यांची लाखोली वाहिली. ती श्री. बिक्स्बी यांना अत्यंत उपकारक ठरली. कारण ते अगोदरच रागानं लाल झालेले होते. त्यांनीं खिडकी उघडून डोकं बाहेर काढलं आणि त्या व्यापाऱ्यांना पुष्कळच गोष्टी सुनावल्या. असली खडाजंगी मीं यापूर्वी कधींच ऐकली नव्हती...त्यांनीं खिडकी बंद केली तेव्हां त्यांचं मन खूपच हलकं झालं होतं. मग अत्यंत सौम्य सुरांत ते मला म्हणाले, 'पोरा, तुला एक छोटीशी स्मरणवही आणायला हवी. मी जें कांहीं सांगत जाईन तें

तूं त्या वहींत लगेच लिहून घेत जा. तांडेल व्हायचा एकच मार्ग म्हणजे ह्या नदीची सगळी माहिती अगदीं तोंडपाठ पाहिजे. अगदीं ए, बी, सी, ह्या मुळाक्षरांसारखी घोकली पाहिजे.' दुसरा दिवस उजाडतांच पडलेल्या पहिल्या मुक्कामांतच सॅम क्लेमेन्सनं विकत आणलेली ती छोटी स्मरणवही अजून आहे. "शहरें, टप्पे, अडथळे, बेटें, वळणें, धक्के वगैरेंच्या नांवानें ती पार गजबजून गेली आहे." तो म्हणे. पण फक्त निम्म्या नदीचीच माहिती वहींत नोंदवून घेऊं शकल्याबद्दल त्याचं अंतःकरण दुःखानं व्याकुळ होऊन जाई. कारण चार-चार तासांनीं त्यांचे पहारे सुरू होत. अन् चार तासांचा खंड पडून त्यांना झोप घ्यावी लागे.

सर्वसाधारण माणसाला त्यांतली एकादी नोंद दहा सेकंद देखील डोळ्यांपुढं धरावीशी वाटणार नाहीं. पण तो सेंट लुईला पोंचला तेव्हां त्यानं इतक्या नोंदी केल्या होत्या कीं, नुसत्या कल्पनेनंच आपलं डोकं दुखायला लागतं. आणि जे चार तास तो झोपत असे, त्या वेळींहि त्या गोष्टीच त्याच्या डोक्यांत घोळत असत. अन् आज ६० वर्षांनंतरहि त्यांच्यामागील व्याकुळ अंतःकरण अजून दृग्गोचर होतं. ही वही बाजूला ठेवून दुसऱ्या फेरीच्या वेळेला त्यानं बहुधा नवी विकत आणली असावी.

कबूल केल्याप्रमाणें शंभर डॉलर देतां यावेत म्हणून सॅमनं सेंट लुईच्या मेव्हण्याकडून तेवढी रक्कम उसनी घेतली. अन् बिक्स्बीशीं झालेला करार पुरा केला. कांहीं दिवसांनीं त्याच्या गुरूला एका उत्कृष्ट बोटीवर काम मिळालं. तो म्हणे, "ती बोट म्हणजे एक वैभवशाली मंदिरच होतं जणुं. आंतून सगळीकडे पितळी चकचकाट अन् तांडेलांची खोली तर पाण्यापासून इतकी वर होती कीं, एकाद्या पर्वतावर बसल्यासारखं वाटे." पण पुन्हां एकदां तो नैराश्याच्या खोल गर्तेत लोटला गेला. कारण बोट सुरू झाल्यावर त्यानं आपल्या ज्ञानाचा आढावा घ्यायला सुरुवात केली अन् त्याला दिसून आलं कीं, आपल्याला या नदीची लवमात्रहि माहिती नाहीं. सारंच बदललं होतं—म्हणजे आतां तो उलट दिशेनें चालला होता. अगोदरच ते चार चार तासांचे खंड पडलेले, त्यांतून हा बदल—तो पुरता गोंधळून गेला.

जगाला मार्क ट्वेन या नांवानं ठाऊक असलेल्या ह्या संथ, स्वप्नाळू, अव्यवहारी माणसानं मिसिसिपी नदींतून बोटी हाकारण्यासाठीं आवश्यक असलेलं प्रचंड, परिपूर्ण अन् अमर्याद माहितीचं भांडार प्राप्त करून घेण्याची चिकाटी कशी काय दाखवली असेल? त्याचं उत्तर असं कीं, नदीवर, आगबोटीच्या

सौंदर्यावर अन् तिच्यांतल्या काव्यावर, तांडेलाच्या जीवनांतल्या स्वास्थ्यावर अन् वैभवावर त्याचं प्रेम होतं. स्मृतिचित्रं लिहिणाऱ्या प्रस्तुत लेखकाला होरेस बिक्स्बी म्हणाले, "सॅम नेहमींच चांगला वागला. नदीविषयींची त्याची आसक्ति अत्यंत स्वाभाविक होती. त्याची स्मरणशक्तीहि फार चांगली होती. मीं सांगितलेलं तो कधीं विसरला नाहीं." मर्क ट्वेन आपल्याला सांगतो, "सारं कांहीं ठीक चासलेलं असतांना एक दिवस माझ्या गुरूनं मला अचाकनपणें सवाल टाकला, 'अक्रोडाचं वळण कोणत्या प्रकारचं असतं?' त्यानं वनस्पति अन् प्राण्यांच्या मूळ जीवनरसाविषयीं माझ्या आजीचं मत काय आहे असं विचारायला देखील कमी केलं नसतं. अत्यंत आदरान मीं त्याना म्हटलं, 'अक्रोडाला विशिष्ट प्रकारचा बांक असतो हें मला ठाऊक नव्हतं.'

अर्थातच या उत्तरानं, जमदग्नीचा अवतार असलेले आमचे गुरु भडकले. मी स्तब्ध होतों. मग हळूहळू ते नीट सागूं लागले, 'पोरा, नदीच्या आकाराची अगदीं परिपूर्ण कल्पना तुला असायला हवी. अत्यंत काळोख्या रात्रीं बोट हाकारायची म्हणजे ही माहिती हवीच. तसल्या काळोखांत सारं कांही अदृश्य होऊन जातं बघ. नदीचा आकार दिवसा जसा असतो तसा रात्रीच्या वेळीं असत नाहीं.'

'मग हें सारं मी शिकणार तरी कसं?'

'घरांतल्या दिवाणखान्यांत तूं रात्रीच्या वेळीं देखील कसा फिरूं शकतोस? त्याचा आकार तुला पुरता ठाऊक असतो म्हणून. तो कांहीं तुला दिसत नाहीं.'

'अफाट पसरलेल्या ह्या नदीच्या काठांत होणारे लक्षावधि किरकोळ बदल देखील मला घरांतल्या दिवाणखान्याच्या आकारासारखे पुरेसे ठाऊक असायला पाहिजेत म्हणतां?'

'अरे बाबा, स्वतःच्या घरांतल्या दिवाणखान्याच्या आकारापेक्षां अधिक चांगलं ज्ञान मिळवलं पाहिजे या फेरबदलांचं.'

'बाप रे! त्यापेक्षां मरण पत्करलं!'

ती माहिती मिळविण्याचा उद्योग सॅम्युएल क्लेमेन्सनं पुढें चालू ठेवला, यावरून त्याला नदीविषयीं तीव्र आसक्ति होती हें तर सिद्ध होतंच—पण प्रथमश्रेणीच्या लोकांत क्वचितच आढळणारा दृढनिश्चयहि त्याच्या अंगीं होता हें सिद्ध होतें.

बोटी हाकारणं हा सॅम क्लेमेन्सच्या मिसिसिपीवरील शिक्षणाचा एक भाग होता. नदीच्या पात्रांतील खडक आणि उथळ जागा जशा त्यानं अभ्यासिल्या तशाच मानवी स्वभावांतीलहि अभ्यासिल्या. एके ठिकाणीं त्यानं म्हटलंय, थोड्या परंतु मनःपूर्वक परिश्रम घेऊन केलेल्या अभ्यासाच्या त्या काळांत, कथा काद-

बऱ्या, चरित्रें किंवा इतिहासांत सांपडणाऱ्या मानवी स्वभावाच्या विविध नमुन्यांचा मला अगदीं व्यक्तिगत आणि प्रत्यक्ष परिचय करून घेतां आला." विविध नमुन्यांशीं परिचय झाला, परंतु स्थूल स्वरूपाचा. दारू आणि पत्ते यांना स्पर्श न करण्याविषयीं आईला दिलेलं वचन सॅमनं उमेदवारीच्या ह्या काळांत पाळलं हें आवर्जून लक्षांत घेण्यासारखं आहे.

मिसुरी नदीकडून तांडेलांना निमंत्रण आल्याकारणानें होरेस बिक्स्बी यांनीं आपल्या विद्यार्थ्याला जॉन जे. रो च्या एका मालवाहू बोटीच्या तांडेलाच्या स्वाधीन केलं. ही मालवाहू बोट एका सेवानिवृत्त शेतकऱ्याच्या मालकीची होती अन् तोच तिची व्यवस्था पाहत असे. त्यानं केलेलं आदरातिथ्य पाहून सॅमला आपला मामा जॉन क्वार्ल्स् याची आठवण झाली. रो बोट सॅमला आवडली. तिच्यावरून उतारू नेण्याची परवानगी नव्हती. पण मालकाच्या नात्यांतलं कोणतं ना कोणतं कुटुंब सदैव बोटीवर असायचं. नृत्यासाठीं बोटीवर मोठी डेक होती अन् केबिनमध्यें एक पियानोहि होता. रो बोट म्हणजे निव्वळ स्वर्ग होता, पण सॅमचं तिच्यावरचं वास्तव्य फार काळ टिकलं नाहीं. बिक्स्बी मिसुरीकडून परत आले अन् 'पेन्सिल्व्हानिया' नामक एका मोठ्या उतारूवाहू बोटीचा तांडेल ब्राऊन याच्या ताब्यात आपल्या शिष्याला देतांना आपण फार मोठं सत्कृत्य करीत आहोंत असं त्यांना वाटलं. त्या वेळीं त्या नदीवरील सर्वांत चांगली अन् नवी कोरी बोट होती ती. एव्हांना सॅम बोटीचं सुकाणू धरण्यांत तरबेज झाला होता. अर्थात् ही नवी व्यवस्था सर्वांनाच चांगली वाटली.

पण ब्राऊन हा गृहस्थ जुलमी, निरक्षर अन् रांगडा होता. प्रथमपासूनच सॅमविषयीं त्याच्या मनांत तिटकारा होता. त्यानं विचारलेला अगदीं पहिला प्रश्न वरून दिसायला साधाच होता, पण त्याची बोलण्याची पद्धत मात्र अपमानकारक होती. "तूं बिग्जबीचा बच्चा काय ?" नदीवरील बोलीभाषेंत सारे जण 'बिक्स्बी' चा उच्चार 'ब्रिग्जबी' करीत असत. शक्य तितक्या सभ्यपणें सॅमनें त्याच्या प्रश्नाला होकारार्थी उत्तर दिलं. मग ब्राऊन सॅमचे कपडे अन् इतर वैयक्तिक गोष्टींवर टीका करूं लागला. सॅमनं ब्राऊनला खूष करण्यासाठीं पुष्कळ खटपट केली, पण तिचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. ब्राऊनचं समाधान कधींच झालं नाहीं. बोटीचं सुकाणू सॅमनं धरलेलं असलं कीं, बांकावर बसल्या बसल्या ब्राऊन ओरडे, "ए, आतां कुठं चालला आहेस ? खेंच, खेंच खालीं बोट ! ऐकूं येतंय् का ? ब्रिह्वीच्या—!" आपल्या नव्या गुरूचा लौकरच सॅमला तिटकारा येऊं लागला. अन् त्याला कशी अद्दल घडवावी याचाच एकसारखा विचार तो करूं लागला.

ब्राऊनला खूष करण्याची धडपड मग त्यानं सोडून दिली, एवढंच नाहीं तर मधूनमधून तो त्याला मुद्दाम भडकवायला लागला. एकदां असंच शिष्यवराच्या हातीं सुकाणूं होतं अन् बोटीनं चमत्कारिक दिशा घेतल्याचं गुरुजींच्या ध्यानांत आलं. "ए, कुठं चालला आहेस?" तो किंचाळला—"तूं चाललायस तरी कुठं?—ए? रेम्याडोक्या कुठला!"

सॅम आपल्या नेहमींच्या संथ, शांत सुरांत उत्तरला, "कां बरं? दुसऱ्या कोणत्या दिशेनं बोट न्यावी असं मला कांहींच दिसत नाहीं; म्हणून कांठावर ती पांढरी कालवड आहे ना, तिच्याच रोखानं चाललोंय्!"

"चल हाकल, आण तें सुकाणूं! चालता हो माझ्या खोलींतनं!"—ब्राऊन किंचाळला, "तांडेल व्हायची लायकीच नाहीं तुझी!" सॅम या आज्ञेचं स्वागत करायला जणुं तयारच होता.

आतां नदीवर काम करायला लागून त्याला वर्ष झालं होतं. एवढ्यांत त्यानं बरंचसं शिकून घेतलं होतं अन् सुकाणूं धरण्यांत तो तरबेजहि झाला होता. परंतु अद्याप त्याला वेतन असं मिळालंच नव्हतं. तसं त्याला खानावळीचं बिल द्यावं लागत नसे, पण प्रत्येक फेरीला 'पेन्सिल्व्हानिया' बोट न्यू ऑर्लीन्सला दोन दिवस अन् दोन रात्री थांबत असे. सरकारी मालावर पहारा केला तर एका रात्रीचे अडीच-तीन डॉलर मिळतात हें त्याला कळून चुकलं होतं. अन् महिन्यांतनं एकदांच अशी संधि मिळत असल्यामुळें तेवढी रक्कम फार उपयुक्त असे. त्या पहाऱ्याचा एवढाच लाभ नव्हता. पुढें अनेक वर्षांनीं त्यानें नमूद करून ठेवलंय्—"रात्रीच्या अंधारांत एकट्यानंच त्या मालाच्या ढिगाऱ्यावर पहारा करीत बसतांना कमालीचा एककीपणा वाटे. पण तो अनुभव कांहीं अगदींच लाभदायक नव्हता असं नाहीं. तसा रात्रीच्या वेळीं मी बसून राहिलों कीं मला स्फूर्ति येत असे. निरनिराळ्या शक्यता, विविध प्रसंग, घटना मी कल्पनेंत आणीत असें. याच गोष्टी पुढें हळू हळू माझ्या लिखाणांत आल्या. अनेक प्रकरणें त्यायोगें मी भरून काढूं शकलों. कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपांत त्या रात्रींतल्या विचारांचा परिणाम माझ्या लिखाणावर झाला आहे हें माझ्या बहुतेक पुस्तकांतून मी दाखवून देऊं शकेन."

ब्राऊनबरोबर काढलेल्या काळासकट सुकाणूं हातांत धरून नावाड्याचं जीवन जगण्यांत एक प्रकारची मौज होती. सेंट लुईला क्लेमेन्स आपल्या बहिणीकडे उतरत असे. तिथं बऱ्याच वेळां हनिबालचे त्याचे दोस्त आलेले असत. त्या फाऱ्यावरच्या प्रवासांत दोन्ही टोकांना त्याला परिचित बोटी भेटत. विशेषतः रो

बोटीवर तर त्याचं भव्य स्वागत होई. क्वचित् 'पेन्सिल्व्हानिया' बोटीवर चित्त-थरारक साहसाचा अनुभव येई. १८५८ च्या मार्च महिन्यांत लिहिलेल्या एका पत्रांत या तरुण नावाड्यानं, हॅट बेटाजवळ बर्फाची खोली मोजण्यासाठीं सर्वांनीं रात्रभर कशी मेहनत केली तें लिहून ठेवलंय् : "हातांत वल्हं घेऊन नावाडी ब्राऊन नाळावर उभा होता. सुकाणूची दांडी माझ्या हातांत होती. छोटी नाव आम्हांला बर्फाच्या मोठ्या खडकापर्यंत घेऊन जाईल अन् मग सारं कांहीं सुरक्षित होईल. बोटीच्या खालच्या भागांत ब्राऊन आडवा झाला तोंवर बाकीच्यांनीं पटापट सारं काम उरकलं. सुमारें तासभर मेहनत केल्यावर आम्ही परतलों. तेव्हां आमच्या वल्ह्यांवर अर्धा इंच जाडीचा बर्फाचा थर सांचला होता...दुसऱ्या दिवशीं तर थंडी जास्तच होती. मला दोनदां छोट्या नावेंतनं बाहेर जावं लागलं. मग मात्र मार्ग मोकळा झाला. पण ती प्राणघातक बोट आमच्या अंगावरून जाणार होती. बेटाजवळ 'मारिया डेनिंग' नांवाची बोट वाळूंत रुतून बसली होती. त्या मंडळींनीं आम्हांला मोठमोठ्यानें ओरडून इशारा दिला. आम्ही बाजूला गेलो. त्यांनीं आम्हांला वर उचलून बोटीवर घेतलं—अन् ऊब आणण्यासाठीं आम्हांला शेक दिला. पहाटे चारपासून सकाळीं साडेनवापर्यंत एकदांहि शेकोटी-जवळ आम्ही जाऊं शकलो नव्हतों; बाहेर थंडींतच होतों. माणसांवर, नावेवर, दोरखंडांवर—जवळजवळ प्रत्येक वस्तूवर बर्फाचा चांगला दाट थर सांचला होता. अन् आम्ही बर्फाच्या खडकांतनं घडवलेल्या पुतळ्यासारखे दिसत होतों."

'पेन्सिल्व्हानिया' बोटीवर धाकटा भाऊ हेन्री याच्यासाठीं आपण कार-कुनीची एक नोकरी कशी शोधली हेंहि त्यानं त्याच पत्रांत लिहून ठेवलंय्. हेन्री आतां वीस वर्षांचा झाला होता. तो दिसायला सुरेख अन् वागणुकीनं सौम्य होता. सॅमला त्याच्याविषयीं मनस्वी प्रेम अन् अभिमान वाटे. हेन्रीनं आपल्याबरोबर असावं, त्याच्या जीवनाला नीट प्रारंभ व्हावा असं या तरुण नावाड्याला फार वाटत असे. त्या मुलासाठीं सद्भावनेनं केलेल्या प्रयत्नांतनंच पुढें केवढं दुःख कोसळणार आहे तें त्याच्या स्वप्नांतहि आलं नसेल.

याच सुमारास 'पेन्सिल्व्हानिया' बोटीवर एक घटना घडली अन् सॅमची तिच्यावरची नोकरी संपुष्टांत आली. प्रवाहानुकूल दिशेनं बोट चालली होती. 'ईगल बेंड'पाशीं बोट येतांच हेन्री क्लेमेन्स डेकवर आला अन् थोडं पुढं जातांच बोट नांगरावीं, अशी कॅप्टनची सूचना त्यानं कळविली. आपण थोडेसे बहिरे आहोंत हें ब्राऊन कधींच कबूल करीत नसे. बहुधा त्याला ती आज्ञा नीटशी कळलीहि नसावी. जिथं बोट थांबवायला हवी होती तिथनं ती पुढं सरकत असतांनाच

कॅप्टन डेकवर येऊन दाखल झाला.

ब्राऊनला त्यानं विचारलं, "इथं बोट नांगरण्याविषयीं हेन्रीनं तुला सांगितलं नाहीं का ?"

"नाहीं."

कॅप्टन क्लाइनफेल्टर सॅमकडे वळून म्हणाले, "तूंहि ऐकलं नव्हतंस का ?"

"ऐकलं होतं."

ब्राऊन ओरडला, "तोंड आटप! तूं तसलं कांहीं देखील ऐकलेलं नाहींस."

डेकवर तंटा चालू असेल याची दखलहि हेन्रीला नव्हती. तो सहजच तेवढ्यांत तिथं आला. त्याच्या अंगावर धावून जाऊन ब्राऊन किंचाळला, "हेन्री, त्या मळ्यापाशीं बोट नांगरायची आहे हें तूं मला कां नाहीं सांगितलंस ?"

अत्यंत सभ्यपणें हेन्री म्हणाला, "मिस्टर ब्राऊन, मीं आपल्याला तें सांगितलं होतं."

"खोटं बोलतोस!"

ब्राऊननं आपल्याला शिव्या दिल्या तरी चालतील, पण हेन्रीला तो वाटेल तें बोलूं लागला तर सॅमला तें खपलं नसतं. सॅम म्हणाला, "तुम्हीच खोटं बोलताय्. त्यानं तुम्हांला सांगितलं होतं."

शिकाऊ तांडेलानं आपल्या गुरूला विरोध करायचा म्हजे काय! ब्राऊन संतापानें बेभान झाला. तो सॅमला म्हणाला, "थांब! अर्ध्या मिनिटांत तुझ्या प्रकरणाचा निकाल लावून टाकतों." अन् हेन्रीला तो म्हणाला, "चालता हो इथनं!" ब्राऊननं हेन्रीची कॉलर पकडून त्याच्या तोंडावर एक ठोसा लगावला तेव्हां खरं म्हणजे हेन्री जायला निघालाच होता. क्षणार्धांतच एका अवजड चौपाईच्या मदतीनं ब्राऊनला खालीं पाडून सॅम त्याच्या छातीवर बसला. अन् मग महिनो-गणती दबून राहिलेला सॅमचा संताप उफाळून वर आला. छातीवर बसून दोन्ही गुडघ्यांनीं त्याला गच्च आवळून धरून सॅमनं ब्राऊनला ठोशावर ठोसे ठेवून द्यायला सुरुवात केली अन् त्याच्या हतांतली सारी शक्ति संपली तेव्हांच तो थांबला.

उतारू आणि सफेद झगे घातलेले कांहीं नोकर डेकवर जमले होते, त्यांनीं टाळ्या वाजवून विजेत्याचं अभिनंदन केलं. कॅप्टन क्लाइनफेल्टर यांना भेटण्यासाठीं सॅम खालीं गेला. तांडेलाला मारणं ही गोष्ट बंडांत जमा होत असल्यानें आपल्याला तुरुंगांत डांबतील अशी त्याची अपेक्षा होती. कॅप्टननं सॅमला आपल्या खासगी खोलींत बोलावून त्याच्याकडे कांहीं चौकशी केली. 'मिसिसिपी' वरील पुस्तकांत मार्क ट्वेननं त्यासंबंधीं लिहून ठेवलंय : 'कॅप्टन

क्लाइनफेल्टर यांनीं विचारलं, "तूं त्यांना प्रथम मारलंस का?"

"होय, महाशय."

"कशानं मारलंस?"

"चौपाईनं."

"जोरानं?"

"माफक."

"त्यानं ते खाली पडले का?"

"त—ते पडले."

"लगेच तूं त्यांना पुन्हा मारलंस? लगेच तूं काय केलंस?"

"होय."

"काय केलंस?"

"त्यांना मीं ठोकलं."

"त्यांना ठोकलंस?"

"होय, महाशय."

"फार—म्हणजे फारच जोरानं ठोकलंस का?"

"तसं कुणी म्हणूंहि शकेल कदाचित्."

"तर मग अतिशय आनंद झालाय्! ए, पण हें कुठं कुणाला सांगूं नकोस! तूं फार मोठा गुन्हा केला आहेस. अन् ह्या बोटीवर असला गुन्हा पुन्हां कधीं करूं नकोस. पण किनाऱ्यावर उतरल्यावर गांठ त्याला. अन् चांगलं बडवून काढ. कळलं? काय खर्च येईल तो मी देईन."

सॅम बोटीवर राहणार असला तर न्यू ऑर्लीन्सलाच आपण बोट सोडून जाणार असं ब्राऊननं जाहीर केलं. कॅप्टननं त्याला सांगितलं, "खुशाल सोडून जा." अन् सेंट लुईला परत जाईपर्यंत दिवसाचे पहारे करण्याची जबाबदारी खुद्द सॅमवर सोपवायची तयारी त्यानं दाखवली. यावरून या तर्कटी तांडेलावरची त्याची श्रद्धा व्यक्त होत होती. खुद्द 'बच्च्या'ला मात्र एवढा विश्वास नव्हता. 'एवढा परतीचा प्रवास ब्राऊनला करूं द्यावा, मी पाठोपाठ दुसऱ्या बोटीनं येतों.' असं सॅमनं सुचवलं. ह्या निर्णयानंच त्याचा जीव बचावला. त्या रात्रीं सरकारी मालावर पहारा करण्याच्या कामांत, हेन्रीनं आपलं रोजचं काम संपल्यावर सॅमची संगत केली. दोघां भावांनीं मिळून गस्त घातली. सॅम्युएल क्लेमेन्स म्हणाला, "हेन्री, कधीं अपघात झालाच तर तूं डोकं शाबूत ठेव. बाकीचे उतारू गांगरतील. डेककडे धाव घ्यावी, लाईफ बोट ताब्यांत घ्यावी अन् दुय्यम तांडेलाच्या आज्ञा

पाळाव्यात. होड्या पाण्यांत उतरल्या कीं बायका-मुलांना त्यांत उतरायला मदत करावी. तूं स्वतः त्यांत उतरूं नकोस. नदीचं पात्र फक्त मैलभर रुंद आहे. तूं सहज पोहून जाऊं शकशील. " हा सल्ला चांगला अन् शूराचा होता, पण त्यामागं केवढं दुःख दडलेलं होतं.

परतीचा प्रवास सॅम क्लेमेन्सनं 'ए. टी. लेसी' नांवाच्या बोटीनं केला. ती 'पेन्सिल्व्हानिया' पेक्षां दोन दिवस उशिरा निघाली. मिसिसिपींतल्या ग्रीनव्हिलपाशीं त्याची बोट येतांच किनाऱ्यावरून आवाज आला: "आतांच मेम्फिसच्या पलीकडे शिप् आयलंडजवळ 'पेन्सिल्व्हानिया' बोटीवर प्रचंड स्फोट होऊन दीडशें लोक प्राणांस मुकले!" ती बातमी खरी ठरली. जूनच्या मध्याचा सुमार. वेळ सकाळीं सहाची. 'पेन्सिल्व्हानिया' बोटीवरल्या आठांपैकीं चार बॉयलर्सचा एकाएकीं स्फोट झाला. त्याचा परिणामहि भयंकर झाला. बळी पडलेल्यांत हेन्री क्लेमेन्स हा एक होता. किनारा कांहींशें यार्डांवर होता. अन् हेन्रीनं पोहायला प्रारंभहि केला होता. पण इतरांना वांचवायच्या कामात मदत करण्यासाठीं माघारीं फिरला तो. नंतर काय घडलं तें नीटसं कळलं नाहीं. तो जबर जखमी झाला अन् या भयानक दुर्घटनेनंतरच्या चौथ्या रात्रीं मरण पावला.

सॅमच्या दुःखाला सीमा नव्हती. घरीं धाडलेल्या पत्रांत, मृत्युशय्येवर पडलेल्या आपल्या भावाबद्दल 'माझा लाडका, माझा स्वाभिमान, माझं वैभव, माझं सर्वस्व' अशीं विशेषणं त्यानं लावलेलीं सांपडतात. प्रचंड दुःखानं त्याच्या आयुष्याचा पूर्वार्ध झांकळला होता. चेहऱ्यावर पूर्वीचं तेज परत आलं. पण गांभीर्य अन् कारुण्याची छटा मात्र त्या वेळेपासून तो निवांत असला कीं सदैव त्याच्या चेहऱ्यावर दिसून येई. पुरता तेवीस वर्षांचा नसूनहि तो तिशीचा दिसायला लागला. त्याचा स्वभाव, त्यांतलं चैतन्य, त्याच्या चेहरेपट्टीची ठेवण वगैरेंमुळें सॅम्युएल क्लेमेन्स कधींच म्हातारा होणं शक्य नव्हतं. अन् पुन्हा तो कधींहि पूर्वीसारखा तरुण दिसणंहि शक्य नव्हतं.

तो जॉर्ज एलर यांच्या आग्रहाखातर तांडेलाच्या जागेवर परतला. त्यांच्यावर त्याचं फार प्रेम होतं. त्याच वर्षीच्या सप्टेंबरांत सेंट लुई ते न्यू ऑर्लीन्सपर्यंतचा मिसिसिपी नदींतला तांडेल म्हणून त्यानं परवानाहि मिळवला. शिष्यवराच्या हातीं परवाना येण्याच्या सुमारासच बिक्स्बी मिसुरीहून परतले होते. त्यांनीं ताबडतोब 'क्रेसंट सिटी' नांवाच्या बोटीवर त्याला आपला संपूर्ण भागीदार म्हणून घेतलें. नंतरहि 'सिटी ऑफ मेम्फिस' आणि पुढें 'अॅलोन्झो चाइल्ड' या मोठ्या बोटींवरहि ते एकत्र होते असं दिसतं.

७.

## तांडेल आणि सैनिक

सॅम्युएल क्लेमेन्सच्या दृष्टीनं हे सुखाचे दिवस होते; अन् कांहीं बाबतींत तर पुढें कधींहि दिसणार नव्हते असे हे अत्यंत सुखाचे दिवस होते. तो आईला सढळ हातानं मदत करूं शकत होता. अन् स्वतःसाठीं दरमहा शंभर डॉलर मागें टाकूं शकत होता. त्याला कसली काळजी अशी नव्हतीच. ह्या कामांतलं स्वास्थ्य, गंमत अन् स्वातंत्र्य या साऱ्यांवरच त्याचं प्रेम होतं. पुढील आयुष्यांत इतका लोभ त्यानं कशावरच धरला नाहीं. नदीवरच्या लोकांत त्याची लोकप्रियता फार होती. त्याच्या विनोदी गोष्टी अन् त्याचं हेल काढून बोलणं यामुळें तो कुठंहि दिसला तरी त्याच्याभोंवतीं गर्दी गोळा होई. त्या काळांतला त्याचा एक मित्र लिहितो: "त्याच्या विनोदी गोष्टी ऐकून श्रोते पोट धरधरून हसत. अन् तो मात्र सारा वेळ चेहरा अगदीं निर्विकार ठेवून बोले. मधून मधून त्याच्या विक्षिप्त गोष्टी वृत्तपत्रांतून छापून येत. त्या बहुधा त्यानंच लिहिलेल्या असाव्यात."

ब्रिक्स्बी म्हणतात, "सॅमच्या हातीं सुकाणूं नसे तेव्हां तेव्हां तो कांहीं तरी खरडीत असायचा." 'इसय्या सेलर्स' हें प्रहसन लिहून त्यानं फारच चांगली कामगिरी केली. खरं म्हणजे त्यानं तें कांहीं छापण्यासाठीं लिहिलं नव्हतं. स्वतःची करमणूक व्हावी अन् आपल्या कांहीं दोस्तांना दाखवतां यावं एवढ्यासाठींच त्यानं तें लिहिलं. त्या वेळीं 'एडवर्ड जे. गे' बोटीवर असलेल्या बार्ट बोवेन याच्या हातांत तें पडलं, त्यानं तें न्यू ऑर्लीन्सच्या एका वृत्रपत्रांत छापायला दिलं. कॅप्टन सेलर्सवर लिहिलेल्या या प्रहसनाचा संबंध, मार्क ट्वेन या वाङ्मयांत अत्यंत महशूर असलेल्या नांवाच्या मुळाशीं—किंवा निदान त्याच्या मूळ प्रवर्तकाशीं नसता तर त्याचं महत्त्व एवढं वाटलं नसतं.

पाण्याची खोली मोजण्याच्या यंत्रावर दिसणाऱ्या दोन पातळ्यांना तांडेल वगैरे

लोक मार्क ट्वेन हा शब्द वापरीत असत. इसय्या सेलर्स नांवाच्या जुन्या कर्णधारानें प्रथम हा जोरदार अन् सुखद शब्द वापरला. हा कर्णधार जणुं या नदीवरला सर्वांत जुना रहिवासी होता. तरुण पोरांसमोर आपल्या ज्ञानाचं प्रदर्शन करण्याची त्याला भारी हौस होती. तो मधूनमधून वृत्तपत्रांतनं कांहीं मजकूर लिहीत असे. त्याचं सारं लिखाण चमत्कारिक आणि अहंभावानं भरलेलं असे. नदीवरील संभाव्य फेर-बदल अन् जवळजवळ १८११ सालापासूनचे त्याचे अनुभव तो त्यांतनं सांगे. अन् त्याखालीं 'मार्क ट्वेन' अशीच बहुधा सही करी. साहजिकच तरुण तांडेलांना सेलर्सचं अनुकरण करायला आवडे. सॅमनं या म्हाताऱ्याच्या लिखाणावरच एक प्रहसन लिहिलं. १७६३ सालीं एका चिनी कॅप्टनबरोबर अन् चोक्टॉ नोकरांसह आपण केलेल्या एका अशक्यप्राय सफरीचं वर्णन तो म्हातारा करतोय् अशी कल्पना त्यांत केलेली असल्यानं, विनोदाचा तो अत्युत्कृष्ट नमुना समजला जात असे. १८५९ च्या मे महिन्याच्या 'ट्रू डेल्टा'मध्यें तें प्रसिद्ध झालं अन् कॅप्टन सेलर्सचं वाङ्मयीन अंतःकरण त्यानं विद्ध केलं. त्यानंतर त्यानं एकहि ओळ लिहिली नाहीं. या साऱ्या प्रकारामुळें क्लेमेन्सला मनस्वी खेद झाला. आणि पुढें त्या नांवाचं त्यानं स्वतः केलेलं पुनरुज्जीवन म्हणजे त्यानं अहेतुकपणें दुखावलेल्या वृद्धाला वाहिलेली एक प्रकारची आदरांजलीच होय.

त्या वेळच्या जुन्या तांडेलांना सॅम्युएल क्लेमेन्स म्हणजे किरकोळ शरिराचा, सुरेख दिसणारा, सदैव पोषाख चांगला असणारा, क्वचित् गुलहौशी वाटणारा, बहुधा ब्ल्यू सर्ज, तऱ्हेतऱ्हेचे सदरे आणि पांढऱ्या डकची विजार आणि पेटंट-लेदरचे बूट वापरणारा—असा स्मरत असे. वाचनाचा फार मोठा भोक्ता म्हणून इतर तांडेल त्याला मान देत असत. एकत्र जमायच्या खोलींत तो सतत गंभीर ग्रथांत डोकं खुपसून बसलेला त्यांना दिसे. न्यू आर्लीन्समधल्या एका शाळेंतल्या तीन खोल्यांतनं फ्रेंच, जर्मन अन् इटालियन भाषांचं शिक्षण दिलं जात असे. त्या शाळेवरनं एकदां सॅम गेला अन् त्याच्या मनानं घेतल्याबरोबर त्यानं फ्रेंच भाषा शिकायला सुरुवात केली. आपल्या नेहमींच्या उत्साहानं या तरुण ताडेलान तिन्ही भाषांवर मेहनत घ्यायला सुरुवात केली. पण कांहीं फेऱ्या झाल्यावर फक्त फ्रेंच पुरे असं त्यानं ठरवलं. तो शाळेंत पुन्हां गेला नाहीं. पण तिथं मिळालेलीं कार्डे त्यानं जपून ठेवलीं अन् आणखी पाठ्यपुस्तकं खरेदी केली. अजून जपून ठेवलेल्या त्याच्या नदीविषयींच्या नोंदवहींत बरेच पुढचे पाठ अत्यंत स्वच्छ अक्षरांत लिहून काढलेले अद्याप सांपडतात.

नदीविषयींच्या त्याच्या नोंदी तर अधिक मनोरंजक आहेत. बिक्स्बीच्या

सळ्ठयावरून अगदीं पहिल्या सफरींतच विकत आणलेल्या त्या 'छोट्या नोंदवहीं'-तल्यासारख्या ह्या नोंदी कांहीं भीत भीत अडखळत लिहिलेल्या नाहींत. जलद गतीनं लिहिलेल्या या जोमदार लिखाणावरून त्याचा आत्मविश्वास अन् त्याचं ज्ञान दिसून येतं. "दुसरी मोठी सफर जाने. १८६१–ॲलोंझो चाइल्ड" या मथळ्याखालीं केलेल्या नोंदींत नदीच्या पुराचं वर्णन सांपडतं. नदीकांठावरून फेसाळून वाहणारं पाणी, न दिसणारे पुढचे मार्ग, मध्येंच पाण्याचे प्रवाह वळून बनणाऱ्या नव्या नद्या, अन् जुन्या नदीचा अंदाज—पण नीट अंदाज घेऊन नव्या ओळखण्याचं कसब या नोंदीवरनं दिसतं." कोल खाडीच्याहि वर बरंच—जवळजवळ १२ ते १५ फूट पाणी चढलंय्....जनरल टेलर्सच्याहि वर गेलं असतं. पाण्याला ओढ फार आहे. रात्रीं ७७ किंवा ७६ पर्यंतहि जाऊं शकलों नाहीं—" आजकालच्या वाचकाला याचं फारसं महत्त्व वाटणार नाहीं. पण उसळत्या पाण्याचा मैलभर रुंदीचा प्रवाह, बदलत्या दिशांनीं मध्येंच येणारे नवे नवे अडथळे, अन् अंधाऱ्या खोलींत बसलेला एकटा तांडेल रात्रीच्या काळ्याकुट्ट अंधारांत दिसेनाशा होणाऱ्या खाणाखुणांतून मार्ग काढीत बसलाय्—हें चित्र आपण कल्पनेनं चितारूं शकलो म्हणजे त्याचं महत्त्व पटतं.

पाण्यावर स्वच्छ चंद्रप्रकाश पडलेला आहे, तारे दिमाखानं चमकताहेत अशा वैभवशाली रात्रीहि त्याच्या वांट्याला येत. अशा वेळीं हा तरुण कर्णधार निरामय मार्ग-क्रमण करीत असतांनाच प्रदीर्घ स्वप्नात रममाण होत असे. अशा वेळीं तो अतिशय गंभीर होई. जगाचा इतिहास वाचला होता त्याचा आढावा तो घेई, भविष्याविषयीं अंदाज बांधी, तत्त्वज्ञानाचें चिंतन करी अन् ताऱ्यांचा अभ्यास करतां करतां स्वतःचें देहभान विसरत असे. अखेरपर्यंत कधींहि नष्ट न झालेलं मार्क ट्वेनचं खगोल-शास्त्रावरचं प्रेम, नदीवरल्या त्या एकांतवासांतल्या पहाऱ्यांतन उद्भवलं होतं.

अद्याप पंचविशी न गाठलेला सॅम्युएल क्लेमेन्स शरिरानं सुदृढ अन् मनानं खंबीर होता. त्या हिंवाळ्यांत 'चाइल्ड' बोटीवर बिक्स्बी अन् क्लेमेन्स बरोबर होते. उभयतांचे संबंधहि अतिशय स्नेहाचे होते. सॅमनं एकदां आग्रहानं आईला न्यू ऑर्लीन्सपर्यंतचा प्रवास करायचं निमंत्रण दिलें. ह्या प्रदीर्घ प्रवासानं अन् दक्षिणेंतल्या त्या सुंदर शहरांतल्या फेरफटक्यानं जेन क्लेमेन्स आश्चर्यचकित आणि आनंदित झाली. सॅमविषयीं तिला आतां कसलीहि शंका उरली नाहीं. बऱ्याच दिवसांपासून तो कुटुंबप्रमुख बनलाच होता.

सॅम्युएल क्लेमेन्सला नदी इतकी आवडे याची आठवण झाली कीं, इतक्या लौकर त्याचं नदीवरचं जीवन संपुष्टांत यावं हें पाहून अतिशय वाईट वाटतं.

त्याच्या जुन्या नोंदवह्यांत नोंदविलेल्या १८६१ सालच्या त्या सफरीच अखेरच्या ठरल्या. मिसिसिपीमधून आगबोटींतून प्रवास करण्याचे सोनेरी दिवस संपुष्टांत येत होते. पण तसा संशयहि कुणाला आला नव्हता. न्यू ऑर्लीन्समधल्या एका ज्योतिष जाणणाऱ्या ख्यातनाम बाईला त्या तरुण तांडेलानं आपलं भविष्य विचारलं. तेव्हां तिनं वैशिष्ट्यपूर्ण गोष्टी तर सांगितल्याच, पण शिवाय उत्कृष्ट सल्लाहि त्याला दिला. पण फेब्रुवारी १८६१ मधली ही गोष्ट असूनहि ती यादवी युद्धाचा उल्लेखहि करूं शकली नव्हती. नावाड्यांच्या दृष्टीनं तो काळ कमालीचा धामधुमीचा गेला. कुणी 'युनियन'च्या बाजूचे होते, तर कुणी 'कॉन्फेडरेशन'च्या बाजूचे होते. होरेस बिक्स्बी उत्तर अमेरिकेची बाजू धरून राहिला अन् योग्य वेळीं 'युनियन रिव्हर सर्व्हिस'चा प्रमुख झाला.

प्रारंभीं अनेक लोकांना आपलं मत निश्चित करतांच आलं नाहीं. त्याचं वास्तव्य दक्षिणेंत असे, तसंच उत्तरेंतहि असे. साहजिकच त्यांची सहानुभूति विभागली गेली होती. सॅम्युएल क्लेमेन्सला रक्ताची तहान मुळींच नव्हती. पण तो विचारी होता. शांततेच्या काळांत मोठी सुरेख अन् भपकेदार दिसणारी तांडेलाची खोली, लढाई चालू असतांना मात्र दीनवाणी दिसे. "त्या कांचेच्या खोलींत आपण बसावं अन् कोणत्या तरी पक्षाकडून मारलं जावं असं मला वाटत नाहीं." सॅम म्हणे. "मी घरीं जाऊन विचार करीत बसतो." 'अंकल सॅम' नामक बोटीवरनं एक उतारू म्हणून त्यान परतीचा प्रवास केला. पूर्वी 'जॉन जे. रो' बोटीवर असलेला झेब लीव्हनवर्थ हा एक कर्णधार होता. पहाऱ्याच्या वेळीं बहुधा सॅम त्याच्या शेजारीं उभा होता. 'मेम्फिस' पाशीं अगदीं थोडक्यांत त्यानीं नाकेबंदी चुकवली.

सुरक्षितपणें निसटून आलों या आनंदांतच 'अंकल सॅम' धापा टाकीत सेंट लुईला येऊन पोंचली. जेफरसन बराकीपाशींच त्यांना तोफेच्या गोळ्याचा आवाज ऐकू आला. अन् त्यांच्याच दिशेनें धुराचा प्रचंड लोटहि येऊन ठेपला. "थांबा!" अशी ती कडाडणारी आज्ञा होती हें त्यांच्या ध्यानांत आलं नाहीं. ते तसेच पुढं गेले. एका मिनिटाच्या आंतच नावाड्याच्या खोलीसमोर एक स्फोट झाला. झेब लीव्हनवर्थ कोपऱ्यांत कोलमडला.

"सॅम—" तो म्हणाला.

"ह्याचा अर्थ तरी काय?" पाहुण्यांच्या बाकावरून उठून सुकाणूं हातीं घेत सॅमनं प्रश्न केला, "झेब, मला वाटतं आपण क्षणभर थांबावं अशी त्यांची इच्छा असावी." त्यांची झडती घेण्यांत येऊन त्यांना पुढें जाऊं देण्यांत आलं.

न्यू ऑर्लीन्स ते सेंट लुई अशी थेट फेरी करणारी ती शेवटचीच आगबोट होती. मार्क ट्वेनच्या जीवनांतले कर्णधाराचे दिवस संपले होते.

हनिबालला पोंचल्यावर सॅम्युएल क्लेमेन्सला एका विचित्र संमिश्र परिस्थितीला तोंड द्यावं लागलं. देशांत युद्धाच्या तयारीचा डंका वाजत होता. सरहद्दीवरल्या राज्यांत सहानुभूतींचा एकच गोंधळ उडाला होता. मिसुरीनं दक्षिणेकडची बाजू धरली होती अन् सॅम्युएल क्लेमेन्सनंहि हनिबालला आल्यावर ठरवलं कीं, लीप्रमाणेंच आपणहि आपल्या राज्याबरोबरच राहावं. आक्रमकांचे हल्ले परतवून लावण्याच्या कामीं गव्हर्नर क्लेब जॅक्सन यांना मदत करण्यासाठीं त्याचे जुने मित्र एक तुकडी उभारीत होते अन् सॅम त्यांच्यांत सामील झाल्यास त्याला लेफ्टनंट करायला ते तयार होते. तें पथक कांहीं मोठं नव्हतं. फार तर बारा जण त्यांत असतील. अन् त्यांतले बहुतेक सारे सॅमचे शाळासोबतीच होते. कुणी त्याच्या-बरोबर कर्णधार होते. अन् ती तुकडी पुरी व्हायला सॅमची आवश्यकता होती. 'टॉम सॉयर' च्या टोळीसारखीच ही दुसरी टोळी होती म्हणा ना! ब्रिअर क्रीक हिलवरच्या एका गुप्त जागीं ते भेटले अन् रणांगणावरील वैभवासाठीं आपलं जीवित कसं समर्पित करावं याची योजना त्यांनीं आंखली. गुप्तता आव-श्यक होती. कारण केंद्र सरकारचं लष्कर इलिनॉईजमधून येऊन संशयित पथकं दिसतांच अटक करीत असे. म्हणून ते रात्रीच्या वेळीं जमले आणि झाडंझुडपं, द्राक्षांच्या वेलीतनं चालत गेले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ते राल्स कौंटींतल्या कर्नल राल्स यांच्या घरीं येऊन पोंचले. राल्सनं त्यांच्यासमोर भाषण केलं अन् दक्षिणी थाटानं त्यांची न्याहरी उरकली. मग त्यानं कर्नल ब्रिल स्प्लॅन आणि फार्मर नक् मॅटसन् यांना निरोप पाठवून कांहीं साधनसामग्री मागवली. त्या प्रारंभींच्या काळांत त्यांना घोड्यावर नीट बसतां येत नव्हतं तरीहि त्या पायदळाचं घोडदळांत रूपांतर करायची त्याची खटपट होती.

पोषाख वगैरे झाल्यावर लेफ्टनंट सॅम्युएल छोट्या, पिवळसर खेचरावर बसला. त्याच्याबरोबर गाईच्या कातड्याची बनवलेली बुटांची एक जादा जोडी, करड्या रंगाच्या दोन घोंगड्या, घरीं बनवलेली एक रजई, भाजण्यासाठीं एक तवा, एक पडशी, एक छोटी प्रवासी बॅग, एक मोठा ओव्हरकोट, जुन्या धर्तीची केंटकींतली एक रायफल, वीस वार लांबीचा दोर आणि एक छत्री एवढा सरंजाम होता तेव्हां ती एक छोटीशी ब्रिगेडच दिसायला लागली. असल्या तुकडीला खऱ्या लष्करी जीवनाचा उपभोग घ्यायचा म्हणजे छावणींतच जायला हवं. म्हणून सॉल्ट नदी ओलांडून ती फ्लॉरिडा शहरापाशीं गेली. अन् एका मोठ्या वखारींत

तिनं आपली मुख्य छावणी उभारली. आतां रीतसर निवडणुका घेण्यांत आल्या. सार्जेटपासून ऑर्डर्लीपर्यंत सारे अधिकारी अधिकृतपणें निवडण्यात आले. त्यांच्यांत फक्त तिघेच सैनिक होते. अधिकाऱ्यांतनं त्याना वेगळं हुडकून काढणं कांहीं तुम्हांला जमलं नसतं. ह्या तुकडींतली शिस्तहि चांगली नव्हती.

लौकरच ती आणखी बिघडली. पाऊस सपाटून पडूं लागला. सॉल्ट नदीला चांगलाच पूर आला. ती दुथडी भरून वाहूं लागली. पहाऱ्याचं काम सोपवलेले सैनिक खुशाल त्या वखारीच्या पोटमाळ्यावर जाऊन झोपा काढूं लागले. कर्नल युलिसिस ग्रँट नामक सेनापतीच्या नेतृत्वाखालीं शत्रूची तुकडी चालून येत आहे, असा दोनदां निरोप आला. अन् हनिबालची ही तुकडी दोनदां घाईघाईनं चिखल अन् झाडं-झुडपं तुडवीत उलट दिशेनं गेली आणि धोक्याचा इशारा संपल्यावर कशीबशी कण्हत कुंथत परत आली. लेफ्टनंट क्लेमेन्सला नंतर एक मोठं थोरलं गळूं झालं अन् सतत त्याला घोड्याच्या तबेल्यांतल्या वाळलेल्या गवताच्या गंजीवर पडून राहावंच लागलं. जिल्ह्याचा कमांडर अन् एके काळचा हनिबालमधला तारखात्यांतला ऑपरेटर 'जनरल' टॉम हॅरिस जवळपास आल्याची खबर लागतांच या लष्करानें विशेष गाजावाजा न करतां छावणी गुंडाळली. अर्ध्या वाटेवरच जनरल हॅरिस त्यांना भेटला. आणि त्यानं त्यांना परत घरोघर जाण्याची आज्ञा दिली. त्यांनीं त्याला 'टॉम' या घरगुती नांवानं हांक मारली अन् ह्या छावणीचा आपण कायमचा निरोप घेत असल्याचं सांगून टाकलं.

थोडंसं चालून गेल्यावर त्यांना कांहीं खाद्यपदार्थ विकत घ्यायचे होते म्हणून ते एका शेतांतल्या घरापाशीं थांबले. घरांतनं एक उंच, हडकुळी बाई बाहेर आली. "तुम्ही दक्षिणेच्या बाजूचे, होय?"

"होय, बाईसाहेब!" लेफ्टनंट क्लेमेन्स म्हणाला, "एका उदात्त ध्येयाचे आम्ही रक्षक आहोंत. आम्हांला कांहीं खाद्यवस्तु मिळाल्या तर विकत घ्यायच्या होत्या."

या विनंतीनें बाईचा पारा चढला. "खाद्यपदार्थ?"—त्या कडाडल्या. "दाक्षिणात्यांना खाद्यवस्तु देऊं?—माझा नवरा केंद्र सरकारच्या लष्करांत कर्नल असतांना? चला—चालते व्हा!"

ते कर्नल बिल स्प्रॅनच्या घरीं पोंचले तेव्हां रात्र बरीच झाली होती. सगळे जण झोपले होते. मग आमच्या ह्या भुकेल्या लष्करानं धान्यगुदामाच्या अंगणांतच तळ ठोकला अन् गवताच्या गंजीवर पथाऱ्या पसरून दिल्या. थोड्याच वेळांत "आग!" असं कुणी तरी ओरडलं. ह्या नौजवानांपैकीं कुणी तरी धूम्रपान करतां करतां गवताच्या गंजीला काडी लावली होती. अचानक जाग्या झालेल्या लेफ्टनंट

क्लेमेन्सनें ज्वालेपासून बऱ्याच अंतरावर असूनहि प्रथम गिरक्या घेतल्या अन् खालीं परसांत ती वाळलेल्या गवताची गंजी पसरून दिली. लेफ्टनंटसाहेबानं उडी मारली तेव्हांच घोट्यापाशीं त्याचा पाय मुरगळला होता, गळू अजून ठणकतच होतं. पण त्या जळत्या गवतानं क्षणभर कां होईना, त्याच्या दुखण्याला उतार पडला. एक उडी मारून तो मित्रांपाशीं आला. त्याच्या सगळ्याच हालचालींची त्यांना मोठी गंमत वाटत होती हें पाहून त्यानं मग युद्ध, लष्करांतलं जीवन आणि सर्वसाधारण मानवजात याविषयींचे आपले विचार त्यांना ऐकवले.

सकाळीं कर्नल स्प्लॉन यांनीं या सैनिकांच्या न्याहरीची छान व्यवस्था केली अन् मग ते पुढें रवाना झाले. लेफ्टनंट क्लेमेन्स मात्र फार्यर नक् मॅट्सनच्या घराच्या पुढें काहीं जाऊं शकला नाहीं. घोटा दुखवल्यामुळें एव्हांना त्याच्या अंगांत सडकून ताप भरला होता. सौ. मॅट्सननीं त्याला बिछाना घालून दिला. अशा रीतीनं सैन्यानं त्याला सोडलं; तूर्त तरी निःशस्त्र करून. लेफ्टनंट क्लेमेन्स पुन्हां कधीं सैन्यांत दाखल झाला नाहीं. पुन्हां चालतां येऊं लागतांच तो ओरियनला भेटायला किओककला गेला. ओरियन 'युनियन ॲबॉलिशनिस्टां'च्या मताचा होता. पण तेवढ्यावरून त्यांच्यांत कधींच कुरबुर झाली नाहीं. सॅम्युएल क्लेमेन्स स्वतःच हळूहळू त्या विचारसरणीकडे झुकूं लागला होता. तो जणुं एका फार चांगल्या क्षणाला किओककला येऊन दाखल झाला होता. नेवाडाचा प्रादेशिक चिटणीस म्हणून ओरियन क्लेमेन्सची नेमणूक झाली होती. आणि कार्सन सिटी इथल्या त्याच्या कचेरीच्या गांवापर्यंत जायला तेवढे पैसे मात्र त्याला हवे होते. कर्णधार असतांना सॅमनं सांठवलेल्या पैशानं हा प्रवास सहज होण्यासारखा होता. त्याच्याबरोबर स्वतःहि त्याचा खासगी चिटणीस म्हणून जायचं त्यानं ठरवलं. दोघांचाहि प्रवासखर्च करायची त्याची तयारी होती. ओरियनला मिळालेल्या अधिकारपदावर साहसी वृत्तीच्या माणसाला खात्रीनं नशीब काढतां येईल असं त्याला वाटत होतं. अखेर निरोप घेण्यासाठीं दोघे भाऊ ताबडतोब सेंट लुईला गेले. अन् तिथून मिसुरींतल्या 'सेंट जो' गांवाकडे जाणारी बोट त्यांनीं पकडली. सेंट जोहून इच्छित स्थळीं ते जाऊं शकत होते. प्रत्येकाच्या प्रवासासाठीं त्यांनीं दीड-दोनशें डॉलर्स भरले. अन् १८६१ च्या जुलैअखेर ते निघाले. सोळा उमदे घोडे त्यांना अविरत खेंचीत होते. फक्त जेवणापुरते किंवा खांदेपालट करण्यासाठींच काय ते थांबत. उंचसखल पठारावरून आणि बर्फाच्छादित खडकांवरून सकाळ-संध्याकाळ मार्ग काढीत सेंट जोपासून कार्सन सिटीपर्यंतचा १७०० मैलांचा तो वैभवशाली प्रवास त्यांनीं अवघ्या १९ दिवसांत पुरा केला.

८.

# बिनीच्या शिलेदाराचा 'मार्क ट्वेन'

अत्यंत आश्चर्यकारक आणि आनंददायक अशा त्या एके काळच्या प्रवासाची हकीकत हवी असल्यास आपण मार्क ट्वेनचं 'रफिंग इट' हें पुस्तक वाचायला हवं. त्यानं म्हटलंय्, "आज देखील त्या प्रवासाच्या स्मृतीनं मधून मधून माझ्या अंगावर रोमांच उभे राहतात. या विशाल भूमीवर उगवलेल्या अगदीं प्रारंभींच्या प्रातःकाळीं स्वातंत्र्याच्या बलवत्तर भावनेनं माझ्या रक्तांतला कण न् कण नाचूं लागत असे. इकडील जीवन आणि त्यांतला आनंद यांच्या अपेक्षेनं त्या वेळीं स्फुरलेल्या ऊर्मी मला अजून जाणवतात." ऑगस्ट महिन्यांतल्या तळपत्या उन्हांत भरदुपारीं ते येऊन पोंचले. सारं अंग धुळीनं माखलेलं, दाढ्या वाढलेल्या, बदलत्या हवामानानं चेहरे ओढलेले अशा थाटांत ! सॅम्युएल क्लेमेन्सचं सरहद्दीवरलं नवं जीवन सुरू झालं. नेवाडाची राजधानी असलेल्या कार्सन सिटी ह्या लाकडी शहरांत प्रतवारीनें लावलेलीं दोन हजार माणसं राहत असत. खाणींत काम करण्याचा आनंद विलक्षण असल्यानं प्रत्येक वंशांतले कांहीं ना कांहीं लोक तरी इकडे आकर्षिले गेले होतेच.

हे दोघे भाऊ प्रथम एका आनंदी आयरिश स्त्रीच्या बिऱ्हाडीं उतरले. अद्याप या गांवांत राजधानीला साजेशा अशा सरकारी इमारती उठलेल्या नसल्यामुळें ओरियननं नंतर एका छोट्याशा कचेरींतच आपलं बिऱ्हाड थाटलं. सॅम्युएल क्लेमेन्स ज्या हुद्द्यावर इकडं आला त्याला अजून कुठलीच जबाबदारी चिकटली नव्हती अन् त्यांतून कसलीच प्राप्तीहि होत नव्हती, म्हणून अंवतीं-भंवतींच्या जीवनाचं निरीक्षण करण्यास त्यानं सुरुवात केली. त्याच्या हेल काढून बोलण्याच्या विशिष्ट पद्धतीमुळें आणि गोष्टी सांगण्याच्या हातोटीमुळें लौकरच त्याला पुष्कळ मित्र लाभले. कडक थंडी पडली असतांना रात्रीच्या वेळीं ओरियनच्या कचेरींतल्या स्टोव्हभोंवतीं ही सारी मित्रमंडळी जमत अन् सॅम

आपल्या विशिष्ट लकबीनं गोष्टी सांगत असे. एक दिवस याच गोष्टी साऱ्या जगाचं मनोरंजन करणार होत्या. अतिशय थोड्या कालावधींत कार्सन सिटींतल्या रस्त्यांतनं सॅम ही एक उल्लेखनीय व्यक्ति गणली जाऊं लागली. त्याच्या डोक्यावरचा तो विपुल पिंगट केसांचा संभार, लुकलुकणारे डोळे, रिकामटेकड्यासारखं त्याचं तें गबाळं चालणं, कपड्यांच्या बाबतींतला गैरशिस्तपणा चटकन् दुसऱ्याची नजर खेंचून घेई. नदीवरच्या जीवनांत अत्यंत ऐटबाज पोषाख करणारा हा तरुण आतां, कडा खालीं लोंबणारी मळकट हॅट, फ्लॅनेलचा सदरा, जाडीभरडी तुमान, गायीच्या चामड्याच्या बुटांत निम्मी अडकली आहे, निम्मी बाहेर लोंबत आहे—असला दरिद्री पोषाख करणाऱ्या गबाळ्यांचा अग्रणी बनला.

खाण-कामाच्या वेडानं तत्काळ त्याला ग्रासलं नाहीं. दृष्टीला दिसणाऱ्या ऐश्वर्यावरच प्रथम त्याची नजर होती. त्या वेळीं त्याला विचारलं असतं तर (हल्लीं जिथं 'ताहो' आहे) लेक बिगलरच्या सभोंवतालचा इमारती लाकडांनीं भरलेला अनेक एकरांचा मनोहर भूभाग त्यानं मागितला असता. ओहिओ संस्थानांतल्या जॉन किने नांवाच्या तरुणाबरोबर त्यानं पायींच ताहोची सहल एकदां केली. याच सहलीचं वर्णन असलेलीं 'रफिंग इट' मधली प्रकरणं अत्युत्कृष्ट समजलीं जातात. इमारती लाकडाच्या पट्टयावर ते दावा सांगत त्याला कुंपण घालण्याचं, घर बांधण्याचं सोंग करीत. पण त्यांचा मुख्य धंदा होता त्या संपन्न वृक्षराजींतून मनमानेल तसं भटकण्याचा किंवा नितळ पाण्यांतनं स्वैर जलसंचार करीत होडींतून फिरण्याचा! सरोवराच्या कांठीं शिळोप्याच्या गप्पांसाठीं शेकोटी पेटवायचा त्यांचा परिपाठ असे. एक दिवस ही शेकोटी भडकून त्यांच्या आवाक्याबाहेर गेली, साऱ्या जंगलाला आग लागली, त्यांचीं सारीं कुंपणं अन् सारी वसाहत त्या आगींत नष्ट झाली. घरीं धाडलेल्या पत्रांत त्यानं ह्या आगीचं मोठं रसभरीत अन् सुरेख वर्णन केलंय—"त्या ध्वजस्तंभांतून मधून मधून समान उंचीच्या ज्वाला भडकत होत्या. आगींत सांपडून होरपळून निघालेल्या त्या उंच, मृतवत् वृक्षांना आम्ही ध्वजस्तंभ म्हणत असूं. हवेंत सुमारें शंभर फूट उंच ते आपापले रक्तध्वज फडकावीत उभे होते ना! मग ह्या दृश्यावरून आम्हीं सरोवराकडे नजर टाकली तेव्हां एकाद्या चकाकत्या, तेजोमय आरशांत दिसावें तसें प्रत्येक फांदीचें, पानाचें अन् बिंदूचें संपूर्ण प्रतिबिंब त्यांत आम्हांला दिसलें." वाङ्मयीन दृष्टि अन् वृत्ति त्याच्या ठायीं उद्‌भवत होती.

या काळांत त्यानं घरीं धाडलेल्या सर्व पत्रांतून, उज्ज्वल भवितव्य निश्चितपणें समोर दिसत असल्याचीं चित्रं त्यानं रंगवलेलीं सांपडतात. पामेला मॉफेटला

धाडलेल्या एका पत्रांत त्यानं लिहून ठेवलंय, "ओरियनला अन् मला ह्या प्रदेशाविषयीं इतका गाढ विश्वास वाटतोय् कीं, हें युद्ध एकदां संपलं कां संपलं म्हणजे मग श्री. मॉफेट यांना इकडची काडी तिकडं करावी न लागतां आम्ही ऐश्वर्यांत लोळतां येईल इतकं श्रीमंत करून टाकूं..." "आमच्यापाशीं १६५० फूट खाणीची जागा आहे. ती जर चांगली निघाली तर मॉफेट यांचं नांव तिथं चिरकाल टिकेल." ऑक्टोबरच्या अखेरीस हें पत्र लिहिलेलं आहे. दोन महिन्यांनीं, हिंवाळ्याच्या मध्यास खाणींच्या वेडानं त्याला पुरतं पछाडलं.

अकस्मात् ऐश्वर्य लाभल्याच्या, रात्रीं झोपायला जातांना भिकारी अन् जागा होऊन पाहतो तों लाखोपति झालाय् अशा कथा तेव्हा सर्वत्र ऐकूं येत होत्या. गाड्या भरभरून चकाकती चांदी अन् सोन्याच्या चिपा कार्सनच्या रस्त्यांतनं वाहून नेल्या जात होत्या. तेवढ्यांत नव्यानंच खुल्या झालेल्या हंबोल्ट प्रदेशांतून भलतीच खूष खबर आली. तिकडचे डोंगर म्हणे नुसते सोन्यानं ठांसून भरलेले होते. हवा नुसती लिकलिकतेय् असं सॅम्युएल क्लेमेन्सला भासूं लागलं. टोपल्या भरभरून संपत्ति नुसती वाहून आणायची खोटी होती. हंबोल्टच्या पहिल्या मोहिमेंत तो सामील झाला—नव्हे, त्यानं ती मोहीम संघटित करायला मदत केली. 'रफिंग इट' मध्यें त्यानं म्हटलंय, "'जलदी करा' हाच त्या वेळचा मंत्र होता. आम्हीं एक क्षणहि फुकट दवडला नाहीं. आमच्या पथकांत चौघेजण होते—६० वर्षांचा एक लोहार, दोघे वकील अन् मी स्वतः! एक गाडी आणि दोन मरतुकडे घोडे विकत घेतले. खाद्यपदार्थ आणि खोदकामाचीं हत्यारं मिळून १८०० पौंड वजनाचा माल आम्हीं गाडींत भरला, अन् डिसेंबर महिन्यांतल्या थंडींत एके दिवशीं दुपारीं कार्सन शहराबाहेर आमची गाडी काढली."

त्या दोघां तरुण वकिलांपैकीं डब्ल्यू. एच्. क्लॅगेट यांना क्लेमेन्स किओकक-पासून ओळखत होता. दुसरा ए. डब्ल्यू. ऑलिव्हर याला 'रफिंग इट' मध्यें त्यानं 'ऑलिफंट' म्हटलंय. लोहाराचं नाव होतं 'टिलो'. ('रफिंग इट' मध्यें 'बॅलो') हा लोहार अंगापिंडानं मजबूत अन् प्रामाणिक होता. खाणींतल्या खोदकामाची अन् अवजारं दुरुस्त करण्याची माहिती त्याला होती. या मंडळीं-बरोबर दोन कुत्रेहि होते. कुरळ्या केसांची झुपकेदार शेपटी असलेला एक मिश्र जातीचा अन् दुसरा होता एक जवान शिकारी कुत्रा. मोहिमेंतला कमकुवत भाग म्हणजे घोडे! आमचे हे खाणमालक थोडंसं अंतर काटून गेले असतील नसतील तोंच त्यांना गाडींतलं ओझं कमी करणं भाग पडलं. थोड्या वेळानं ते पुन्हा चालूं लागले. मग झाली बर्फ पडायला सुरुवात, तशांत वाराहि सुटला.

वेगानं इकडून तिकडे जाणाऱ्या बर्फाच्या अन् वाळूच्या ढगांनीं वातावरण नुसतं भरून गेलं. त्या मानानं रात्रीचा वेळ बरा जाई. वारा पडलेला असे. मग ते गाडीच्या आडोशानं शेकोटी पेटवून डुकराचं मांस भाजीत. ब्लँकेटांतल्या उबेंतच कुत्र्यांचीहि ऊब त्यांना मिळे. मग सर्वांना झोप लागेपर्यंत सॅम क्लेमेन्स आपल्या विनोदी गोष्टी ऐकवी.

यथाकाळ ते त्या अल्काली डेझर्ट नामक ओसाड प्रदेशांत येऊन दाखल झाले. दमछाट करणाऱ्या त्या निर्जल प्रदेशाच्या दुसऱ्या टोकाला जाऊन पोंचावें म्हणून सबंध दिवस अन् सबंध रात्रभर त्यांनीं वाटचाल केली. पलीकडे पहाटे तीनला ते पोंचले तेव्हां सर्वांच्या अंगांतलं त्राण संपुष्टांत आलं होतं. त्यापलीकडचें दोनशें मैल अंतर काटून ते हंबोल्ट भागांतील युनियनव्हिल येथील छोट्या छावणींत अकरा दिवसांच्या प्रवासानंतर येऊन पोंचले. 'रफिंग इट' मध्यें मार्क ट्वेननें युनियनव्हिलविषयींच्या खाणीविषयींच्या अनुभवाबद्दल लिहून ठेवलंय्.

लेखकानें स्वप्नें पाहिलीं तशा टोपल्या भरभरून संपत्ति गोळा करणें कांहीं त्याला शक्य झालें नाहीं. तेथें कांहीं जिकडेतिकडे सोनें-चांदी पसरलेली नव्हती. पिवळसर, चकाकत्या धातूचें ओझें गाडींत भरून त्यांनीं नेलें खरें, पण तें निरर्थक ठरलें. अशुद्ध स्वरूपांत सोनें पिवळसरहि नसतें आणि चकाकतहि नाहीं. खाणीं-तून धातु कसा शोधून काढावा याविषयींच्या सूचना टिलोनें त्यांना दिल्या. आणि मग ते छिन्नी-हातोडी, भोकें पाडण्याचें यंत्र आणि सुरुंगाची दारू वापरून कामाला लागले. तडकाफडकीं लक्षाधीश होण्याची शक्यता नष्ट झाली. मार्क ट्वेनचें त्याबाबतचें त्रोटक भाष्य पाहा: "असा एक आठवडा गेला अन् माझं समाधान झालं. मीं तो नाद सोडून दिला." लौकरच क्लेमेन्स-क्सॅगेट-ऑलिव्हर-टिलो या लक्षाधीश कंपनीनें आपला तिथला हक्क सोडून दिला. आणि क्लेमेन्स व टिलो कार्सन सिटीच्या मार्गाला लागले.

आमचे हे खाणमालक कार्सनला परतले तेव्हां जानेवारी महिन्याची अखेर होती. सॅम निराश झाला नव्हता. तो मुळींच निरुत्साही झाला नव्हता. परतल्यानंतर कांहीं आठवड्यांच्या आंतच तो कॅलिफोर्नियाच्या टोकाला असलेल्या एस्मराल्डा प्रदेशांतल्या ऑरोरा गांवीं पोंचलेला आपल्याला आढळून येतो. पूर्वीं नमूद केलेली क्लेमेन्स-बंधूंच्या मालकीची १६५० फूट जागा इथंच होती. तिथं काम करण्यासाठींच तो येऊन दाखल झाला होता. त्या वेळीं कडक हिंवाळा होता, पण त्याचा उत्साह अवर्णनीय होता. उन्हाळ्याच्या प्रारंभींच आपलं नशीब उघडेल अशी त्याला जबर आशा होती. त्यानं पामेलाला लिहिलं होतं, "मी बहुधा

जुलैंत बोटीनं सेंट लुईला परत येईन म्हणतों. त्यानंतर मी परत येईन असं म्हणत नाहीं. किंवा येऊं शकेन असंहि नाहीं. येण्याची इच्छा मात्र आहे...तुला पैजेवर सांगतों...सारं कांहीं जुळलं तर जूनमध्येंच आम्ही खडक फोडूं.'' शक्य तितका सैल अंदाज बांधण्याचा प्रयत्न तो करीत होता, अन् निष्कारण हरखून न जाण्याविषयीं बहिणीला बजावीत होता.

एव्हांना त्याच्याजवळचे पैसे संपत आले होते. आणि आतां त्या भागांत खाणी खोदण्यासाठीं ओरियनच्या तुटपुंज्या पगारांतूनच पैसे घेण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. साऱ्या गोष्टींत दोघां भावांची भागीदारी होती. आणि आतां प्रत्यक्ष काम करण्याची पाळी बंधुराज सॅम यांची होती. जमीन खणणें, अंदाज घेणें, गारगोटीच्या खडकाला सुरुंग लावणें या साऱ्या गोष्टींचा त्याला मनस्वी तिटकारा होता. पण खाणींतल्या संपत्तीच्या वेडापायीं तो पुढें ढकलला जात होता. प्रथम तो फिलिप्स नांवाच्या तरुणाकडे राहत होता. पण पुढें कॅल्व्हिन एच. हिग्बी या अनुभवी खाणमालकाकडे तो राहूं लागला. याच हिग्बींना त्यानें पुढें आपलें 'रफिंग इट' हें पुस्तक अर्पण केलें. कापडी छपराच्या एका छोट्याशा खोलींत ते राहत असत. गंजलेल्या स्टोव्हवर ते घाणेरडे नमुने धरून, वसंत ऋतु वायां घालवीत आहोंत त्या मानानें कांहीं लाभ होईल कीं नाहीं याचा अंदाज घेत. अन्न संपलें, पैसे तर जवळ जवळ संपलेच होते—तरीहि त्यांनीं आशा सोडून दिली नव्हती.

वादळी हवा असली कीं ते खोदकाम करूं शकत नव्हते. मग बिछान्यावर दोन्ही पाय फांकून हा माजी कर्णधार बसे अन् साऱ्या एस्मरालडा टेकड्या खणून जेवढी संपत्ति मिळाली असती त्यापेक्षां किती तरी अधिक मोलाची संपत्ति श्रोत्यांना वांटून देत असे. कधीं कधीं तो मुळींच बोलत नसे; एका कोपऱ्यांत लिहीत बसे. त्यांना वाटे, हा घरीं पत्रबित्र लिहितोय्. त्याचा वाङ्मया-कडे असलेला कल त्यांना ठाऊक नव्हता. त्यानं घरीं धाडलेलीं कांहीं पत्रं किओककच्या एका वृत्तपत्रांत छापून आलीं, तीं ओरियनच्या हातांत पडलीं. त्यानं तीं व्हर्जिनिया सिटी येथील 'टेरिटोरियल एन्टरप्राइझ'च्या साहाय्यक संपादकाला दाखवलीं. त्यांतलं एक त्या माणसानं 'एन्टरप्राइझ'मध्यें पुनर्मुद्रित केलं. तेव्हां लेखकाला थेट त्या पत्राकडेच लिखाण धाडायला प्रोत्साहन मिळालं. या लिखाणाखालीं तो 'जोश' अशी सही करी. त्याला त्याबद्दल कांहींच मोबदला मिळत नसे अन् तो मिळावा अशी त्याची अपेक्षाहि नव्हती. त्याच्या मतें तें लिखाण मोलाचें नव्हतें. अत्यंत अस्पष्टपणें कां होईना, पण तो कीर्ति-

मंदिराचें दार वाजवीत होता असें जर त्या वेळीं कुणीं त्याला म्हटलें असतें तर त्याच्या निर्वाळ्याच्या सच्चेपणाविषयींच सॅमला शंका आली असती.

गारगोटीचे खडक फोडण्याचं काम खरं म्हणजे निराशाजनकच असलं पाहिजे. तरीहि सॅम निरुत्साही झाला नव्हता. त्यानं एकदां लिहिलं होतं, "मी इथला नागरिक बनलोंय् अन् त्यांत मला समाधानहि आहे. घरांत तीन दिवसांपुरतंहि धान्य नाहीं. इथून पुढें सारं काम मी माझ्या हातानंच करीन." "आतां माझी सारी भिस्त छिन्नी आणि हातोडी यांवरच आहे—" असं एकदां लिहिल्यावर मग तो दुसऱ्या पत्रांत म्हणतो, "माझी पाठ ठणकत आहे. छिन्नी-हातोडी वापरून वापरून माझे हात फोडांनीं नुसते भरून गेले आहेत." उन्हाळा ऐन भरांत असतांना एकदां त्यानं लिहिलं होतं, "या टेकड्यांवर अजून बर्फ पडतंय्. मला वाटतं इथं बारा महिने बर्फ पडत असलं पाहिजे. जर मी इथं श्रीमंत झालों तर माझा हा अंदाज चुकला असं म्हणायचं, एवढंच." अन् शेवटीं अंतःकरण हलवून टाकणारी ओळ सांपडते—"घरच्या मंडळींनीं पत्र लिहिणं जवळ जवळ सोडून दिलंय् असं नाहीं तुला वाटत ?"

अगदीं केवळ पैशासाठींच असं नाहीं, पण योग्य वेळीं तो दर आठवड्याला दहा डॉलर वेतनावर एका कांचकारखान्यांत नोकरीस राहिला. सॅम्युएल क्लेमेन्स जें जें हातीं घेई तें चांगल्या तऱ्हेनें शिकून घेई. खाणी खोदण्याचें शास्त्र पूर्णपणें आत्मसात् करण्याचें त्यानें ठरवलें. शुद्धीकरणाचें कामहि शिकून घ्यायला तो गेला. म्हणजे खाणीचें काम सुरू झालें कीं, स्वतःच कारखाना उभारून स्वतः सगळ्या कामावर देखरेख करणें त्याला शक्य होणार होतें. तिथें तो थोडे दिवस राहिला. त्याला कमालीची थंडी झाली अन् रसायनांनीं तर विषबाधा होण्याची वेळ आली होती.

'रफिंग इट' मध्यें मार्क ट्वेननें, अखेरीस त्याच्या आणि हिगूबीच्या प्रयत्नांना यश येऊन शिरें कसें सांपडलें, त्यायोगें ते खरोखर लक्षाधीश कसे झाले, आणि अखेरीस प्रतिस्पर्धी खाणमालकांच्या प्रयत्नामुळें अन् स्वतःच्या हलगर्जीपणामुळें त्यांचा हक्क कसा नष्ट झाला—ती सारी कथा सांगून ठेवली आहे. अशाच कांहीं पद्धतीनें दूरवरची पश्चिमेकडील त्याची जमीन त्याच्या हातनं गेली हें खरं. पण गोष्टीला रंगत येण्यासाठीं 'रफिंग इट'मध्यें ती हानि बरीच मोठी करून दाखविण्यांत आली आहे. अगदीं पश्चिम टोकाला कुणालाच कधीं संपत्ति मिळाली नाहीं. फक्त शेवटच्या मालकाला कांहीं थोडासा लाभ झाला असेल तेवढाच. सॅम्युएल क्लेमेन्सची खाणींतली कर्तबगारी अशा रीतीनें कसलाहि उत्कर्षबिंदु न गांठतां हळूहळू समाप्त झाली.

जुलैच्या अखेरीस ऑरोरा छावणींतील आर्थिक परिस्थिति फारच बिकट झाली होती. अत्यंत अल्पशा आर्थिक लाभासाठींहि आमचे खाणमालक इकडे-तिकडे हातपाय हलवूं लागले होते. 'एन्टरप्राइज' मध्यें 'जोश' या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या पत्रांमुळें त्यांच्या लेखकाविषयीं कुतूहल जागृत केलें होतें. ओरियननेंहि 'जोश' म्हणजे कोण तें प्रसृत करण्यात यत्किंचित्हि कसूर केलेली नव्हती. परिणामीं, किनारपट्टीवरल्या इकडच्या तिकडच्या पत्रानीं सॅमकडे लिखाणाची मागणी केली होती अन् क्वचित् मोबदलाहि देऊं केला होता. जुलैच्या अखेरीस ऑरोरांतल्या ह्या खाणमालकानें लिहिलेल्या एका पत्रांत पुढील कथाभाग आढळतो : "मला वाटलं होतं त्याच्यापेक्षां माझं कर्ज किती तरी अधिक आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, मला कांहीं तरी काम मिळालं पाहिजे अन् तेंहि लौकर...'सॅक्रॅमेंटो युनियन'वाल्यांना किंवा 'मार्श'ला लिहून कळव कीं, आठवड्याला १० डॉलर मोबदल्यांत ते म्हणतील तेवढीं पत्रं लिहायला मी तयार आहें. माझ्या जेवणाचं बिल तरी दिलंच पाहिजे. 'न्यू ऑर्लीन्स क्रेसट', 'एन्टरप्राइज' वगैरे वृत्तपत्रांतून मीं पत्रें लिहिलेलीं आहेत हें त्यांना सांग. तूर्त मी आठवड्याला पांच डॉलर मोबदल्यात दोनदां छोटीं पत्रें 'एज'साठीं लिहूं शकेन." ह्या साऱ्याचा काहींच उपयोग झाला नाहीं. पण वर उल्लेखिलेल्या 'एन्टरप्राइज'च्या साहाय्यक संपादकानें त्या पत्राचे मालक आणि संपादक जोसेफ टी. गुडमन यांना सुचविलें कीं, 'जोश' ला आपल्या पत्राच्या संपादकवर्गातच सामील करून घ्यावें. तो म्हणाला, "आमच्या मते तेंच उत्कृष्ट ठरेल."

"बार्स्टो, त्याला पत्र पाठवा. अन् विचारा कीं, इकडे यायची त्याची इच्छा आहे का ?"

बार्स्टोनें पत्र धाडलें. आठवड्याला २५ डॉलर देऊं केले. रक्कम तर मोह पाडणारी होती. जुलै १८६२ मधली ही गोष्ट.

तरीहि आर्थिक पेच्यात सांपडलेल्या त्या खाणमालकानें होकार देण्याची घाई केली नाहीं. त्यानें बार्स्टोला पत्र लिहून विचारलें, "माझी तुम्हांला साधारणतः केव्हापासून गरज लागणार आहे ?" त्याच वेळीं ओरियनला लिहिलेल्या पत्रांत त्यानं म्हटलंय्, "आज मध्यरात्रींच मी निघेन म्हणतों. एकटा, पायीं. कारण संपूर्ण निर्जन प्रदेशांतून ६०–७० मैल जायचंय्. पण तूं मात्र बार्स्टोला कळव कीं, एक आठवड्यासाठीं मी इथून बाहेरगावीं गेलोय. जर त्यांना माझी तातडीनें गरज असेल तर त्यांनीं तसं मला इथं, नाहीं तर तुझ्यामार्फत कळवावं." आपला

निकराचा लढा स्वतःच देण्यासाठीं, शरणागतीचा अंतिम क्षण पुढें ढकलण्यासाठीं तो ओसाड प्रदेशांत गेला. पण ही शरणागति म्हणजेच विजयाचा प्रारंभ होता हें त्याला कळलं असतं तर!—

अखेरीस खाणप्रकरण कसं अन् केव्हां संपलं तें कळत नाहीं. पण ऑगस्ट महिन्यातल्या एके दिवशीं दुपारीं रखरखत्या उन्हांत, धुळीनं माखलेल्या रस्त्यांतनं, कपडे फाटलेला आणि प्रवासानं शिणलेला एक यात्रेकरू कसेबसे पाय ओढीत 'व्हर्जिनिया सिटीं'तल्या 'टेरिटोरियल एन्टरप्राइज'च्या कचेरींत आला अन् खांद्यावरच्या घोंगडींतलं अवजड ओझं जमिनीवर टेकवून मोठ्या कष्टानं खुर्चीत कोसळला. व्हर्जिनिया सिटीपासून ऑरोरा १३० मैल दूर होतं. हें अवजड ओझं घेऊन तो हें सारं अंतर चालून आला होता. त्या वेळीं संपादक गुडमन कांहीं तिथं नव्हते. पण दुसरे मालक डेनिस ई. मॅकार्थी तिथं होते. त्यांनीं पाहुण्याला आगमनाचं कारण विचारलं. मुशाफिरानं त्याला न्याहाळून घेतलं अन् त्याच्याकडे बुद्धिपुरस्सर दुर्लक्ष करून तो म्हणाला, "कोणत्याच जहाजावर माझा पाय टिकणार नाहीं असं दिसतं. शंभर एक वार जागेची मला गरज आहे. मी आतां कोसळ-णार असं वाटतंय्"—मग तो पुढें म्हणाला, "श्री. बार्स्टो किंवा श्री. गुडमन यांना मी भेटूं इच्छितों. माझं नांव क्लेमेन्स. या पत्रात लिखाण करण्यासाठीं मी आलोंय्." जगांतील अत्यंत विशाल अशा मालमत्तेचा मालक आपल्या राज्यावर हक्क सांगायला आलेला होता!

१८६२ सालीं खाणकेंद्रापैकीं अत्यंत भरभराटीस आलेलें असें नेवाडा संस्थानां-तलें व्हर्जिनिया सिटी हें शहर होतें. कॉमस्टॉक नावाच्या अर्धवट खाणवेड्या माणमानं अशी कांहीं संपत्तीची जागा शोधून काढली होती कीं, साऱ्या जगातली खनिजांची बाजारपेठ कॉमस्टॉकच्या मालानं भरून गेली होती. खुद्द कॉमस्टॉकला या प्रकरणांत फारच थोडा लाभ झाला. पण ज्यांनीं त्याचं अनुकरण केलं ते लक्षाधीश झाले. उत्सुक, श्रीमंत आणि उत्साही लोकांनीं रस्ते तुडुंब भरले. सर्व प्रकारच्या व्यापाराला कमालीची तेजी आली. दोनच वर्षांपूर्वीं, एके काळीं मुद्रक, खाणमालक अन् वाङ्मयाची आवड असलेला जे. टी. गुडमन डेनिस मॅकार्थी नांवाच्या दुसऱ्या एका मुद्रकाला भेटला. आणि दोघांनीं मिळून 'टेरिटोरियल एन्टरप्राइज' नावाचं डबघाईस आलेलं पत्र विकत घेतलं. त्यानंतर मात्र नशिबानं हात दिला. एक वर्षानंतर 'एन्टरप्राइज' हें पत्र चांगल्या रीतीनें चालूं लागलं. त्याला स्वतःची नवी सुरेख इमारत लाभली. आणि त्यांतला संपादकवर्गीह इतका बुद्धिमान होता कीं, पॅसिफिक किनाऱ्यावरचं अत्यंत महत्त्वाचं पत्र म्हणून लोक त्याला मान देऊं लागले.

गुडमन हे स्वतः चांगले, जोरकस शैलीचे लेखक होते. अन् त्यांनीं स्वतः-भोंवतीं लायक माणसं गोळा केलीं. कॉमस्टॉक-धर्तीच्या मंडळींना विनोद प्रिय होता. अन् त्यांना विनोदी लिखाण पुरवायला गुडमन सदैव तत्पर असत. 'एन्टरप्राइज' हें वृत्तपत्र होतें पण प्रसंगीं 'वृत्ताला' कात्री लावूनहि तें करमणूक करायला सज्ज असे. संपादकीय खात्यांत गुडमन यांच्या खालोखाल स्थान असलेले विल्यम राइट दर्जेदार विनोदी लिखाण करीत असत. डॅन डी. क्विल या नांवानें प्रसिद्ध होणारें त्यांचें लिखाण सर्वत्र उचललें जाई. आर. एम्. डॅगेट (हे नंतर अमेरिकेचे हवाईविषयक मंत्री झाले) हेहि 'एन्टरप्राइज'मध्यें लिहीत असत. त्यांच्यासारखेच इतरहि बरेच लोक तिथं होते. सॅम्युएल क्लेमेन्स या गटांत चपखल बसला. विचार आणि अभिव्यक्ति यांची नवी दिशा बरोबर घेऊन तो आला होता. डोळे उघडे ठेवून तो सारं कांहीं पाही. अन् तें अशा कांहीं बेफाम आणि जोमदार शैलीनं लिहीत असे कीं, कॉमस्टॉक-मंडळींना तें अतिशय आवडे. गुडमन कुणावरच निर्बंध घालीत नसत. त्यांच्या मदतनीसांना मनसोक्त लिहितां येत असे. ते वारंवार परस्परांविषयीं औपरोधिक, प्रहसनात्मक लिखाण करीत. केवळ बातम्यांपेक्षां अशा लिखाणानें कॉमस्टॉक-मंडळींना अधिक आनंद होई. ह्या अशा वातावरणांत मार्क ट्वेन घडवला जात होता.

नवागताचा सर्वांशीं चटकन् परिचय झाला. 'एन्टरप्राइज'चे चालक, संपादक, मुद्रक सामाजिक दृष्टया समानतेनें—एका कुटुंबांतल्या माणसांसारखे वागत. शहरांतल्या बातम्या गोळा करून लिहून काढण्याचं काम क्लेमेन्सकडे आलं. त्यांत त्याला अवघड कांहींच नव्हतं. ह्या कर्णधाराची स्मरणशक्ति अनावश्यक गोष्टींचीहि नोंद करीत असे. सत्य घटनांचा कंटाळा आला कीं, तो मधून मधून मनोरंजक लिखाण करी. त्यांत बहुधा डॅनविषयीं अगर प्रतिस्पर्धी पत्राच्या वार्ताहराविषयीं गमतीचा मजकूर असे. डॅन प्रभृति उत्तरादाखल लिहीत अन् कॉमस्टॉक-मंडळी स्वतःची करमणूक करून घेत, हसत असत. असे ते दिवस मोठे मजेचे होते.

त्या काळांत त्याच्या सहकाऱ्यांपैकीं फारच थोडया जणांना दिसलं असं एक अंग सॅम्युएल क्लेमेन्सला होतं. तें म्हणजे कवित्वाचं, विचारप्रधान अंग! जोसेफ गुडमन यांनीं त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा पैलू पारखून त्याचा विकास घडवून आणला. अनेकदां हीं दोघं एकत्र जेवतांना अगर फिरतांना, आपण वाचलेल्या पुस्तकांवर चर्चा करीत आणि आपल्याला हृद्य वाटलेल्या काव्यपंक्तींचा रस एकमेकांना चाखायला देत. क्लेमेन्स कधीं कधीं 'बेरियल ऑफ मोझेस' ही कविता मोठ्या

जोमदारपणें गाई. डोळे अर्धवट मिटलेले आहेत, बोटांत जळती सिगारेट आहे, हनुवटी किंचित् उचललेली आहे अशा थाटांत त्या रसोत्कट ओळींतल्या संगीतांत तो देहभाव विसरे :

[मराठी भावार्थ :—नीबोच्या एकुलत्या एक डोंगरापाशीं, जॉर्डन नदीच्या एका कांठावर, मोब लोकांच्या प्रदेशांतल्या एका दरींत एकुलतें एकच एक थडगें विश्रांति घेत आहे. कोणाहि माणसानं तें कधींच पाहिलेलं नाहीं. परमेश्वराच्या दूतांच्या करणीनं तिथं एक मृत मानव पडून राहिलेला आहे.]

ह्या कवितेच्या सुगम परंतु भव्य आशयाचा ठसा त्याच्या स्वतःच्या लिखाणावर उमटला याविषयीं आपल्याला मुळींच शंका नाहीं. ही कविता म्हणजे त्याच्या मतें एक वाङ्मयीन उपमान असावें.

एकदां गुडमन आणि क्लेमेन्स असेच एकत्र जेवत असतांना, कार्सन सिटींत भरणाऱ्या कायदेमंडळाच्या आगामी अधिवेशनाचें इतिवृत्त पाठविण्याची कामगिरी मजवर सोपवा असें क्लेमेन्सनें सुचवलें. प्रथम गुडमन यांनीं कांकू केलं. पण मग त्यांच्या ध्यानांत आलं कीं, कायदेमंडळाचा असो किंवा कसलाहि असो, क्लेमेन्स आपलें वृत्त वाचनीय खासच करणार. त्यांनीं अनुमति दिली. अशा रीतीनें १८६३ सालच्या प्रारंभीं, सरहद्दीवरील राजकारणी माणसांचे स्वभाव ह्या नव्या आणि मजेशीर क्षेत्रांतील अभ्यासास सॅम्युएल क्लेमेन्सनें प्रारंभ केला. यापेक्षां अधिक चांगली शाळा त्याला कुठून लाभणार होती? त्यांचीं विनोदी, औपरोधिक आणि विशिष्ट शब्दप्रयोगांनीं परिपूर्ण अशीं पत्रें जवळ जवळ प्रथमपासून त्या विस्तृत किनाऱ्यावरील सारे लोक निवडक लिखाण म्हणून कटाक्षानें वाचूं लागले. पहिल्यांदा तो कामकाजाच्या बाबतींत चमत्कारिक घोडचुका करूं लागला. पण प्रारंभींच्याच पत्रांतून त्यानं आपल्या अज्ञानाची स्पष्ट कबुली दिल्यामुळें त्या घोडचुकांमुळेंच प्रामुख्यानें तीं पत्रें गमतीचीं होऊन बसलीं.

व्हर्जिनिया सिटीमध्यें 'युनियन' नांवाचें एक प्रतिस्पर्धी पत्र होतें. त्याच्या 'राइस' नामक वार्ताहरानें 'एन्टरप्राइज' मधील चुका दाखवून आपल्या लेखाच्या शेवटीं एक टिंगलवजा मजकूर लिहिला. क्लेमेन्सनें पुढल्याच लेखांत कबूल केलें कीं, राइसचें इतिवृत्त पुरेसें संसदीय थाटाचें असेलहि पण वरवरच्या भपकेदार तांत्रिक गोष्टीखालीं तो चुकीचीं विधानें दडपून देतो. तीं विधानें पूर्णतया अविश्वसनीय असतात, असें मी शपथपूर्वक सांगू शकेन. राइस हा अत्यंत

अविश्वसनीय वार्ताहर आहे!" कार्सन सिटींतल्या आणि कॉमस्टॉक-मंडळींना ही थट्टा फार आवडली. पुढें 'राइस' जन्मभर 'अविश्वसनीय' ठरला!

इथें आणखी एका नावाची गोष्ट सांगितली पाहिजे. त्या काळांत लेखकानं टोपणनांवानं लिखाण करण्याची फॅशन होती. विशेषतः वृत्तपत्रीय आणि विनोदी लेखकांना तर टोपणनांव हवंच. क्लेमेन्सन या गोष्टीचा खूप विचार केला. छोटंसं पण शक्तिशाली, वाचकाच्या मनांत चटकन् घर करून बसेल असं एकादं नांव त्याला हवं होतं. नेमकी त्याच वेळीं कॅप्टन इसय्या सेलर्सच्या मृत्यूची वार्ता येऊन ठेपली. मार्क ट्वेन या टोपणनांवानं लिखाण करणारा हाच तो कर्णधार! मार्क ट्वेन! बस्स, असेंच नांव त्याला हवें होतें. आतां यापुढें कॅप्टन सेलर्सला त्याची गरज केव्हाच भासणार नव्हती. तें नाव जिवंत ठेवण्यांत, नव्या प्रदेशांत त्याला नवा अर्थ प्राप्त करून देण्यात कोणाची कसलीच हानि होणार नव्हती. क्लेमेन्स कार्सनहून व्हर्जिनिया सिटी इथं आला.

तो गुडमनला म्हणाला, "जो! मला माझ्या लेखांवर स्वतःचं नांव असावसं वाटतं. अधिक लोकांनीं मला ओळखावं असं मला वाटतं."

"ठीक आहे, सॅम! पण तूं कोणतें नाव टाकणार? जोश?"

"नाहीं. मी मार्क ट्वेन हें नांव टाकणार आहें. तें अर्थपूर्ण नांव आहे. अंधाऱ्या रात्रीं नावाड्याला दिलासा देणारे शब्द आहेत ते. पुढील जलमार्ग सुरक्षित आहे, असा त्याचा अर्थ होतो."

क्षणभर विचार करून गुडमन म्हणाले, "ठीक आहे, सॅम! नांव तर चांगलं दिसतंय् हें."

आज आपण तें सर्वोत्कृष्ट नांव म्हणून ओळखतों.

२ फेब्रुवारी १८६३ रोजीं कार्सनमध्यें लिहिलेल्या पत्राखाली 'मार्क ट्वेन' अशी सही प्रथम झळकली. आणि त्यानंतर सॅम्युएल क्लेमेन्सच्या सर्व लिखाणावर तेंच नांव झळकूं लागलं. थोड्याच काळांत केवळ एका टोपण नांवापेक्षां जास्त अर्थ त्या नांवाला प्राप्त झाला. आपण स्वतःसाठीं व आपल्या लेखांसाठीं एक नांव मिळवलं असं क्लेमेन्सला दिसून आलं. प्रत्येक जण त्याला 'मार्क' असंच संबोधूं लागला. त्या नांवाचा ध्वनि किनाऱ्यावरील वृत्तपत्रांना अतिशय आवडला. त्यांच्या वाचकांना त्यांतून विशेष प्रचीति येऊं लागली. कायदे-मंडळाचं तें अधिवेशन संपण्याच्या सुमारास सॅम्युएल क्लेमेन्सनें मार्क ट्वेन या नात्यानें पश्चिम किनाऱ्यावरील त्या उतरत्या भूप्रदेशांत कीर्तीसारखें कांहींतरी प्राप्त करून घेतलें.

१८६३ च्या अखेरीपर्यंत मार्क ट्वेनच्या जीवनांत नवें वाङ्मयीन चैतन्य

अवतरलें. त्या वर्षीं सर्वांचे आवडते, मनमिळाऊ विनोदी लेखक आर्टेमस वॉर्ड (चार्ल्स् एफ्. ब्राउन) पश्चिम प्रदेशांत व्याख्यानें देत देत व्हर्जिनिया सिटींत येऊन पोंचले. 'एन्टरप्राइज' च्या कचेरींत त्यांनीं आपला मुक्काम ठोकला. तीन आठवडे ते तिथं होते. त्यांची आणि मार्क ट्वेनची चांगलीच दोस्ती जमली. त्यांची अंतःप्रवृत्ति समानधर्मीय होती. जवळ जवळ नेहमींच ते बरोबर फिरत. वॉर्ड त्यावेळीं कीर्ति-शिखरावर होते. त्यांनीं ह्या तरुण मनुष्याला जास्तींत जास्त प्रोत्साहन दिलें. त्याच्या लिखाणाचें भवितव्य अतिशय उज्ज्वल असल्याचा निर्वाळा दिला. ह्यावेळीं प्रथमच क्लेमेन्सच्या मनांत वाङ्मयीन महत्त्वाकांक्षेनें मूळ धरलें. आपणहि मानाची जागा पटकावूं असं त्याला वाटूं लागलं. पूर्वेकडील वृत्तपत्रांतूनहि लिखाण करण्याचं आश्वासन त्यानं वॉर्ड यांना दिलं. वॉर्ड यांनीं नंतर त्याला मोठ्या आपुलकीनं लिहिलं, "माझ्या जीवनांतले अत्यंत आनंदाचे दिवस म्हणून व्हर्जिनियांतील वास्तव्याची आठवण मला सतत राहील. तें गांवच तसं आहे. सारीं शहरं तशीं असावींत, किंवा असं म्हणतां येईल कीं, सारींच शहरं तशीं होऊं शकणार नाहींत." आर्टेमस वॉर्डच्या प्रोत्साहनामुळें मार्क ट्वेन आपलं लिखाण आतां पूर्वेकडील पत्रांना पाठवूं लागला. 'न्यूयॉर्क सण्डे मर्क्युरी'नें त्याचा एक किंवा बरेच लेख छापले पण ते तसे मुळींच गाजले नाहींत.

नोकरीव्यतिरिक्त लिखाण करायला त्याला बहुधा उसंत नसावी. कारण १८६४ सालचें कायदेमंडळाचें अधिवेशन नुकतेंच सुरू होत होतें. शिवाय 'तिसरें सभागृह' नांवाच्या एका लुटुपुटीच्या कायदेमंडळाचा त्याला गव्हर्नर करण्यात आलें होतें. त्या कार्यक्रमाचें उत्पन्न एका चर्चला द्यायचें होतें. प्रत्यक्ष खऱ्या गव्हर्नरापासून तों तहत् सर्व दर्जाच्या सरकारी नोकरांपर्यंत, प्रतिष्ठित व्यक्तींच्या मेळाव्यासमोर व्यासपीठावरून हा 'गव्हर्नर' औपरोधिक संदेश देणार होता. किओककमध्यें त्या मुद्रकांच्या मेजवानीच्या प्रसंगीं केलेल्या छोट्या भाषणाखेरीज एक वक्ता या नात्यानें मार्क ट्वेन प्रथमच पुढें येत होता. आयुष्यभर व्यासपीठा-वरून गाजवायच्या व्याख्यान-मालिकेची ती नांदी होती. त्या थट्टेंतून कुणीच सुटलं नाहीं. प्रथमपासून अखेरपर्यंत सारं सभागृह हंशा आणि टाळ्यांनीं निनादत होतं. मार्क ट्वेननं दिलेल्या ह्या पहिल्या व्याख्यानांतला एकहि शब्द जतन करून ठेवण्यांत आलेला नाहीं, पण ज्यांनीं तें ऐकलं त्यांच्या मतें त्याचा तो निःसंशय मोठाच प्रयत्न असावा. ह्या 'तिसऱ्या सभागृहांत' केलेल्या भाषणाबद्दल 'गव्हर्नर मार्क ट्वेन यांस' अशीं अक्षरें कोरलेलें एक सोन्याचें घड्याळ त्याला देण्यात आलें. एक महत्त्वपूर्ण व्यक्ति म्हणून सर्वत्र त्याचा नामोल्लेख होऊं लागला आणि

विशिष्ट हेल काढून त्यानं मारलेले शेरे पुनःपुनः उपयोगांत आणले जाऊं लागले.

नेवाडाचे गव्हर्नर बहुधा गैरहजर असायचे अन् ओरियन क्लेमेन्सच त्या भागांतील कारभाराचा प्रशासक बनला होता. कार्सन सिटींत त्यांच्यांत येऊन सामील झालेली त्याची पत्नी त्या छोट्या राजधानींतल्या सामाजिक जीवनाची अध्वर्यु होती. अन् आतां नव्या गुणविशेषामुळें गाजणारा व पुन्हां रंगेल पोषाख करूं लागलेला त्याचा भाऊ सॅम म्हणजे समाजाचा एक प्रमुख अलंकार होऊन बसला होता. सुमारें तीनच वर्षांपूर्वी इथं येऊन दाखल झाल्यापासून त्याच्या जीवनांत केवढा मोठा बदल झाला होता हा! मे १८६४ च्या सुमारास मार्क ट्वेननें सॅन फ्रॅन्सिस्कोला जाण्यासाठीं नेवाडाचा निरोप घेतला. मार्क ट्वेन आणि प्रतिस्पर्धी पत्राचा संपादक यांच्यांत एक द्वंद्वयुद्ध योजलं होतं. हेंच त्याच्या प्रयाणाचं तत्कालीन कारण होतं. पण हें द्वंद्व कधींच झालं नाहीं. तो सारा प्रकार म्हणजे विनोद होता. अन् हा सारा बनाव विनोदमूर्ति स्टीव्ह जिलिस यानं रचला होता.

द्वंद्वाबद्दलच्या नव्या कायद्यांत खऱ्या अन् लुटुपुटीच्या द्वंद्वांत भेद करण्यांत आला नव्हता. सॅम अन् जिलिस यांचं मन केव्हांच सॅन फ्रॅन्सिस्कोकडे आकर्षिलं गेलं होतं. आतां नव्या कायद्यानुसार आमच्यावर समन्स बजावलं जाईल, या आयत्या सबबीवर ते तिथून निसटूं शकले. हे दोघे परम मित्र होते. लौकरच ते 'मॉर्निंग कॉल' या पत्रांत काम करूं लागले. क्लेमेन्सला वार्ताहराचं अन् जिलिसला जुळाऱ्याचं काम मिळालं होतं. 'एन्टरप्राइज'पेक्षां इथं स्वातंत्र्य कमी अन् काबाडकष्ट अधिक होते. 'कॉल' च्या नव्या नोकरींत मार्क ट्वेन सुखी नव्हता दिवसभर पोलिस-कोर्टें, आगी, विवाह समारंभ अन् अंत्यसंस्कार यांत जाई. रात्रीं मधून मधून चित्रपटगृहांचें ओझरतें दर्शन. एकदां त्यानं लिहिलं होतं :—
"तिथं भयानक काबाडकष्ट, अगदीं हृदयशून्य काबाडकष्ट, कशांत रसच नाहीं असे. आळशी माणसाला तर ती भयानक गुलामगिरीच."

पण सॅन फ्रॅन्सिस्कोंतल्या जीवनाला एक लाभदायक अन् सुखकारक अशीहि बाजू होती. तिथं खरेखुरे वाङ्मयाचे चाहते होते. त्यांतला एक तरुण तर 'कॉल'-च्या वरच्याच मजल्यावर राहत असे. चार्लस हेन्री वेब यांनीं नुकत्याच संस्थापिलेल्या 'कॅलिफोर्नियन' ह्या नव्या वाङ्मयीन साप्ताहिकाच्या या संपादकाचं नांव होतं—फ्रॅन्सिस ब्रेट हार्टे ! ब्रेट हार्टे अद्याप ख्यातनाम नव्हता. पण पॅसिफिकच्या बाजूच्या ह्या भूभागांत त्याच्या अंगच्या गुण मान्यता पावला होता, विशेषतः

'ईरा' गटाच्या लेखकांच्या वर्तुळांत! बरंच महत्त्वाचं स्थान असलेल्या 'गोल्डन ईरा' नांवाच्या वाङ्मयीन मासिकामुळें त्यांना तसं नांव पडलं होतं. प्रेंटिस म्युलफर्ड, ब्रेट हार्टे, चार्लस् वॉरन स्टॉडार्ड, मार्क ट्वेन, आर्टेमस वार्ड वगैरे मंडळींचा एक विचित्र गट तेथें जमल्याची आठवण जोआकिन मिलर सांगतात. व्हर्जिनिया सिटींत असल्यापासूनच मार्क ट्वेननं 'कॉल' मध्यें लिखाण केलेलं होतं. अन् आतां ब्रेट हार्टेच्या बरोबरीनें तो त्या गटाचा नेता मानला जाऊं लागला. ते दोघे सारखे एकत्र असत. आणि हार्टे 'कॅलिफोर्नियन' चे संपादक झाल्याबरोबर त्यांनीं क्लेमेन्सशीं दर लेखाला बारा डॉलरचा करार केला. 'स्केचेस न्यू अँड ओल्ड' मध्यें समाविष्ट केलेलीं कांहीं छोटीं प्रकरणं याच काळांतलीं आहेत.

'रफिंग इट' मधल्या वर्णनांवरून आपल्याला दिसून येतें कीं, 'कॉल'मधून पुढें मार्क ट्वेनला सर्वसाधारणपणें नालायक' म्हणून काढून टाकण्यांत आलं अन् लौकरच त्याचं खडतर जीवन कर्ज आणि दारिद्य यांच्यामुळें अधिक दुःखमय झालं. परंतु ही झाली सांगायची कथा. स्वतःसंबंधींची कथा ही शक्य तितकी आत्मस्तुतीपासून दूर ठेवायची त्याची फार पूर्वीपासूनची संवय होती. खरा कथा-भाग असा होता कीं, 'कॉल'चे प्रकाशक आणि मार्क ट्वेन यांच्यांत मित्रत्वानें वाटाघाट होऊन त्यानें संबंध सोडणेंच अधिक चांगलें असें ठरलें. जवळ जवळ तावडतोब त्यानं 'एन्टरप्राइज'साठीं सॅन फ्रॅन्सिस्कोहून दररोज एक पत्र लिहायला प्रारंभ केला. अन् त्याला या कामाप्रीत्यर्थ आठवड्याला तीस डॉलर मिळूंहि लागले. याखेरीज त्याचं 'कॅलिफोर्नियन' पत्रांतलं उत्पन्न अन् हें उत्पन्न मिळून त्याची प्राप्ति पूर्वीपेक्षां जास्तच झाली.

'एन्टरप्राइज'मध्यें रोज प्रसिद्ध होणाऱ्या पत्रामुळें मार्क ट्वेनला सॅन फ्रॅन्सिस्कोंत लौकरच संकटाला तोंड द्यावं लागलं. आतां तो आपल्याला योग्य वाटेल तें लिहूं शकत असल्यानें पोलिसांच्या लांचबाजीवर त्यानं असे प्रखर प्रहार करायला सुरवात केली कीं, 'एन्टरप्राइज'चे अंक सॅन फ्रॅन्सिस्कोंत येऊन पोंचतांच गावांत एकच खळबळ उडूं लागली. 'एन्टरप्राइज'साठीं तो अशीं पत्रें धाडूं लागला कीं, खुद्द मुद्रकांना भीति वाटूं लागली. गुडमन मात्र निर्भय होता. शब्द न् शब्द तो छापून काढी. सॅन फ्रॅन्सिस्कोच्या पोलिस-प्रमुखानं 'एन्टरप्राइज' वर लावलेल्या बदनामीच्या फिर्यादीमुळें तर त्या पत्राला विलक्षण प्रसिद्धि मिळाली. पण तेवढ्यांत, त्यावेळीं दुर्दैवी वाटली, अशी एक घटना घडली. स्टेव्ह जिलिस नेहमीं दुर्बळांचं संरक्षण करी. एके दिवशीं रात्रीं दोघां तरुणांवर तिघां गुंडांनीं हल्ला चढवलेला पाहून तो त्या दोघांच्या मदतीला धावला. हल्लेखोरांपैकीं एकाला त्यानं पळवून लावलं अन्

दुसऱ्याला रुग्णालयाची वाट दाखवली. दुसऱ्याच दिवशीं कळून चुकलं कीं, ते गुंड म्हणजे पोलिसांचेच हस्तक होते. जिलिसला अटक करण्यांत आली. क्लेमेन्स त्याला जामीन राहिला अन् हें वादळ शांत होईपर्यंत त्यानं व्हर्जिनिया सिटींत जाऊन राहावं असा त्याला सल्ला दिला.

पण मार्क ट्वेनच्या दृष्टीनं वादळ शमलं नाहीं. 'एन्टरप्राइज'मधील कडक पत्रांचा जनक तावडींत सांपडलेला पाहून पोलिसांना आनंद झाला. त्यानीं व्यक्तिगत मालमत्तेसकट त्याला पकडून आणण्याचा हुकूम काढला. तेवढ्यात स्टेव्हचा भाऊ जेम्स एन्. जिलिस वेळींच येऊन पोंचला नसता आणि ट्युओल्यम हिल्समधील खाणीकडे मार्क ट्वेनला गुप्तपणें घेऊन गेला नसता तर 'तिसऱ्या सभागृहाच्या' गव्हर्नरला मिळालेलं सोन्याचं घड्याळ मित्रप्रेमाखातर जमींत गेल्याखेरीज राहिलं नसतं. सध्यां तरी तो शांततापूर्ण एकांतवासाच्या ह्या प्रदेशांत दिवस कठूं लागला. ब्रेट हार्टेनं पुढें 'रोअरिंग कॅंप' आणि 'सॅंडी बार' या गोष्टी लिहून हा प्रदेश विख्यात करून सोडला. ब्रेटच्या त्या गोष्टींतला जिम जिलिस हा वास्तवांतला जेम्स अन् जॅकास हिलवरील त्याची खोली म्हणजे हार्टे आणि अशा अनेक भटक्या वाङ्मयोपासकांचें विश्रांतिस्थानच होतें. तिथं पुस्तकं पुष्कळ होतीं. अन् मैदानी खेळांमधून करमणूक करून घ्यायचीं साधनंहि पुष्कळ होतीं. खाणींत खोदकाम करायचं असेल त्याला तीहि सोय होती. पाहुण्या लेखकाला जिम एकादी आशादायक जागा दाखवून देई अन् सुवर्णकणाच्या सुपासारख्या छोट्या ढिगापासून टेकडीवर कुठंतरी असलेल्या प्रचंड सांठ्यापर्यंत मार्ग कसा काढावा याचे धडे देई. जिलिसनं कधींच कांही लिहिलं नसलं तरी त्याच्या अंगीं लेखकाची कुवत होती. तो गोष्टी सांगे अन् विशेषतः शेकोटी-पाशीं बसून तो कथन करूं लागला कीं, विलक्षण आश्चर्यकारक कथा तो रचीत असे. मार्क ट्वेननं नंतर उपयोग करून घेतलेल्या अनेक कथा प्रथम जॅकास हिलवरच्या या खोलींत जिम जिलिसनं सांगितलेल्या होत्या. एकदां तो म्हणाला, "या गोष्टी माझ्या नाहींत, त्या जिमच्या आहेत. पण मला कधींच त्या त्याच्या-सारख्या सांगतां आल्या नाहींत. तो इतक्या चांगल्या रीतीनें सांगे कीं, विचारतां सोय नाहीं."

एका प्रचंड ओक वृक्षाखालीं बांधलेल्या ह्या साध्यासुध्या लाकडी ओंडक्यांनीं शाकारलेल्या पर्णकुटींत मार्क ट्वेन येऊन दाखल झाला तो काळ १८६४ च्या डिसेंबरच्या प्रारंभींचा होता. जेम्सचा एक धाकटा भाऊ त्यावेळीं तिथं होता. अर्थात् 'रफिंग इट'च्या वाचकांना परिचित असलेला डिक् स्टोकर अन् त्याचं

तें मांजर, टॉम क्वार्ट्झ, हेंहि तिथं होतंच. ते पावसाळ्याचे दिवस होते पण उघाड असे तेव्हां ते खाणींत खोदकाम करायला निघत. आणि जानेवारींत तर मार्क ट्वेन, जिलिस आणि स्टोकर यांनीं कॅलाव्हेरास कौंटींत शिरून एंजल्स कॅंप-जवळ कामाला सुरवात केली. यथातथाच दिसणाऱ्या एका हॉटेलांत त्यांनीं तळ ठोकला अन् हवा स्वच्छ असेल तर त्या दिवशीं मात्र ते मनोभावें काम करूं लागले. पण बहुतेक दिवस पाऊस पडतच असे अन् अन्नहि अगदींच निकृष्ट होत. म्हणून 'एंजल्स कॅंप' मधल्या मोडकळीस आलेल्या त्या पथिकाश्रमातल्या गंजलेल्या स्टोव्हभोंवतींच ते आपला बराचसा वेळ घालवीत असत.

उजाड खाणभागातल्या ह्या हॉटेलांत बेन कून नावाचा एक माजी नावाडी होता. प्रकृतीनं गंभीर असा हा इसम बहुधा शेकोटीपाशीं बसून डुलक्या घेई किंवा ऐकणारा कुणी मिळालाच तर त्याला निरर्थक अशा गोष्टी कंटाळवाण्या सुरांत सथपणानें सांगे. त्याच्या गोष्टी ऐकायला सहसा कुणी थाबत नसे. पण मार्क ट्वेन आणि जिम जिलिस ह्यांना मात्र तो आवडे. एके दिवशीं दुपारच्या कंटाळवाण्या वेळीं त्यानं ह्यांना एका बेडकाची गोष्ट सांगितली. कोलमन नावाच्या माणसापाशीं एक बेडूक होता. कोलमननं त्याला उड्या मारायला शिकवलं होतं. पुढे पैज लागली तेव्हां कावेबाज प्रतिस्पर्ध्यानं ह्या शिकवून तयार केलेल्या कोलमनच्या बेडकावर छऱ्याचं ओझं लादल्यामुळें तो शर्यत कशी हरला तें सारं त्यानं सागितलं. त्या छावणींत काहीं ती गोष्ट नवी नव्हती. पण कस कुणास ठाऊक, क्लेमेन्स किंवा जिलिस याच्यापैकीं कुणींच यापूर्वी ती कथा ऐकलेली नव्हती. त्यांची चागली करमणूक झाली अन् स्वतः गंभीर राहून गोष्ट सागायच्या त्याच्या पद्धतीमुळें तर त्यांना ती अधिकच मनोरंजक वाटली. "बेडकासारखा बेडूक तो, आपल्याला नाहीं त्या गोष्टींत दम वाटत"—खोदकामवाल्यांचं हें पालुपद होऊन बसलं होतं. त्याउलट जिलिस अन् स्टोकर यांचं सोन्याच्या शुद्धीकरणाचं काम अगदीं मन लावून चाललेल पाहून क्लेमेन्स म्हणे, "कचऱ्याचं भांडं तें कचऱ्याचं भांडं, मला नाहीं त्यांत अर्थ दिसत." पुढे कधीं वाटल्यास उपयोग व्हावा म्हणून मार्क ट्वेननं आपल्या नोंदवहींत त्या गोष्टीचा तर्जुमा नमूद करून ठेवला.

खोदकाम म्हणजे बरंचसं निष्फळ काम असे. क्लेमेन्सला त्याचा तिटकारा येई. एके दिवशीं दुपारीं फलाची किंचित् आशा उत्पन्न झालेली असतांहि तो म्हणाला, "जिम ! चल घरीं जाऊं. नाहींतर इथंच आपण गारठून मरूं." प्रत्येक टप्प्यावर सोन्याचा अधिकाधिक वास येत गेल्यानें शुद्धीकरणाचं काम असंच चालू ठेवावं अन् अखेर मौल्यवान् खाण हस्तगत करावी असा जिलिसचा

मानस होता. थंडीनं कुडकुडणारा, चिडलेला क्लेमेन्स प्रत्येक वेळीं 'ही शेवटचीच पाण्याची घागर' असं म्हणत होता. अखेरीस त्यानं निक्षून सांगितलं, "जिम! आतां मात्र याउप्पर मी पाणी आणणार नाहीं!" जिलिसनं तेवढ्यांत घमेलं भर घाण उपसली होती.

"आणखी एकच घागर आण, सॅम!" तो आर्जवानं म्हणाला.

"नाहीं, जिम! आतां नाहीं. मी गोठून जाईन."

"फक्त एकच घागर, सॅम!"—जिमनं पुन्हा विनवलं.

"नाहीं! एक थेंबहि आणणार नाहीं. त्या घमेल्यांत एक लाख डॉलर असले तरी नाहीं."

जिलिसनं त्याच्या नोंदवहींतनं एक पान फाडलं. त्यावर '३० दिवस आमचा या घमेल्यावर हक्क राहील' अशी नोटिस घाईघाईनं खरडून लावून ठेवली. अन् ते एंजल्स कॅंपांत आले—परत खाणीकडे कधीं गेलेच नाहींत!

सॅन फ्रॅन्सिस्कोमधील सगळी गडबड आतां आपण मिटवलीय् असं स्टेव्ह जिलिसचं पत्र आलं तेव्हां तिकडे परत जायचं क्लेमेन्सनं ठरवलं. दरम्यान पाऊस पडून गेल्यामुळें त्यांच्या घमेल्यावरची सारी घाण आपोआप धुवून गेल्यामुळें तळच्या स्वच्छ, शुद्ध सोन्याच्या विटा स्पष्ट दिसूं लागल्या होत्या. तिकडून जाणाऱ्या दोघां परक्या ऑस्ट्रियन नागरिकांनीं तें पाहिलं. पण जवळच जिम जिलिसची नोटिस पाहून त्यांनीं ती मुदत संपेपर्यंत वाट पाहिली. ती संपल्याबरोबर त्यांनीं आणखी कांहीं घमेलीं बाहेर काढून कुणाच्या मतें दहा, तर कुणाच्या मतें वीस, हजार डॉलर कमावले. तें कांहीं असलं तरी अवघ्या एक घागर पाण्यापायीं ती संपत्ति मार्क ट्वेननं हातची घालवली. पण त्यापेक्षां कितीतरी अधिक मोलाची एक सोन्याची वीट त्यानं आपल्या नोंदवहींतनं बरोबर नेली—'उड्या मारणाऱ्या बेडकाची गोष्ट'.

सॅन फ्रॅन्सिस्कोला परतल्याबरोबर कांहीं ती गोष्ट त्यानं लिहून काढली नाहीं. कदाचित् विनोदाच्या दृष्टीनं त्याला बेडकाची ती गोष्ट फारच मिळमिळीत वाटली असावी. यथावकाश त्यानं ती लिहून काढली आणि विनंती झाल्यावरून लौकरच प्रसिद्ध होणाऱ्या आर्टेमस वॉर्डच्या पुस्तकांत समाविष्ट करण्यासाठीं पाठवून दिली. पण ती उशिरां पोंचली. तेव्हां प्रकाशकानं ती 'सॅटर्डे प्रेस'चा संपादक हेन्री क्लॅप याला देऊन म्हटलें, "क्लॅप, तुमच्या पत्राला उपयुक्त अशी ही घे कथा." इतक्या सहजतेनं कथा मिळाल्यामुळें 'प्रेस'वाले आनंदांत होते. 'जिम् स्मायले आणि त्याचा उड्या मारणारा बेडूक' ही

कथा १८ नोव्हेंबर १८६५ च्या अंकांत प्रसिद्ध झाली. तिचा प्रचार आणि प्रसार अतिशय झपाट्यानें झाला. तिच्याबरोबर मार्क ट्वेनचं नांव पर्वतराजी ओलांडून पश्चिमेकडील प्रेअरी प्रदेशांतहि पसरलं. अटलांटिक महासागरच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत पसरलेल्या त्या खंडप्राय प्रदेशांत सर्वत्र तें नांव जाऊन पोंचलं.

कां कुणास ठाऊक पण झाला प्रकार लेखकाला प्रारंभीं रुचला नाहीं. ती कथा विशेष चांगली उतरलेली नाहीं असं त्याचं मत होतं. आईला त्यानं लिहिलं होतं, "काय लिहावं तेंच मला कळत नाहीं, इतकं माझं जीवन रुक्ष झालंय्. नदींत इकडून तिकडे फिरणारा नावाडीच पुन्हां झालों असतों तर बरं असं वाटतंय्. एका रानटी खलनायकाचं व्यक्तिचित्र पाहून न्यूयॉर्कच्या लोकांनीं माझं गुणगान करावं हें पाहून मन खट्टू होतं. आर्टेमस वॉर्डला खूष करण्यासाठींच मीं केवळ ती गोष्ट लिहिली, नाहीं तर 'जिम स्मायले अन् त्याचा उड्या मारणारा बेडूक' ही गोष्ट मीं कधींच लिहिली नसती." अमेरिकेंत तोंपर्यंत झालेल्या विनोदी लिखाणांतील सर्वोत्कृष्ट कथा असं वर्णन जेम्स रसेल लोवेल यानं केलं, तेव्हां त्यानं नंतर त्या कथेबद्दलचं आपलं मत बरंचसं बदललं.

◊ ◊ ◊

९.

# हवाई : व्याख्यात्याच्या भूमिकेंत मार्क ट्वेन

जिलिसची पर्णकुटी आणि एंजल्स कॅंप सोडून परतल्यावर मार्क ट्वेन साधारण वर्षभर सॅन फ्रॅन्सिस्कोंत राहिला. या काळांत त्याची ख्याति देशभर न पसरतां फक्त किनारपट्टीवरील भागातलं त्याचं वजन तेवढं वाढलं. १८६६ च्या वसंत ऋतूंत 'सॅक्रॅमेंटो युनियन' या पत्रानं त्याच्यावर एक कामगिरी सोंपवली. हवाईतल्या लोकांचं जीवन, तेथील व्यापार, शेती आणि स्थूल वैशिष्ट्यें वगैरेंची माहिती देणारीं पत्रें त्यानें पाठवावींत असें ठरलें. मार्चमध्यें तो निघाला. अन् त्या आनंददायक बेटावरील चार महिन्यांच्या वास्तव्याच्या रमणीय आठवणी त्यानं सतत उराशीं बाळगल्या. त्यावेळीं तो तरुण आणि साहसोत्सुक होता. तो सगळीकडे फिरला अन् जें जें पाहिलं तें त्यानं सारं कांहीं आपल्या पत्रासाठीं लिहून काढलं. 'युनियन'मधली त्याचीं पत्रं सर्वदूर वाचलीं गेलीं; उद्धृत केलीं गेलीं. त्याना खास असं वाङ्मयीन महत्त्व नसलं तरी त्यायोगें पत्रकार या नात्यानं त्याच्या कीर्तीत भर पडली. प्रेक्षणीय स्थळं पाहण्याची त्याची त्या काळची हौस अन् चिकाटी दांडगी होती.

हवाई बेटावर क्लेमेन्स तीन महिने होता. अमेरिकेचे चीनमधले प्रतिनिधि म्हणून तिकडे जाण्यासाठीं ॲन्सन बर्लिंगेम त्याच कालावधींत तिथं आले होते. त्याच्या समवेत त्यांचा अठरा वर्षांचा मुलगा एडवर्ड आणि जपानमधील अमेरिकन प्रतिनिधि जनरल व्हॅन व्हॅल्कनबर्ग हेहि होते. एडवर्डनं 'जिम् स्मायले यांचा उड्या मारणारा बेडूक' ही गोष्ट वाचली होती. तिचा लेखक होनोलुलूंत आहे हें त्याला कळलं. पण प्रदीर्घ प्रवासानं तो थकला असल्यामुळें दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्हीच येऊन भेटतों असा निरोप त्यानं मार्क ट्वेनला पाठवला. मार्क ट्वेनला वाटलं, एवढ्या बहुमानास आपण पात्र नाहीं. म्हणून ती मंडळीं जिथं उतरली होती तिथं तो स्वतः सकाळींच मोटारींतून जाऊन थडकला. त्या

मुत्सद्दयांवर आपल्या व्यक्तित्वाचा चांगलाच प्रभाव त्यानं पाडला. चांगल्या गोष्टी परस्परांनीं परस्परांना सांगितल्या अन् सारा वेळ हास्यविनोदांत गेला. तो निघाला तेव्हां जनरल व्हॅल्कनबर्ग त्याला म्हणाले, "मार्क ट्वेनविषयीं कॅलिफोर्नियाला अभिमान वाटतो अन् एक दिवस सगळ्या अमेरिकनांना वाटेल, यांत शंका नाहीं." त्यांचं हें भाकित निःसंशय चांगलं होतं. थोड्याच दिवसांनीं या मुत्सद्दयांनीं त्यांचं फार मोठं काम केलं. 'हॉर्नेट' नांवाचं जहाज समुद्रांत जळून गेल्यामुळें निराधार झालेल्या खलाशांसकट पंधरा उपाशीपोटी माणसांना घेऊन एक होडी सॅनपाहो इथं येऊन पोंचल्याची वार्ता येऊन ठेपली. लौकरच त्यांतल्या अकरा जणांना होनोलुलूला आणून रुग्णालयांत दाखल करण्यांत आलं. नापत्ता बोटींतून वांचवलेल्या ह्या मंडळींची मुलाखत घेतां आली तर काय बहार होईल, असं मार्क ट्वेनला वाटलं. त्याला आपल्या पत्रांत ही हकीकत प्रसिद्ध व्हायला हवी होती. दुसऱ्या दिवशीं सकाळींच एक जहाज सॅन फ्रॅन्सिस्कोला जाणार होतं. त्याला वाटलं, आयुष्यांत अशी संधि एकदांच येते. अन् तो तर त्यावेळीं बिछान्याला खिळलेला होता, जागचा हलूंहि शकत नव्हता.

तेवढ्यांत आकस्मिकपणें ॲन्सन बर्लिंगेम आणि मंडळी त्याच्या खोलींत शिरली. अन् काय होतंय् तें लक्षांत येण्यापूर्वींच मार्क ट्वेनला ती बहुमोल मुलाखत घेण्यासाठीं रुग्णालयाकडे नेण्यांत आलं. बचावलेल्या त्या निःशक्त प्रवाशांकडून ॲन्सन बर्लिंगेम यांनीं, तें जहाज कसं जळालं, त्यानंतरचे भयंकर ४३ दिवस त्यांना जगण्यासाठीं तीव्र झगडा कसा करावा लागला, त्या काळांत खवळलेल्या समुद्रांतला चार हजार मैलांचा प्रवास कसा करावा लागला याची सगळी हकीकत काढून घेतली. ती नीट ऐकून टिपणं घ्यायचीं एवढंच मार्क ट्वेनचं काम होतं. त्यानंतर रात्रभर तो लिहीत होता. जणुं त्याची काळाशीं स्पर्धा चालली होती. दुसऱ्या दिवशीं सकाळीं बोट अगदीं निघायच्या क्षणाला त्याचं तें जाडजूड बाड कुणींतरी बोटीवर फेकलं. आतां यश त्याची वाट पाहत होतं. ९ जुलैच्या 'सॅक्रॅमेंटो युनियन' मध्यें प्रसिद्ध झालेल्या तीन-स्तंभी हकीकतीनं त्या भयानक दुर्घटनेचा पहिला तपशीलवार वृत्तांत लोकांना मिळाला. तारायंत्रानें तो सर्वत्र पोंचवला अन् अत्यंत खळबळजनक घटना म्हणून सर्वांनीं मोठाले मथळे देऊन तो छापला.

ॲन्सन बर्लिंगेम यांच्याविषयींचं प्रेम अन् आदर सॅम्युएल क्लेमेन्सच्या मनातून कधींच कमी झाला नाहीं. त्यानं तो सदैव उराशीं बाळगणंच योग्य होतं, कारण आतांपर्यंत सांगून झालंय् त्याच्यापेक्षां कितीतरी अधिक त्यांनीं त्याच्यासाठीं

केलेलं आहे. एक दिवस ॲन्सन बर्लिंगेम त्याला म्हणाले, "तुझ्या अंगीं फार मोठी कुवत आहे. तुझी बुद्धिमत्ता विलक्षण आहे असं मला वाटतं. आतां तुला कशाची गरज असेल तर ती चांगल्या सहवासानं स्वतःची सुधारणा करून घेण्याची. बुद्धीनं आणि चारित्र्यानं तुझ्यापेक्षां जे श्रेष्ठ असतील त्यांच्याशीं दोस्ती जोड. कनिष्ठांत कधींहि मिसळूं नकोस. सतत वर जा." हा सल्ला क्लेमेन्स कधींच विसरला नाहीं. त्यायोगें त्याला नवें धैर्य, नवी आशा, नवा दृढनिश्चय अन् नवीं ध्येयें प्राप्त झालीं. बर्लिंगेम वरचेवर त्याच्या हॉटेलांत येत आणि मार्क ट्वेनच्या भवितव्याविषयींच्या योजनांवर त्यांची चर्चा चाले.

जुलैच्या अखेरीस मार्क ट्वेन कॅलिफोर्नियाला परतला आणि तो 'सॅक्रॅमेन्टो'च्या कचेरींत गेला. 'हॉर्नेट' संबंधींच्या इतिवृत्ताचा वेगळा मोबदला देण्याचें ठरलें होतें. "तो किती असावा असं तुला वाटतं, मार्क?" चालकांनीं विचारलं.

क्लेमेन्स म्हणाला, "तसा मी विनयशील माणूस आहें. द्या एक स्तंभाला शंभर डॉलर." बिल त्या दरानुसार करण्यांत आलं.

तें बिल घेऊन तो कॅशियरकडे गेला. बऱ्याच वर्षांनीं नंतर त्यानं या प्रसंगाबद्दल लिहिलंय्[1]—"कॅशियर बेशुद्ध पडला नाहीं. पण जवळ जवळ तीच वेळ आली होती. त्यानं चालकांना बोलावणं पाठवलं. ते नुसते नेहमींच्या पद्धतीनं हसले अन् म्हणाले, 'शुद्ध दरोडा आहे हा! पण हरकत नाहीं. द्या ते पैसे. ठीक आहे तें.' एवढे चांगले वृत्तपत्रचालक नंतर माझ्या पाहण्यांत आले नाहींत."

सॅन फ्रॅन्सिस्कोला परतल्यावर सॅम्युएल क्लेमेन्सला वाटलं, आपलं भवितव्य कांहीं उज्ज्वल नाहीं. तो कांहीं चांगला, चतुरस्र पत्रकार नव्हता. तो होता खास प्रतिनिधि, अन् शिवाय व्यक्तिचित्रें रेखाटणारा. त्याच्यापाशीं अनेक योजना होत्या. हवाईत जमविलेल्या माहितीच्या आधारें एक पुस्तक लिहावं अशी त्याची एक योजना होती. दुसरा विचार असा होता कीं, हॉर्नेटच्या दुर्घटनेपासून सुरवात करून नियतकालिकांतून लेख लिहावेत. मग त्यानं 'हॉर्नेट'वर एक लेख लिहिला देखील अन् तो 'हार्पर्स मॅगझीन'नं चटकन् स्वीकारल्यामुळें त्याला आनंद झाला.

त्याची तिसरी योजना अशी होती कीं, हवाई बेटासंबंधीं व्याख्यानें द्यावींत. ह्या उपक्रमाची त्याला धास्ती वाटत होती. दोन वर्षांपूर्वी 'तिसऱ्या सभागृहा'-

१ "वाङ्मयक्षेत्रांतील माझें पहिलें पाऊल"—"My debut as a literary person"

पुढील भाषणांत तो यशस्वी झाला होता. आणि नंतरहि त्यानं चर्चेच्या मदतीखातर कांहीं व्याख्यानं दिलीं होतीं. पण आतांची कल्पना निराळी होती. व्याख्यानं देण्याच्या ह्या कल्पनेला कर्नल जॉन मॅक्कोम्ब यांनीं जोरदार पाठिंबा दिला. ते म्हणाले, "जरूर, जरूर व्याख्यान दे तूं. शहरांतलं सर्वांत मोठं सभागृह निश्चित कर अन् एका तिकिटाला एक डॉलर घे." अखेरची धास्ती ग्रासून टाकण्यापूर्वींच त्यानं एका संगीत विद्यालयाच्या चालकाला गांठलं. अन् २ ऑक्टोबर (१८६६) रोजीं व्याख्यान देण्यासाठीं सभागृह मुक्रर केलं. मग व्याख्यानाची जाहिरात लिहायला तो बसला, अमुक अमुक विषयावर आपण बोलणार आहोंत एवढं लिहून झाल्यावर अखेरीस त्यानं पुढील निरर्थक मजकूर लिहून काढला :

*उत्कृष्ट वाद्यवृंद*

गांवांत आहे, पण बोलावण्यांत आलेला नाहीं.

*सोबत*

भयंकर क्रूर अशा हिंस्र वन्यपशूंची गुहा शेजारच्या
दालनांत प्रदर्शनार्थ ठेवण्यांत आलेली आहे.

*भव्य मशाल-मिरवणूक*

निघेल अशी अपेक्षा करायला हरकत नाहीं, वस्तुतः लोकांना वाटेल
ती अपेक्षा करण्याचा खास हक्क त्यांना बहाल करण्यांत येत आहे.
दरवाजे ७ ला उघडण्यांत येतील. कटकट ८ ला सुरू होईल.

सॅन फ्रॅन्सिस्कोमध्यें मार्क ट्वेन ख्यातनाम होता. व्याख्यानाला चांगलीच गर्दी होणार होती. पण त्याला त्याची जाणीव नव्हती. अपयशाची भीति त्याला अधिकच वाटूं लागली. थिएटरांत आल्यावर त्यानं रंगमंचाच्या बाजूच्या दारानं प्रवेश केला. निम्मेअधिक प्रेक्षागार रिकामं असणार अशी त्याची अपेक्षा होती. विंग्जमधून त्यानं डोकावून पाहिलं तों अगदीं फूटलाइट्सपासून थेटपर्यंत थिएटर चिकार भरलेलं होतं. तो अतिशय घाबरला, पाय लटलट कांपूं लागले, जीभ कोरडी पडली —अशाच स्थितींत तो कसाबसा व्यासपीठापर्यंत पोंचला आणि प्रचंड जल्लोषांत त्याचं स्वागत झालं. टाळ्यांचा कडकडाट एवढा प्रचंड होता कीं, त्याची भीति कुठल्या कुठं लुप्त झाली. टाळ्यांचा गजर विरळ होतांच जणुं आपल्या यशाच्या अन् सुखाच्या लाटेवर आरूढ झालों आहोंत, असं त्याला वाटलं. वर्णनात्मक वक्तृत्व, विनोद आणि खरी करमणूक या दृष्टीनं त्याच्या ह्या व्याख्यानाइतकं सरस व्याख्यान यापूर्वीं कुणींच ऐकलं नसल्याचं नंतर त्याच्या मित्रांनीं सांगितलं.

आतां यापुढें काय करावं याविषयीं मार्क ट्वेनचं मन द्विधा नव्हतं. तो व्याख्यानंच देणार होता. डेनिस मॅक्‌आर्थी यांनीं 'एन्टरप्राइज' मधला आपला वांटा विकला होता अन् ते सॅन फ्रॅन्सिस्कोमध्येंच होते. या प्रामाणिक अन् आनंदी आयरिश गृहस्थाला क्लेमेन्सनं आपला मॅनेजर नेमलं. आणि ह्या दोघांनीं मग कॅलिफोर्निया आणि नेवाडाचा अखंड यशस्वी दौरा पूर्ण केला. त्या प्रारंभींच्या काळांत व्याख्याता या नात्यानं ज्यांनीं मार्क ट्वेनला पाहिलं होतं ते सांगत कीं, व्यासपीठावर येतांच तो आरामांत पडून राही. त्याच्या बगलेंत त्याचं वाटेल त्या कागदावर लिहिलेलं हस्तलिखित असे. तशा अवस्थेंत तो एकाद्या अस्वस्थ कोंबडीसारखा दिसे. त्याची बोलण्याची ढब नंतरच्या काळांत जेवढी संथ अन् हेल काढलेली असायची त्यापेक्षां अधिकच संथपणें अन् हेल काढून त्यावेळीं तो बोलत असे.

त्या काळांत व्याख्यात्याची ओळख करून देणं रास्त समजलं जात असे. क्लेमेन्स सांगे, एक जुना खाणकामगार आता तुम्हांला व्याख्यात्याची ओळख करून देईल. तो सांगे:—"सभ्य स्त्रीपुरुष हो! ह्या माणसाविषयीं मला फक्त दोनच गोष्टी माहित आहेत, पहिली म्हणजे हा कधीहि तुरुंगांत जाऊन आलेला नाहीं. अन् दुसरी म्हणजे, तो कां गेला नाहीं हें मला ठाऊक नाही." व्हर्जिनिया सिटींत पोंचल्यावर त्याचे जुने स्नेही गुडमन म्हणाले, "सॅम, तुझी कुणीं ओळख करून द्यायचं कारणच नाहीं." त्यांनीं एक अभिनव योजना सुचवली. रात्रीं पडदा वर गेला. मार्क ट्वेन पियानोजवळ बसून, जणुं कांहीं तो अजूनहि 'जॉन जे रो' बोटीवरचा बच्चा कर्णधारच आहे अशा थाटांत गात, वाजवीत बसलेला दिसला:—

"Had an old horse whose name
was Methusalem
Took him down and sold him
in Jerusalem
A long time ago."

असं कांहींसं तो गात असतांनाच टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला; तो ऐकून आपण अत्यंत आश्चर्यचकित झालों असल्याचं नाटक त्यानं केलं अन् एक उडी मारून भाषणास प्रारंभ केला.

मार्क ट्वेननं डिसेंबरांतहि आपला व्याख्यानाचा दौरा चालूच ठेवला. त्या महिन्याच्या १५ तारखेला इस्थमस ऑफ पनामा मार्गे तो बोटीनं न्यूयॉर्कला

गेला. त्यानं थोडाबहुत पैसा मिळवला होता. आतां आप्तेष्टांना भेटायला तो निघाला होता. साडेपांच वर्षं त्यानं किनारपट्टीवरील प्रदेशांत काढलीं होतीं. अन् बरीचशी प्रसिद्धीहि मिळवली होती. गैरहजेरीच्या काळांतला हिशेब तो चांगल्या रीतीनें त्यांना सादर करूं शकत होता अन् भवितव्याविषयीं त्याचं मन आशादायक होतं. क्लेमेन्स न्यूयॉर्कमध्यें थोडे दिवस राहिला. लौकरच तो सेंट लुईत येऊन आईला अन् बहिणीला भेटला. तो वयस्क दिसतोय् असं त्यांना वाटलं. पण त्याची वृत्ति बदललेली नव्हती. मायलेकांच्यांतलं हास्य-परिहास्य पुन्हां लौकरच उजळून निघालं. तो हनिबालला गेला. तिथं व्याख्यान दिलं. त्याचं स्वागत तिथं इतकं चागलं झालं कीं, टॉम सॉयरचंहि समाधान झालं असतं. किओककमध्यें त्यानं पुन्हां व्याख्यान दिलं अन् सेंट लुईला परत येऊन जगप्रवासाची योजना'आंखली.

त्याचा जगप्रवास होणार नव्हता—निदान त्यावेळीं तरी नव्हताच. सेंट लुई-मध्यें त्यानं 'क्वेकर सिटी'ची तीर्थक्षेत्राला जायच्या सफरीची जाहिरात पाहिली. अशा तऱ्हेची सफर यापूर्वी कधींच निघाली नव्हती. ती कल्पना त्याला अतिशय पसंत पडली. मनाच्या क्षणैक लहरीनुसार वागण्याच्या स्वभावामुळें त्यानें लगेच 'अल्टा कॅलिफोर्निया'च्या चालकांना कळवलें कीं, "या महान् सागरी सहलीवर आपला प्रतिनिधि म्हणून मला पाठवा." प्रवासांतला नुसता भाड्याचा खर्च १२०० डॉलर होता. 'अल्टा'चे चालक कांकूं करूं लागले. पण कर्नल मॅक्कॉम्ब यांनीं आपल्या सहकाऱ्यांना सागितलं कीं, या प्रकरणींची भांडवल-गुंतवणी वायां जाणार नाहीं. मार्क ट्वेनची सूचना मान्य असल्याचं 'अल्टा'नं कळवलं अन् त्याच्या प्रत्येक पत्राला वीस डॉलर द्यायचंहि त्यांनीं कबूल केलं.

न्यूयॉर्कला पोंचतांच 'अल्टा'च्या प्रतिनिधीकडनं क्लेमेन्सला कळलं कीं, त्याचं बोटीचं तिकीट राखून ठेवण्यांत आलं आहे. पण आपल्याला त्या ख्यातनाम जाहिरात-कंपनीचा प्रतिनिधि म्हणून स्वीकारलं आहे कीं नाहीं याविषयीं तो अजून साशंकच होता. पण लौकरच त्याची ती शंका दूर झाली. तिकिटाच्या टेबलावर आपला क्रम येईपर्यंत वाट पाहत तो बसला असतांनाच एका वृत्तपत्र प्रतिनिधीनं तिथल्या कारकुनाला विचारलं, "नांवं घेण्यासारखे कोण कोण जाताहेत ?"

तो कारकून मोठ्या अभिमानानं नांवं पुटपुटूं लागला—"लेफ्टनंट जनरल शेरमन, हेन्री वॉर्ड बीचर आणि मार्क ट्वेन. बहुधा जनरल बॅंक्स देखील जातील." त्याचा नुसता स्वीकार करण्यांत आला नव्हता तर एक खास आकर्षण म्हणून त्याचा नामोल्लेख करण्यांत येत होता.

'क्केकर सिटी' निघायला अजून दोन महिने अवकाश होता. ह्या मधल्या दोन महिन्यांच्या काळांतहि मार्क ट्वेननं 'अल्टा'साठीं न्यूयॉर्कहून पत्रें पाठवलीं. शिवाय दोन महत्त्वाचीं साहसंहि त्यानं केलीं—एक म्हणजे, त्यानं आपलं पहिलं पुस्तक प्रसिद्ध केलं. अन् त्यानं न्यूयॉर्क सिटींत व्याख्यान दिलं. हीं दोन्ही कामं त्याच्या किनारपट्टींतल्या मित्रांनीं योजिलीं अन् पार पाडलीं. पूर्वेकडे येतां यावं म्हणून चार्ल्स् हेन्री वेब यानं आपलं मासिक बद केलं होतं. त्यानं 'उड्या मारणारा ख्यातनाम बेडूक आणि इतर व्यक्तिचित्रें' संग्रहित केलीं. त्यासाठीं प्रकाशक मिळविण्याचा बराच खटाटोप व्यर्थ गेलेला पाहून त्यानं स्वतःच तें पुस्तक १ मे १८६७ रोजीं प्रकाशित केलं. आपल पहिलं पुस्तक प्रसिद्ध झालेलं पाहून मार्क ट्वेनला विशेष आनंद झालेला दिसून येतो. ग्रंथांच्या चाहत्यांना आज अत्यंत मोलाच्या वाटणाऱ्या त्या छोट्या कापडी व सोनेरी ग्रंथांत बेडकाची गोष्ट आणि इतर २६ व्यक्तिचित्रें समाविष्ट करण्यांत आली होतीं. मार्क ट्वेनच्या निवडक लिखाणांत त्यांतली कांहीं अद्याप जतन करून ठेवण्यांत आलेलीं आहेत. तें पुस्तक चांगलंच खपलं. लेखकाला त्यायोगें खूप प्रसिद्धि अगर द्रव्यप्राप्ति लाभली नसली तरी कोणत्याहि दृष्टीनं तो उपक्रम अयशस्वी झाला असें म्हणतां येणार नाहीं.

त्याच्या दुसऱ्या साहसाच्या मागं—म्हणजे न्यूयॉर्क येथील व्याख्यानाच्या मागं त्याचा जुना 'कॉमस्टॉक' मित्र आणि युटाहचा माजी गव्हर्नर फ्रॅंक फुलर हा होता. मार्क ट्वेन न्यूयॉर्कला पोंचतांच फुलरनं व्याख्यानाचा प्रस्ताव केला. क्लेमेन्स मान हलवून म्हणाला, "इथल्या सर्वसाधारण लोकांत मीं ख्यातनाम कुठाय् ? माझं व्याख्यान ऐकायला दहावीस तरी माणसं जमतील कीं नाहीं कुणास ठाऊक." पण फुलरनं आग्रह धरलाच. लौकरच त्यानं 'कूपर युनियन' हा न्यूयॉर्कमधला सर्वांत मोठा हॉल मुक्रर केला. अत्यंत आनंदानें आणि उत्साहानें ह्या आकर्षक कार्यक्रमाची घोषणा व जाहिरात करण्याच्या उद्योगांत फुलर मग्न झाला.

फुलरनं असंख्य छोटीं हस्तपत्रकं काढलीं अन् त्यांचे गठ्ठे घोड्यागाड्यांतून बांधून ठेवले. ह्या लोंबकळणाऱ्या छोट्या पुंजक्यांचें क्लेमेन्सला खूपच आकर्षण वाटलें. दुसरे कोणी तिकडे लक्ष देतात कीं नाहीं हें पाहण्यासाठीं त्यानं घोड्या-वरनं बरीच रपेट केली. अखेरीस, बऱ्याच वेळानंतर एका उतारूनं एक हस्तपत्रक ओढून त्यावरून नजर फिरविली. त्याच्याबरोबरच्या माणसानं विचारलं, "हा मार्क ट्वेन कोण ?"

"कुणास ठाऊक ! मला तर मुळींच माहित नाहीं."

आतां मात्र व्याख्यात्याला अधिक रपेट करणं शक्य नव्हतं. त्यानं फुलरला हुडकून काढलं. कुरकुरत तो म्हणाला, "फुलर, कुणालाहि यत्किंचित् देखील, कुतूहल दिसत नाहीं." व्याख्यानाचा दिवस उगवला. संध्याकाळपर्यंत थोडींशींच तिकिटं खपलीं होतीं. तें पाहून व्याख्याता हताश झाला. तो म्हणाला, "फुलर, आज रात्रीं 'कूपर युनियन' मध्यें तुझ्या-माझ्याशिवाय कुणीच दिसणार नाहीं. फुलर, कसंहि करून हॉल भरला पाहिजे. तूं पाहिजे तर फुकट पास पाठव सगळ्यांना."

"ठीक आहे." फुलर म्हणाला. "कसंहि करून यावेळीं आपल्याला प्रसिद्धि मिळवायची आहे. पैसा नंतर! आज मी तुला न्यूयॉर्क सिटींत पूर्वीं कधींच जमला नसेल अशा अत्यंत बुद्धिमान् आणि निवडक व्यक्तींच्या मेळाव्यापुढं उभा करतों कीं नाहीं बघ." फुलरनं ताबडतोब न्यूयॉर्क आणि ब्रुकलिनमधल्या शाळामास्तरांना फुकट पास पाठवले.

रात्र झाल्यावर क्लेमेन्स फुलरबरोबर मोटारींतून 'कूपर युनियन' हॉलपाशीं व्याख्यानाच्या अगोदर अर्धा तास पोंचला. चाळीस वर्षांनंतर तो या घटनेबद्दल म्हणतो, "मला दूर राहणं शक्य नव्हतं. ती भव्य गुंफा पाहावी अन् मरून जावं असं वाटत होतं. पण जसजसे आम्ही सभागृहाजवळ येऊं लागलों तसतसे सर्व रस्ते लोकांनीं फुलून गेल्याचें दिसून आलें. हीं सारीं माणसं कूपर इन्स्टिटयूट-कडेच चाललीं आहेत यावर माझा विश्वास बसेना. पण तीं तिकडेच चाललीं होतीं. अखेरीस मी व्यासपीठावर चढलों तेव्हां सभागृह गच्च भरलें होतें. मला आनंद झाला होता. माझ्या भावना इतक्या उचंबळून आल्या होत्या कीं, त्याचं वर्णन करणं माझ्या शक्तीपलीकडचं आहे. त्या लोकांसमोर मीं हवाई बेटांतलं जीवन पूर्णतया साकार केलं आणि ते इतके हसले, त्यांनीं एवढ्या आरोळ्या ठोकल्या, कीं मी संतुष्ट झालों. सव्वा तास मी स्वर्गसुखाचा आस्वाद घेत होतों."

या साहसामुळें मार्क ट्वेनला न्यूयॉर्कमध्यें खूपच प्रसिद्धि मिळाली. आर्थिक दृष्ट्या नफा झाला नसला तरी उत्पन्न तीनशें डॉलर झालं. त्यांतनं खर्च भागवायला खूपच मदत झाली. फुलरनं नेहमींच्या बादशाही रुबाबांत तोटा सोसण्याची तयारी दर्शविली. तो म्हणाला, "मार्क, झालं तें चांगलंच झालं. पैसा मिळाला नाहीं पण पुढं मिळेल. प्रसिद्धि मिळाली आहे. ह्या व्याख्यानानं अन् आतांच प्रसिद्ध झालेल्या तुझ्या पुस्तकामुळं देशांत सर्वात जास्त चर्चा तूर्त तुझ्याबद्दलच होईल. 'अल्टा' आणि 'ट्रिब्यून'ला येणाऱ्या तुझ्या पत्रांचं, यापूर्वीं कोणत्याच प्रवासवर्णनात्मक पत्रांना लाभलं नसेल एवढं भव्य स्वागत होईल."

♤ ♤ ♤

१०.

# परदेशगमन—ऑलिव्हिया लँग्डनचा परिचय

कूपर युनियन हॉलमध्यें व्याख्यान दिल्यानंतर मार्क ट्वेन महिन्याभरानें—८ जून १८६७ ला—६६ यात्रेकरूंसकट 'क्केकर सिटी' ह्या बोटीनें तीर्थक्षेत्रांच्या त्या महान् सफरीवर निघाला. 'दि इनोसन्ट्स अॅब्रॉड' मध्यें ती सारी कथा अगदीं जशीच्या तशी नमूद करण्यांत आलेली आहे. जी बडी मंडळी जाणार म्हणून जाहीर झालें होतें त्याच्यापैकीं मार्क ट्वेनखेरीज कुणीच गेलें नाहीं. पण ही गोष्ट कुणींच मनावर घेतली नाहीं. लौकरच मार्क ट्वेनच्या गप्पा-गोष्टीत ती सारी मंडळी रंगून गेली. कधीं कधीं वृत्तपत्रांना धाडण्यासाठीं लिहिलेलीं पत्रें तो आपल्या सहप्रवाशांना वाचून दाखवी अन् त्यांना सूचना व टीका करण्याची आग्रहपूर्वक विनंती करी. त्यांच्याकडून होणारी टीका अत्यंत मोलाची असे. विशेषतः मिसेस फेअरबँक्स यांच्या सूचना तर अत्यंत मोलाच्या असत. कारण क्लीव्हलॅंडमधली ही मध्यमवयीन सुसंस्कृत स्त्री 'हेराल्ड' ह्या आपल्या पतीच्या नियतकालिकाची वार्ताहर होती.

'इनोसन्ट्स अॅब्रॉड'मध्यें नमूद केलेले सर्व यात्रेकरू प्रत्यक्ष जीवनांतील खरींखुरीं माणसं होतीं. चार्ली ही १८ वर्षें वयाच्या मुलाची व्यक्तिरेखा न्यूयॉर्क मधील एल्मिरांतल्या चार्लस् जे. लॅग्डन वरून घेतली होती. त्याचीच बहीण पुढें मार्क ट्वेनची बायको झाली. असं सांगतात कीं, ऑलिव्हिया लॅग्डनची मार्क ट्वेनशीं पहिली मुलाखत 'क्केकर सिटी' या बोटीवर झाली. पण तें तितकंसं खरं नाहीं. तिथं फक्त तिचं छायाचित्र त्यानं पाहिलं. मूळ व्यक्ति बोटीवर नव्हती. चार्ली लॅंग्डननें मार्क ट्वेनसारख्या बुद्धिमान् माणसाला आपलं दैवत बनवलं अन् एक दिवस त्याला आपल्या केबिनमध्यें निमंत्रण करून आपल्याजवळची सारी चीज-वस्त दाखविली. तींतच ऑलिव्हियाची चिमुकली, गोड प्रतिमा होती. आपल्या या नाजुक भगिनीची तो पोरगा अगदीं मनोभावें पूजा करीत असे. त्या बोलक्या

प्रतिमेकडे सॅम्युएल क्लेमेन्स कितीतरी वेळ पाहत राहिला. अन् तिच्याबद्दल तो अत्यंत आदरानं बोलला. कारण त्या गोड चेहऱ्यावर त्याला कांहीं तरी आगळं चैतन्य दिसून आलं होतं. त्यानतर तो वारंवार लॅग्डनच्या केबिनमध्यें येऊन त्या छायाचित्रांकित मुखमंडलाचं दर्शन घेई. कधीं तरी एक दिवस त्याच्या मालकिणीचा अन् आपला परिचय होईल हें स्वप्न त्यानं उराशीं बाळगलं होतं.

या यात्रेकरूंच्या प्रवासाच्या अगर त्यांनीं केलेल्या साहसांच्या तपशिलांत इथें आपण शिरण्याचं प्रयोजन नाहीं. 'दि इनोसन्ट्स ॲब्रॉड' मध्यें मार्क ट्वेननं पदरचं कांहींहि न घालतां त्यांतले बहुतेक प्रसंग यथायोग्य रीतीनं शब्दरूप केलेलेच आहेत. त्याच्या जुन्या नोंदवह्यांत खरे प्रसंग लिहून काढलेले आहेत. पुस्तकांत मार्क ट्वेननं त्यांच्यांत फारच थोडा फेरबदल केलेला आढळतो. जॅक, डॅन आणि डॉक्टर यांचीं साहसें जरा इकडे तिकडे करून एकत्र गुंफलीं कीं, त्यापासून सत्य फारसं दूर राहत नाहीं. तरीहि त्या जुन्या नोंदवह्यांची गोडी कांहीं निराळीच आहे. पेन्सिलीनं रेखाटलेलीं तीं शब्दचित्रं ताजीं होतीं. हे प्राथमिक ठसे लौकरच जगांतील अत्यंत आल्हाददायक अशा प्रवासवर्णनात्मक ग्रंथांत विकसित होणार होते.

भूमध्यसागराला वळसा घालून न्यूयॉर्कला परतायला 'क्वेकर सिटी'ला पांच महिने लागले. तेवढ्या कालावधींत मार्क ट्वेननें 'अल्टा कॅलिफोर्निया'ला ५२ किंवा ५३ आणि 'न्यूयॉर्क ट्रिब्यून'ला ६ पत्रें पाठवली. एकीकडे प्रवासांतलीं प्रेक्षणीय स्थळें पाहत असतांनाच सरासरीनें आठवड्याला ३ पत्रें लिहून काढायचीं म्हणजे केवढे हे श्रम! लेखकाचा वाङ्मयीन विकास खूपच झालेला आहे हें त्या पत्रांवरून दिसून आलें. बोटीवरील सुविद्य मंडळींचा सहवास, लिखाणाचें दुपारचें सामुदायिक वाचन आणि श्रीमती फेअरबँक्स यांचा सल्ला या गोष्टींनाच त्याचें बरेंचसें श्रेय आहे. पण त्याबरोबरच पॅलेस्टाइनच्या प्रवासांत लेखकानं 'जुन्या करारा'च्या किंग जेम्स-कृत आवृत्तीचा जो सखोल अभ्यास केला त्याचा लेखकाच्या शैलीवर खूपच प्रभाव पडला, असं मानायला हरकत नाहीं. 'दि इनोसन्ट्स ॲब्रॉड' मधील अनेक उत्कृष्ट, वर्णनात्मक उताऱ्यांचं भाषासौष्ठव जवळ जवळ बायबलच्या भाषेसारखंच आहे.

मार्क ट्वेन अमेरिकेंत परत आला तेव्हां अगदीं 'ख्यातनाम' जरी नाहीं तरी आपण खूप 'प्रसिद्धीस आलेले' आहोंत असं त्याला दिसून आलं. 'अल्टा' आणि 'ट्रिब्यून' मधील पत्रांनीं मायदेशाच्या कानाकोपऱ्यांत त्याचं नांव नेलं. आतां त्याला मागणी येऊं लागली. आईला त्यानं लिहिलं, "प्रत्येक

व्याख्यानाला १०० डॉलर याप्रमाणें संघराज्याच्या निरनिराळ्या भागांतून १८ व्याख्यानांचीं निमंत्रणं मला आलीं आहेत. पण मीं त्या सर्वांना नकार दिला. मी तूर्त 'टिब्यून'मध्यें नोकरीला असून मधून मधूनच लिहीत जाईन. 'हेराल्ड'नेंहि पत्र पाठवून अशीच जागा आज देऊं केली होती." त्यावेळीं तो वॉशिंग्टनमध्यें होता. नेवाडाचे सीनेटर स्टेवार्ट यांचें चिटणीसपद त्यानें स्वीकारलें होतें. पण ही नोकरी थोड्या कालावधीपुरतीच होती. वॉशिंग्टनमध्यें अगदीं थोडे दिवस काढल्यावर त्याच्या स्वप्नांतहि आलें नसेल असें एक महत्त्वाचें पत्र त्याला आलें. कनेक्टिकटमधील हार्टफोर्ड येथील अमेरिकन पब्लिशिंग कंपनीचे व्यवस्थापक एलिशा ब्लिस (ज्युनियर) यांनीं त्याच्या भूमध्यसागरांतील प्रवासवर्णनात्मक पत्रांच. संग्रह प्रसिद्ध करण्याचा मानस त्यांत व्यक्त केला होता.

तो प्रस्ताव मार्क ट्वेनला अतिशय आवडला. त्यानें तावडतोब उत्तर धाडलें आणि ब्लिस यांच्या योजनेचा आणखी तपशील मागवला. पुढें तो स्वतः हार्टफोर्डला गेला आणि 'दि इनोसन्ट्स ॲब्रॉड'च्या अटी मुक्रर करण्यांत आल्या. मोठ्या आकाराचें तें सचित्र पुस्तक वर्गणीदारांना विकावें आणि विक्रीच्या किंमतीवर लेखकाला पांच टक्के मोबदला मिळावा असें ठरलें. ही रॉयल्टी किंवा रोकड १० हजार डॉलर असे पर्याय ब्लिस यांनीं त्याच्यापुढें ठेवले होते. मोठी रक्कम हातांत येत आहे असं पाहून खूप मोह होत असूनहि त्यानं रॉयल्टीच्या प्रस्तावासच होकार दिला. "मीं घेतलेला तो अत्यंत व्यवहारकुशल निर्णय ठरला"—असं मार्क ट्वेन पुढें म्हणत असे.

खरोखरच मार्क ट्वेनच्या आयुष्यांतला तो अत्यंत महत्त्वाचा कालखंड होता. 'क्वेकर सिटी'वरल्या खोलींतला मित्र डॅन स्लोट याला भेटायला सॅम्युएल क्लेमेन्स डिसेंबरच्या उत्तरार्धांत एके दिवशीं सायंकाळीं न्यूयॉर्कला आला असतां त्या बोटीवरचे जॅक व्हॅन नोस्ट्रॅंड, चार्ली लॅंग्डन आदि मित्रहि त्याला तिथं भेटले. चार्लीचे वडील आणि त्याची बहीण हीं दोघें तूर्त न्यूयॉर्कमध्यें होतीं. त्यानंतर एक-दोन दिवसांनीं चार्लीनें 'क्वेकर सिटी'वरील आपल्या ह्या विख्यात मित्राला त्यांच्या कुटुंबियांसमवेत प्राचीन सेंट निकोलस हॉटेलमध्यें रात्रींच्या भोजनाचें निमंत्रण दिलें. सॅम्युएल क्लेमेन्स अगदीं मनापासून तिथं गेला असं मानायला हरकत नाहीं. त्या गोड चेहऱ्याची प्रतिमा प्रथम पाहिली तो सप्टेंबरांतला दिवस सॅम्युएल कधींच विसरला नव्हता. पुढें बऱ्याच दिवसांनीं तो म्हणाला, "चाळीस वर्षे होऊन गेलीं. तेव्हांपासून आजपर्यंत ती माझ्या अंतःकरणाच्या बाहेर कधींच गेली नाहीं." त्यावेळीं ऑलिव्हिया लॅंग्डन २२ वर्षांची होती. त्यानं प्रतिमेंत

पाहिली तितकीच नाजुक होती ती. सुस्वभावी, आकर्षक अन् प्रेमळ अशी ऑलिव्हिया म्हणजे त्या कुटुंबांतलं दैवत होतं. आणि त्यांची पहिली मुलाखत झाली त्या क्षणापासून सॅम्युएल क्लेमेन्स सदैव तिचा पुजारी होता.

ह्या विलक्षण, बुद्धिमान् आणि सुस्वरूप तरुणाला पाहून मिस् लॅंग्डनचे डोळे अगदीं प्रथम दिपून गेले होते. यापूर्वी असला तरुण तिनं पाहिला नव्हता. आपल्या ख्यातनाम मित्राबद्दल तिचं मत चांगलं व्हावं असंच तिच्या भावाला सारखं वाटत होतं. त्याच्यापाशीं तिनं संपूर्ण पसंती जरी नाहीं तरी कौतुकमिश्रित आनंद व्यक्त केला. तिच्या पित्याला तर शंकाच नव्हती. कुशाग्र विनोदबुद्धि आणि माणसांविषयींचें सखोल ज्ञान असलेले जर्व्हिस लॅंग्डन त्या रात्रीपासूनच मार्क ट्वेनचे चाहते बनले. सुटीच्या दिवशीं पुन्हां क्लेमेन्सनें मिस् लॅंग्डनची भेट घेतली. आणि त्यानंतरच्या रविवारपर्यंत त्यानं निश्चय केला कीं, लौकरच एल्मिराला जायचं. पण नशिबांत निराळं लिहिलेलं होतं. त्याला त्यानंतर जवळजवळ वर्षभर एल्मिराला जायला मिळालं नाहीं. वॉशिंग्टनला परतल्यावर पुस्तकाची पूर्वतयारी आणि वृत्तपत्रांशीं पत्रव्यवहार या कामांना त्यानं हात घातला.

पुस्तकाच्या पूर्वतयारीचं काम कांहीं सहज होण्याचीं चिन्हं दिसेनात. 'अल्टा'-नं त्याच्या पत्रावरील आपले हक्क राखून ठेवले असल्याचं त्याला दिसून आलं अन् तीं पत्रं त्याला वापरूं द्यायला ते नाखूषच दिसले. त्यानं ताबडतोब बोटीनं सॅन फ्रॅन्सिस्कोला जायचं ठरवलं. तिथं 'अल्टा'शीं तो करार करूं शकल्यास तिथंच त्याचं काम पूर्ण होणार होतं. त्याचा जुना मित्र कर्नल मॅक्कॉम्ब यानं अखेरीस 'अल्टा'तील पत्रं विना-मोबदला वापरण्याची परवानगी त्याला मिळवून दिली. आतां त्याच्या पुस्तकाचा मार्ग मोकळा झाला होता. तो नेहमींच्या उत्साहानं कामाला लागला—संपादन आणि पुनर्लेखन—आणि दोन महिन्यांतच त्यानं आपलं जाडजूड हस्तलिखित प्रकाशकांना देण्यासाठीं तयार करून टाकलं.

कॅलिफोर्निया आणि नेवाडामध्यें व्याख्यानाचा दौरा आंखतां येईल इतपत मार्क ट्वेननें आपलं प्रयाण लांबणीवर टाकावं असा त्याच्या मित्रांचा आग्रह पडला. त्यानंहि संमति दिली आणि व्हर्जिनिया सिटी, कार्सन वगैरे सर्व ठिकाणीं एकाद्या विजेत्याचं परतल्यावर व्हावं तसं त्याचं स्वागत झालं. बोटींत बसण्यापूर्वी त्यानं सॅन फ्रॅन्सिस्कोला पुन्हां एक व्याख्यान दिलं.

त्या व्याख्यानाची जाहिरात करणाऱ्या छोट्या हस्तपत्रकावर सॅन फ्रॅन्सिस्कोतील प्रमुख नागरिकांनीं कृतक निषेधानें म्हटलें होतें कीं, "मार्क ट्वेननें आतां निष्कारण येथील नागरिकांच्या मानगुटीवर न बसतां शक्य तितक्या लौकर

न्यूयॉर्कला निघून जावें." त्याच हस्तपत्रकावर त्याचं उत्तर छापण्यांत आलं होतं. त्यांत त्यानं म्हटलं होतं :—"मला वाटल्यास मी लोकांचा छळ करीन. त्याकरतां त्यांना अवघा एकच डॉलर तर भुर्दंड पडतो. अन् तोहि त्यांना सोसवत नसेल तर ते इथं राहतात तरी कशासाठीं?" ३ जुलैचं हें एवढंच व्याख्यान देण्याची मुभा मिळाली तर आपण ६ जुलैला नक्की बोटीनं निघून जाऊं, असं आश्वासन त्यानं दिलं होतं. ६ जुलै रोजीं ॲस्पिनवॉल मार्गे मार्क ट्वेन न्यूयॉर्कला बोटीनें रवाना झाला. आणि २८ जुलैला त्यानं 'दि इनोसन्ट्स ॲब्रॉड' किंवा 'दि न्यू पिलग्रिम्स प्रोग्रेस' चं हस्तलिखित हार्टफोर्ड प्रकाशकाच्या स्वाधीन केलं.

आतां लँग्डन-कुटुंबाला भेट देण्याचं बरंच लांबणीवर टाकलेलं काम करायचं क्लेमेन्सनं ठरवलं. चांगला आठवडाभर त्यानं लॅग्डन-कुटुंबियांच्या मनःपूत आदरातिथ्याचा आस्वाद घेतला. ऑलिव्हिया लँग्डनच्या सुखद सहवासांत त्याच्या अधिकाधिक लक्षांत आलं कीं, जगात आपल्यासाठीं हिच्याखेरीज अन्य कोणतीहि स्त्री नाहीं. पण असलं अवाक्षरहि त्यानं तिजपाशीं काढलं नाहीं. त्याचा हा मुक्काम संपायचा दिवस उगवल्यावर मात्र सकाळींच त्यानं चार्ली लॅग्डनपाशीं आपलं मनोगत सांगितलं. तें ऐकून चार्लीला आश्चर्याचा धक्का बसला. मार्क ट्वेनविषयीं त्याच्या स्वतःच्या मनांत कमालीचं कौतुक होतं. पण तो अगर दुसरा कुणीहि आपल्या 'लिव्ही'ला योग्य आहे असं त्याला वाटत नव्हतं. त्या दिवशीं संध्याकाळच्या गाडीनं क्लेमेन्स जाणार होता. सायकाळचं जेवण उरकल्यावर गाडीची वेळ होतांच दारात एक बग्गी येऊन उभी राहिली. तिच्यांत दोघांची सोय होती. चार्ली लँग्डन अन् त्याचा पाहुणा असे दोघे, मागच्या भागांत असलेल्या सीटवर बसले. घोड्यानीं एक जोराचा हिसका देऊन पळायला सुरवात केली. त्यासरशीं आतल्या गादीसकट ते दोघे एक गिरकी घेऊन जोरानं खडबडीत रस्त्यावर आदळले. कुणालाच तशी विशेषशी जखम झाली नाहीं. पण त्यायोगें मार्क ट्वेनच्या डोक्यांत एक कल्पना चमकून गेली. मुक्काम वाढवायला ही संधि चांगली होती औषधं वगैरे घेऊन लँग्डन कुटुंबातली मंडळी जमली तेव्हां तो चटकन् उठला नाहीं. आणखी उपचार करण्यासाठीं आरामखुर्चीत नेऊन बसवायसाठीं इतरांना त्यानं मदत करूं दिली. 'लिव्ही' लँग्डननं विशेष चिंता दर्शविली. दोन आठवडे त्याचा मुक्काम लांबला. निर्मळ सुखाचे ते दोन आठवडे संपवून तो तिथून निघाला तेव्हां 'लिव्ही' लॅग्डनलाच आपली पत्नी करण्याचा त्याचा पक्का निश्चय होऊन चुकला होता.

आपल्या पुस्तकाचीं मुद्रितें तपासण्यासाठीं मार्क ट्वेन तिथून हार्टफर्डला गेला.

पुढें त्याचे अगदीं परम स्नेही बनलेले रेव्ह. जोसेफ एच्. ट्विचेल ह्यांच्याशीं त्यांची पहिली मुलाखत तिथंच झाली. सबंध हिंवाळाभर आनंदानं तिथं राहायची क्लेमेन्सची तयारी होती. चार्लस् डडले वॉर्नर, हॅरिएट बीचर स्टोव प्रभृति लेखकाच्या ओळखी ट्विचेल यांनीं मार्क ट्वेनशीं करून दिल्या. पण व्याख्यानाला गौरवपर निमंत्रणें आली होतीं अन् आतां तो तीं नाकारूं शकत नव्हता. त्यानं आपल्या नव्या व्याख्यानाला 'परदेशांतील सुंदर वस्तूंचा नाश' असं नांव दिलं. त्याच्या आगामी ग्रंथांतलीं तीं प्रकरणं होतीं. आणि सगळीकडेच त्याला चांगलं यश लाभलं. त्याच्या व्याख्यानाच्या वेळीं सभागृहं गच्च भरत असत. त्याची शैली, लांबलचक अन् कंटाळवाणे हेल काढून बोलायची होती. वाक्याच्या अखेरीस लवमात्र थांबून तो तींत अचूक विनोदनिर्मिति करी.

त्याच्या व्याख्यानाचे बहुतेक कार्यक्रम मध्य न्यूयॉर्कमध्यें होते. तिथून एल्मिरा कांहीं फारसं दूर नव्हतं. लॅग्डन कुटुंबियाचं त्याला नेहमींच निमंत्रण असे. अन् तोहि शक्य होईल तेव्हां तिथं जायचा. त्याचं प्रियाराधन मात्र अगदीं विनासायास फलद्रूप होणार नव्हतं. श्री. लँग्डन यांना स्वतःला त्याच्याविषयीं कौतुक वाटत असल तरी आपल्या मुलीचं अन् प्रवासी, व्याख्यात्या ग्रंथकाराचं लग्न सुखाचं होणार नाहीं अशी धास्ती त्यांना वाटत होती. ह्या संबंधांत जेर्व्हिस लँग्डन आणि मार्क ट्वेन याची जी पहिली मुलाखत झाली तिच्यासंबधीं बऱ्याच अर्थहीन कथा सागितल्या जातात. परंतु त्या निराधार आहेत. उभयतांकडून मनःपूर्वक वाटाघाट झाली. अन् अखेरीस सॅम्युएल क्लेमेन्स संपूर्ण निराश जरी झाला नाहीं तरी खूप उंचावरून खालीं कोसळल्यासारखं त्याला वाटलं. प्रथम प्रत्यक्ष वाङ्निश्चय असा झालाच नाहीं. कारण जेर्व्हिस लँग्डन आणि क्लेमेन्स यांच्यांत एवढच ठरलं कीं, प्रथम लँग्डन यानीं आपल्या भावी जांवयाला ओळखणाऱ्या मंडळींशीं पत्रव्यवहार करावा अन् त्याची पूर्वीची वर्तणूक आणि सर्वसाधरण चारित्र्य याविषयीं चौकशी करावी. ह्या पत्राना उत्तरें यायला बराच वेळ लागला. तीं आलीं त्यावेळीं परिणाम जाणून घ्यायला सॅम्युएल क्लेमेन्स तिथंच होता.

क्लेमेन्सन विचारलं, "त्या मंडळींकडून उत्तरं आलीं का?"

"हो, अन् आणखी एकाला मीं तुझ्याविषयीं विचारलं होतं त्याचंहि उत्तर आलंय्."

"तुमच्या बोलण्यावरून तीं माणसं कांहीं या बाबतींत फारशीं उत्सुक दिसत नाहींत."

"असंच कांहीं नाहीं. कांहीं जण आहेत उत्सुक."

"त्यांनीं कोणती विशिष्ट भावना व्यक्त केलीय्?"

"सगळ्यांच्या मतें तूं अत्यंत हुषार, कर्तृत्ववान् असून तुझं भवितव्य उज्ज्वल आहे अन् तूं नवरा या नात्यानं अत्यंत अयोग्य आहेस."

अर्जदाराच्या मुखावर निराशा दिसत होती. "त्यांनीं कांहीं उडवाउडवी केलेली दिसत नाहीं."

थोडा वेळ विचार करून लँग्डन म्हणाले, "आणखी एकाद्या मित्राचं नांव नाहीं का तूं सुचवूं शकणार?"

"ज्याचं शिफारसपत्र उपयुक्त ठरेल असा कांहीं कुणी दिसत नाहीं."

आपला हात पुढं करून जेर्व्हिस लँग्डन म्हणाले, "एक तरी तसा मित्र तुला आहे. माझा विश्वास आहे तुझ्यावर. ह्या सगळ्यांहून मी अधिक चांगलं ओळखतों तुला."

सॅम्युएल लँगहोर्न क्लेमेन्स आणि ऑलिव्हिया लेविस लँग्डन यांच्या वाङ्निश्चयावर दुसऱ्याच दिवशीं—४ फेब्रुवारी १८६९ ला—शिक्कामोर्तब झालं. जेन क्लेमेन्सला तिच्या मुलानं कळवलं, "ती छोटीशीच आहे पण अखिल ख्रिश्चन जगतांत तिच्या बरोबरीचं कुणीहि नसेल."

❧ ❧ ❧

११.

# नवीं पुस्तकें आणि विवाह

मार्च महिन्यांत क्लेमेन्सनं आपला व्याख्यानाचा दौरा आटोपला तेव्हां त्याला आठ हजार डॉलर नफा झाला होता. आतां त्याच्या पुस्तकाचीं दुरुस्त मुद्रितं येऊं लागलीं होतीं. सुस्वभावी लिव्ही लँग्डननं अन् त्यानं मिळून तीं वाचलीं. ती त्याची संपादक बनली, अन् ही भूमिका तिच्याकडे अखेरपर्यंत होती. तिच्या सहवासानें तो अधिकाधिक सुसंस्कृत बनला. मार्क ट्वेनच्या त्यावेळच्या यशाचं बरंचसं श्रेय तिलाच आहे. त्या रमणीय उन्हाळ्यांत त्या दोघांनीं मुद्रितें तपासण्याचं काम संपवलं. त्यांनीं पुढील काळाचे बेत आंखले. तीं खरोखर अतिशय सुखांत होतीं.

जुलैच्या अखेरीस तें भलं मोठं पुस्तक प्रसिद्ध झालं. अन् त्यानं मिळवलेलं यश आश्चर्यचकित करून टाकणारं होतं. एकाएकीं सर्वांच्या जिभेवर मार्क ट्वेनचं नांव नाचूं लागलं अन् प्रत्येकाच्या हातांत त्याचं पुस्तक दिसूं लागलं. पुढील वर्षाचा पहिला दिवस उजाडण्याच्या आंत त्याच्या ह्या ग्रंथाच्या तीस हजार प्रती खपल्या—हा उच्चांक अद्याप मोडला गेलेला नाहीं. इंग्लंडमध्येंहि मोठमोठ्या आवृत्त्या निघाल्या अन् परकीय भाषांतून भाषांतराचें काम सुरू झालें. मार्क ट्वेन पूर्वी प्रसिद्ध नसला, तर आतां तो प्रसिद्ध झाला होता. तरीहि अद्याप कांहीं कारणास्तव तो स्वतःला साहित्यिक म्हणवून घेत नव्हता. तो पत्रकार होता. अन् विकत घेतां येण्याजोगं एकादं पत्र शोधीत होता. श्री लँग्डन यांच्या मदतीनं त्यानं बफेलो येथील 'एक्सप्रेस' पत्रांत लक्ष घातलं. आणि १८६९ च्या अखेरीस तो त्या पत्राच्या सहसंपादक-पदावर सुस्थित झाला. तरीहि मधून मधून तो व्याख्यानें देई. कारण त्याच्या विवाहाचा शुभदिन जवळ येत होता.

२ फेब्रुवारी १८७० रोजीं. सॅम्युएल क्लेमेन्स आणि ऑलिव्हिया लँग्डन विवाहबद्ध झालीं. विवाहाच्या दिवशीं सकाळींच मार्क ट्वेनला त्याच्या

प्रकाशकाकडून तीन महिन्यांत विकल्या गेलेल्या पुस्तकांबद्दल चार हजार डॉलरचा चेक आला. विवाहसमारंभ अगदीं कौटुंबिक स्वरूपाचा होता. ट्विचेल आणि त्यांची पत्नी हार्टफर्डहून आलीं. विवाहसमारंभाच्या वेळीं थॉमस के. बीचर यांना मदत करण्यासाठीं ट्विचेल आले होते. लॅंग्डन यांच्या वैभवशाली दिवाणखान्यांत शंभराहून अधिक पाहुणे कांहीं जमले नव्हते. सॅम्युएल क्लेमेन्स आणि ऑलिव्हिया यांच्या पुढील आयुष्यातील अनेक घटना ह्याच दिवाणखान्यात घडल्या. त्यांच्या जीवनाची व मृत्यूची कथा घडविणाऱ्या प्रसंगमालिकेचा प्रारंभ त्या दिवाणखान्यांत अशा तऱ्हेनें झाला. अखेरीस सायंकाळीं सात वाजतां तीं विवाहबद्ध झालीं.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं वऱ्हाड बफेलोला निघालं. श्री लॅंग्डन यांच्या श्री स्ली नामक एजंटामार्फत क्लेमेन्सन एक शांत अन् साधीसुधी खानावळ मुक्रर केली होती. जेर्व्हिस लॅंग्डन यांचा मात्र मुलीप्रीत्यर्थ निराळाच बेत होता अन् त्याची गंधवार्ताहि क्लेमेन्सला अद्यापपर्यंत लागलेली नव्हती. स्ली यांनीं त्याला लिहिलेल्या पत्रांत म्हटलं होतं, 'एक उत्कृष्ट पण कमी खर्चाची खानावळ मीं मुक्रर केली आहे.' अन् यावर त्याचा पूर्ण विश्वास होता. मंडळी बफेलो इथं पोंचली तेव्हां स्टेशनवर स्ली त्यांची वाटच पाहत होते. सगळीकडे बर्फ पडलं होतं. घसरत्या गाड्या मागविण्यात आल्या होत्या. गाड्या सुरू झाल्यावर थोड्याच वेळात वधूवरांची गाडी मागं पडून बराच वेळ निष्कारण भटकत राहिली. त्यामुळें नवरदेव अस्वस्थ झाला. आपण सर्वांच्या अगोदर पोंचावें आणि पाहुण्यांचें स्वागत करावें अशी त्याची इच्छा होती. सांपडायला इतकी कठिण असलेली खानावळ मुक्रर केल्याबद्दल त्यानं स्लीला दोष दिला. अखेरीस बफेलो शहरांतील सर्वोत्कृष्ट रस्त्यावर वळून त्यांची गाडी जेव्हां एका सुरेख घरासमोर उभी राहिली तेव्हां ती श्रीमंत वस्ती पाहून तो चिंतातुर झाला.

ते पायऱ्या चढत असतांनाच दार उघडलें गेलें अन् पुढें गेलेले मित्र त्यांच्या स्वागतार्थ पुढें आले. त्यांनीं वधूवरांना आंत नेलें. आंतला भाग त्यांना दाखविण्यांत आला. नवीनच नियुक्त अन् सुशोभित केलेल्या सुंदर खोल्यांतून तीं हिंडलीं. नवरदेव आश्चर्यानें थक्क झाला. या सगळ्याचा अर्थ काय तेंच त्याला कळेना. अखेरीस त्याच्या तरुण पत्नीनें त्याच्या हातांत हात घालीत म्हटलें, "यूथ, तुझ्या नाहीं ध्यानांत आलं?" ती नेहमीं त्याला 'यूथ' म्हणे—"नाहीं आलं ध्यानांत? हें सारं आपलं आहे—आपलं. सारं काहीं. बाबांनीं देणगी म्हणून दिलंय् आपल्याला." यावर सॅम्युएल क्लेमेन्स काय

म्हणाला तें निश्चित असं कुणालाच आठवत नाहीं. त्यावेळीं किंवा त्यानंतर थोड्या —वेळानं तो म्हणाला, "'मिस्टर लँग्डन, तुम्ही केव्हांहि बफेलोला आलांत म्हणजे वर्षातनं दोनदां—सरळ इथं येत जा. तुमचं सारं सामानसुमान घेऊन रात्रभर राहत जा इथं, तुम्हांला एकहि सेंट खर्च येणार नाहीं." पुरतीं दोन वर्षेहि मार्क ट्वेन बफेलोला राहिला नाहीं. प्रारंभींच्या काळांत यापेक्षां अधिक सुखाची त्याची अपेक्षाच नव्हती. त्याचं तें सुंदर घर जणुं परिपूर्ण होतं. कचेरींतलं कामहि सोपं होतं अन् तें करतांना त्याला आनंद होत असे. येण्याच्या बाबतींत तो फारसा नियमित नव्हता पण उशिरांपर्यंत बसत असे. औपरोधिक लेख, व्यक्तिचित्रें, अग्रलेख आणि विविध प्रकारची टीका अशाच बऱ्याच 'कॉप्यां'चा मजकूर तो लिहून काढीत असे. त्यांतलं सारंच कांहीं विनोदी नसे. एखाद्या अनिष्ट रूढीवर हल्ला चढविणारं किवा अन्यायाचा धिक्कार करणार विनोदी व्यक्तिचित्र लिहून केव्हांहि त्याला काम थांबवतां येत असे. त्याचं हें लिखाण इतकं दाहक असे कीं, गुन्हेगारांना क्षणभर थांबून विचार करावाच लागे. 'गॅलॅक्सी' या नव्या नियतकालिकाचें 'स्मृतिचित्रें' हें सदर लिहिण्याची कामगिरी पत्करून त्यानें आपल्या उत्पन्नांत बरीच वाढ केली. आतां त्याची परिस्थिति इतकी सुधारली होती कीं, व्याख्यानांचा मध्यस्थ जेम्स रेडपाथ याला लिहिलेल्या पत्रांत त्यानं म्हटलंय्, "प्रिय रेड, इथून पुढं मी आतां कधींच व्याख्यान देणार नाहीं. जीवनाच गणित आतां मी अखेरच्या अपूर्णांकापर्यंत बरोबर मांडलंय्. जगायला साधारण किती खर्च येतो तें मला कळून चुकलंय् अन् तेवढा पैसा व्याख्यानें न देतां मी मिळवूं शकतों. म्हणून मित्रा, माझा नाद आतां सोडून दे."

डेलावेअर अॅव्हेन्यूवरचं तें छोटंसं घर प्रारंभींच्या काळांत खरोखरच सुखधाम होतं. क्लेमेन्स किंवा त्याची पत्नी समाजाची विशेष फिकीर करीत नसत. स्वतःच्या घरांतलं सुखच त्यांना अधिक पसंत होतं. जीवनांतल्या ह्या अत्यंत सुखद काळांतच त्यावर छाया पडूं लागली. 'केव्हांहि बॅग घेऊन या अन् रात्रभर खुशाल राहा' हें जांवयाचं विनोदांतलं निमंत्रण जेर्व्हिस लँग्डन यांनीं कधींच स्वीकारलं नव्हतं. अन् आतां तर वेळ निघून गेली होती. वसंतऋतूंत त्यांची प्रकृति खालावली. सौ. क्लेमेन्सचं बापावर विशेष प्रेम होतं. म्हणून त्याच्याजवळ असावं एवढ्यासाठीं ती एल्मिराला गेली. आजार तीन महिने रेंगाळल्यानंतर अखेर मृत्यु आला. पित्याच्या मृत्यूचा सौ. क्लेमेन्सवर दारुण आघात झाला. अगोदरच धडधाकट नसलेली तिची स्वतःची प्रकृति दुबळी झाली. तिला बरं वाटावं म्हणून भेटायला आलेली बालमैत्रीण विषमज्वरानं आजारी झाली. पुन्हां

चिंता अन् उपचार. अखेरीस क्लेमेन्सच्या घरांतच ती तरुण स्त्री इहलोक सोडून गेली. नोव्हेंबरांत छोटा लॅंग्डन-क्लेमेन्स घरांत खेळूं लागल्यानं थोडसं सुखाचं वारं खेळूं लागलं पण जीवनावरील त्याची नाजुक पकड इतकी अनिश्चित होती कीं, चिंतेचंच ओझं वाढलं.

मन विचल करणाऱ्या इतक्या गोष्टींतून काम करणं क्लेमेन्सला अवघड गेलं. 'गॅलॅक्सी' मधलं 'स्मृतिचित्रें' हें सदर तर लिहायलाच हवं होतं अन् तें आकर्षक आणि वाचनीयहि करणं भाग होतं. कचेरींतल्या कामाकडेहि दुर्लक्ष करून चालण्याजोगं नव्हतं. त्याबरोबरच 'रफिंग इट' ह्या दुसऱ्या पुस्तकाबद्दलचा करार त्यानं ब्लिसशीं केला होता आणि आतां त्याचं काम हातांत घ्यायला हवं होतं. नियतकालिकें आणि वृत्तपत्रें याच्या अखंड मागण्यांनीं तो अगदीं त्रासून गेला होता. हा सारा ताण सहन करणं शक्य नसल्यानं अखेरीस त्यानं 'एक्सप्रेस' मधला आपला भाग तोटा सोसून विकून टाकला अन् 'स्मृतिचित्रें'हि बंद केलीं.

क्लेमेन्स कुटुंब मग एल्मिराला राहायला गेलं. टेकडीवरच्या मळ्यांतलं तें घर सौ. क्लेमेन्सची बहीण मिसेस थिओडोर क्रोन हिचं होतं. तिथून खालची नदी अन् गांव सुरेख दिसे. आतां परत बफेलोला जायचा त्यांचा मानस नव्हता. तिथलं घर त्यांनीं विक्रीस काढलं. मळ्यांतले दिवस जरा बरे गेले. दुबळी मंडळी सशक्त झाली. पुस्तकाचंहि काम चालू होतं पण लिखाणाविषयीं मार्क ट्वेनला समाधान वाटत नव्हतं. त्याचा पहिला संपादक जो गुडमन तो पूर्वेकडे आला असतां एक दिवस एल्मिराला येऊन दाखल झाला तेव्हा मार्क ट्वेन लिखाणाविषयीं अगदीं हताश झाला होता. त्यानं घाईघाईनं गुडमनला बाहेर मळ्यांत नेऊन 'रफिंग इट 'चीं प्रकरणं त्याच्या हातांत देऊन वाचायला सांगितलं.

प्रत्येक पान गुडमन गंभीरपणें, विचारपूर्वक वाचीत होता. थोड्याच वेळांत मार्क ट्वेनला तें असह्य झालं. तो ओरडला, "मला ठाऊक होतं! मला तें ठाऊक होतं कीं, मीं अगदीं घाणेरडं कांहींतरी खरडतोंय्! एवढा वेळ तुम्ही वाचतांहांत पण स्मिताची एकहि छटा दिसली नाहीं तुमच्या चेहऱ्यावर—पण सारा दोष कांहीं माझाच नाहीं. अवतींभवतीं मेलेलीं माणसं अन् आजार पसरलेला असतांना मी विनोदी पुस्तक लिहायचा प्रयत्न करतोंय्. जा! त्याच्यापेक्षां मीच मेलों तर बरं असं वाटतंय्!"

"मार्क!" गुडमन म्हणाले—"मी चिकित्सेनं वाचीत होतों, करमणुकीसाटीं नव्हे. अन् जेवढं कांहीं मीं वाचलंय् तें माझ्या मतें तूं आतांपर्यंत केलेल्या

लिखाणांत सर्वोत्कृष्ट आहे. मला तर तें कमालीचं वेधक वाटलं. तूं एक महान् ग्रंथ लिहीत आहेस."

बस्स. एवढं पुरे होतं. क्लेमेन्सला ठाऊक होतं कीं, गुडमन असल्या गोष्टी गमतीनं कधींच बोलत नाहींत. 'रफिंग इट'चा जनक पार बदलून गेला. कमालीचा उत्साह त्याच्या अंगांत संचारला अन् लिखाण पुढें चालू करायला तो उत्सुक बनला.

मे महिन्यांत क्लेमेन्सनं ब्लिस यांना लिहिलं कीं, "नव्या पुस्तकाच्या हस्तलिखिताचीं बाराशें पानं लिहून तयार आहेत. दररोज तीस ते पासष्ट पानं लिहून काढतोंय्." आतां त्याचा उत्साह शिगेला पोंचला होता. कुटुंबियांची प्रकृति सुधारली होती आणि पुन्हां एकदां भवितव्य उज्ज्वल दिसत होतं. येत्या हंगामांत पुन्हां व्याख्यानं देण्याविषयींहि रेडपाथ त्याचं मन वळवूं शकला. उन्हाळा संपल्यावर क्लेमेन्स कुटुंब कनेक्टिकटमधील हार्टफर्ड इथं राहायला गेलं. मार्क ट्वेनला अनेक कारणांनीं या गांवाचं आकर्षण होतं. त्याचे प्रकाशक तिथले होते. ख्यातनाम लेखकांचा एक गट तिथं वास्तव्य करून होता. आणि रेव्ह. जो ट्विचेलहि तिथंच राहत असत. बफेलोचं घर विकून टाकण्यांत आलं. त्यांतलं सामानसुमान बांधून जहाजानें रवाना करण्यांत आलं. त्या घराचं त्यांनीं पुन्हां कधींच दर्शन घेतलं नाहीं.

त्या हिंवाळ्यांत मार्क ट्वेननं एकसारखीं व्याख्यानं दिलीं. बोस्टन हें व्याख्यानांचं मुख्य ठिकाण, त्याच्या आसपासच्या गांवांतूनच तो बहुधा व्याख्यानं देई. रेडपाथच्या कचेरींत जोश बिलिंग्ज् (हेन्री डब्ल्यू. शॉ) आणि पेट्रोलियम व्ही. नॅस्बी (डेव्हिड आर. लोक) ह्या त्या काळांतल्या अत्यंत ख्यातनाम अशा विनोदी लेखकांची गोष्टींची देवाणघेवाण चाललेली दिसून येई. अगदीं निव्वळ वाङ्मयीन वर्तुळांत विल्यम डीन हॉवेल्स, थॉमस बेली अल्ड्रिच, ब्रेट हार्टे (हा एव्हांना चांगलाच ख्यातनाम झाला होता आणि पूर्वेकडील भागांत येऊन ठेपला होता.) प्रभृति मंडळी असत. हे सारे उत्साही आणि आनंदी असत. दुपारच्या जेवणानंतर ते एकत्र जमत आणि आनंदानें गप्पा मारीत हिंवाळ्यांतल्या सायंकाळपर्यंत गप्पा मारीत बसून राहत असत.

१८७२ च्या फेब्रुवारींत मार्क ट्वेननें आपला व्याख्यानांचा हंगाम समाप्त केला. त्याच महिन्यांत 'रफिंग इट' हें त्याचं नवं पुस्तक छापखान्यांतून आलं. व्याख्यानाच्या व्यासपीठाचा आतां त्याला तिटकारा आला होता. वस्तुतः 'रफिंग इट' हें पुस्तक अत्यंत यशस्वी ठरलं. तीन महिन्यांत चाळीस हजार प्रती

खपल्या आणि आजहि चाळीस वर्षांहून अधिक काळ लोटलेला असून देखील तें एक अत्यंत लोकप्रिय पुस्तक आहे. अदृश्य झालेल्या काळाची, आनंददायक इतिहासाची ती नोंद आहे.

अठराशें बहात्तर हें साल मार्क ट्वेनच्या दृष्टीनें महत्त्वाच्या घटनांनीं भरलेलं होतं. मार्च महिन्यांत त्यांना दुसरं मूल झालं. ह्या मुलीचं नांव त्यांनीं सुसी ठेवलं. तीन महिन्यांनीं पहिला मुलगा लँग्डन मरण पावला. त्या उन्हाळ्यांत क्लेमेन्सनं फारच थोडं लिखाण केलं. कनेक्टिकटमधल्या सेब्रुक ह्या सागरी हवेच्या ठिकाणीं त्यानं आपल्या कुटुंबियांना नेलं. आणि ऑगस्टच्या अखेरीच्या सुमारास इंग्लंडमधील जीवन व रूढि यांविषयींचं पुस्तक लिहिण्यासाठीं माहिती गोळा करण्यासाठीं तो बोटीनं इंग्लंडला रवाना झाला. ह्या पुस्तकाच्या कल्पनेचा थांगपत्ता त्यानं कुणालाहि लागूं दिला नाहीं. इंग्लंडमध्यें कुणालाहि तसा संशय येणं निव्वळ असंभवनीय होतं. तेथील वास्तव्यांत प्रारंभींच्या कांहीं आठवड्यांत पेन्सिलीनं नोंदवहींत केलेल्या टिप्पणीखेरीज त्यानं एक ओळहि लिहिली नाहीं. त्याला इंग्लंडला येतांच तेथील सगळ्या गोष्टींमुळें एवढा आनंद झाला कीं, पुस्तक लिहितांच येईना. सर्वांचं लक्ष त्याच्याकडे वेधलं गेलं. खुद्द अमेरिकेंतहि झाला नव्हता एवढा त्याचा सन्मान येथें झाला. हे लोक आणि त्यांचा हा देश यांच्याविषयीं पुस्तक—विनोदी पुस्तक—लिहिणें त्याला शक्य झालें नाहीं. ते त्याला अतिशय आवडले. नोव्हेंबरच्या अखेरीस तो अमेरिकेला परतला. परत येऊन पुढल्या वर्षी व्याख्यानं देण्याचं आश्वासन त्यानं येतांना इंग्लिश लोकांना दिलं होतं.

♠ ♠ ♠

## १२.

# इंग्लंडमधील यश : नवें घर : आणखी कांहीं पुस्तकें

इंग्लंडमध्यें असतांना लिहिण्याजोगं मार्क ट्वेनला कांहींच आढळलं नाहीं तरी अमेरिकेंत आल्यावर मात्र त्याला मजकुराची मुळींच वाण पडेना. त्या हिंवाळ्यांत चार्लस् डडले वॉर्नर समवेत त्यानं 'दि गिल्डेड एज' लिहिलं. वॉर्नर कुटुंब शेजारींच राहत असे आणि एके दिवशीं रात्रींचं जेवण झाल्यावर दोघां यजमानांनीं त्यांच्या सहधर्मचारिणी वाचीत असलेल्या कादंबऱ्यांवर टीकेची झोड उठविली. बायकांनीं असं सुचवलं कीं लेखकद्वयानं हिच्यापेक्षां सरस कादंबरी लिहून दाखवावी. तें आव्हान स्वीकारण्यांत आलं. क्लेमेन्सच्या मनांत अगोदरच एक कल्पना होती. त्याचा मावसभाऊ जेम्स लॅप्टन ह्याच्या हृद्य, स्वप्नाळू व्यक्ति चित्राभोंवतीं कादंबरी गुंफायचा त्याचा मानस होता. मुळींच विलंब न लावतां तो कामाला लागला अन् त्यानं नव्या कथेचीं पहिलीं तीनशें-नव्वद पानं लिहून काढलीं. मग वॉर्नर पुढें आला, त्यानं तीं पानं वाचून काढलीं; घरीं गेला अन् पुढली गोष्ट लिहून काढली. दोन महिन्यांत कादंबरी पुरी झाली. कल्पनेनें रचलेला भाग वॉर्नरचा अन् व्यक्तिचित्रें मार्क ट्वेननं रेखाटलीं. वॉर्नरन लिहिलेला सारा भाग बहुधा कल्पितच असावा पण मार्क ट्वेनचीं प्रकरणं म्हणजे सारा इतिहासच होता. त्या वर्षीच्या उत्तरार्धांत 'दि गिल्डेड एज' प्रसिद्ध झाली. तिचं स्वागत चांगलं झालं. कादंबरीचा खपहि पुष्कळ झाला. कर्नल सेलर्स ह्या व्यक्तिचित्रानं तत्काळ जागतिक ललित-वाङ्मयांतील थोर व्यक्तिचित्रांत स्थान मिळवलं. अमेरिकन कलाकृतींतील सर्वांत अधिक ख्यातनाम असं बहुधा हेंच व्यक्तिचित्र असावं. "त्यांत लाखों भरलेत" हें त्याचं पालुपद ज्याच्या त्याच्या तोंडीं झालं.

हार्टफर्ड इथं घर बांधायचं क्लेमेन्सनं ठरवलं अन् बांधकाम-तज्ज्ञ आणि गवंडी मुक्रर केले. वसंत ऋतूपर्यंत घराचं काम पुष्कळच आटोपत आलं

होतं. बांधकाम चालू असतांना सुटी घ्यायचं मालकांनीं ठरवलं. पत्नीला इंग्लड दाखवायला क्लेमेन्स उत्सुक होता. तेव्हां छोट्या सुसीला घेऊन—आतां ती एक वर्षांची झाली होती—ती मे महिन्यांत सहा महिन्यासाठीं बोटीनं इंग्लंडला रवाना झाली. थोडा वेळ ती लंडनमध्यें राहिली; मानसन्मानाचा आणि मनोरंजनाचाच काळ होता तो. पहिल्या भेटीच्या वेळीं मार्क ट्वेन सिंह असला तर ह्या खेपेला तो खुद्द राजपुरुषापेक्षां मुळींच कमी नव्हता. राष्ट्रांतील अत्यंत विख्यात व्यक्ति—रॉबर्ट ब्राउनिंग, सर जॉन मिलेस, लॉर्ड हॉफटन, सर चार्लस् डिल्के प्रभृतींनीं त्याचा आदरसत्कार केला. चार्लस रीड आणि विल्की कॉलिन्स यांच्या इच्छा मार्क ट्वेन पुऱ्या करूं शकला नाहीं. वॉर्नरनं ज्याप्रमाणं त्याच्या समवेत लिहिली तशी एक कादंबरी त्याच्यासमवेत लिहिण्याची इच्छा रीडनं व्यक्त केली होती. कमालीच्या भित्रेपणामुळें लेविस कॅरोल भेटायला आलाच नाहीं. पण एकदां रात्रींच्या जेवणाच्या निमित्तानें ते 'अलाइस् इन् वंडरलॅड'च्या ह्या लेखकाला भेटले. "अंकल रेमसचा एक अपवाद वगळल्यास इतका लाजाळू प्रौढ मनुष्य मीं पाहिला नव्हता"—असं नंतर एकदां मार्क ट्वेन म्हणाला होता.

छोटी सुसी अन् तिचे वडील यांना लंडनचं वास्तव्य मानवलं. सौ. क्लेमेन्सची प्रकृति मात्र खालावली. जुलैच्या अखेरीस ती गुपचुप एडिंबर्गला गेली. लंडन-मधील वास्तव्याचा ताण एवढा होता कीं, सौ. क्लेमेन्सला तो सोसवेना, तिची प्रकृति फारच उतरली. एडिंबर्गमध्यें त्याच्या ओळखी नव्हत्या. फक्त 'रॅब अँड हिज फ्रेंड्स'चे लेखक डॉ. जॉन ब्राउन तिथं राहत असल्याचं क्लेमेन्सला आठवलं. २३ रटलँड स्ट्रीटपर्यंत तो चालत गेला अन् त्यानं स्वतःची ओळख करून दिली. डॉ. ब्राउन लगेच बाहेर आले. एडिंबर्गमध्यें येऊन पोंचल्याच्या क्षणापासूनच सौ. क्लेमेन्सला बरं वाटायला लागलं होतं. तो परिचय तिथं संपला नाहीं. एक महिनाभर 'रॅब'चे जनक अन् छोटं क्लेमेन्स-कुटुंब रोज एकत्र असे. रुग्णांना भेटी देतांना अनेकदां ती डॉक्टरांबरोबर जात. स्कॉटलंडमधील प्रत्येकाचं डॉक्टरसाहेबांवर प्रेम होतं. त्यांच्या 'रॅब'च्या कथेनं त्यांना जगभर अनुयायी मिळवून दिले होते. मुलांना ते अतिशय आवडत. छोटी सुसी अन् ते खेळगडी बनले.

लंडनमधील श्रोत्यांपुढें व्याख्यान द्यायचं वचन मार्क ट्वेननं पाळलं. सभागृह चिकार भरलं होतं. क्लेमेन्सची ओळख करून देण्यांत आली नाहीं. तो सायं-काळच्या पोषाखांत व्यवस्थापकाच्या भूमिकेंत आपली निराशा झाल्याचं जाहीर करण्यासाठीं व्यासपीठावर चढला. तो म्हणाला, "श्री. क्लेमेन्स यांनीं एव्हांना

यायला हवं होतं." तो क्षणभर स्तब्ध राहिला. श्रोत्यांत चांगलीच कुजबुज सुरू झाली. त्यानं हात वर उचलला आणि सर्वत्र शांतता पसरली. मग तो म्हणाला, "मार्क ट्वेन मात्र हजर आहे. आणि तो आतां आपल्यापुढें भाषण करील हें जाहीर करण्यास मला आनंद होत आहे." पसंतीच्या आरोळ्यानीं प्रेक्षकांनीं सभागृह डोक्यावर घेतलं. त्या आठवड्यांत अशींच व्याख्यानं त्यानं दिलीं. यशाचं एवढं पुरेपूर माप त्याच्या पदरांत पडलं नव्हतं.

. त्यानं अशींच हिंवाळाभर व्याख्यानं देण्यासाठीं थांबावं म्हणून त्याच्या व्यवस्थापकानं त्याला फार आग्रह केला. अखेरीस कुटुंबियांना अमेरिकेला पोंचवून एक महिन्यांत परत येतों असं क्लेमेन्सनं त्याला कबूल केलं. हॅनॉव्हर स्क्वेअरमधील भव्य सभागृहांत त्यानं दोन महिने निश्चिततेत व्याख्यानं दिली. 'रफिंग इट' मधलाच कथाभाग त्यानं ऐकवला. अगदीं शेवटीं श्रोत्यांची संख्या किंचित् रोडावूं लागली. यशस्वी व्याख्यानांचा एवढा उच्चांक बहुधा कुणीं गांठलेला आढळत नाहीं.

१८७४ च्या जानेवारीच्या अखेरीस तो अमेरिकेला परतला. हॉवेल्स अन् अल्ड्रि चब्रोस्टनहून त्याला भेटायला आले—तो किती मोठा माणूस झाला होता तें सांगायला, गप्पा मारायला, अवनीतलावरील आणि अंतराळातील कोणत्याहि गोष्टीविषयीं बोलायला ते आले होते. अर्थातच ट्विचेल आणि वॉर्नर हेहि आले. काळवेळ कुणाच्याच खिजगणतींत नसे. कुणालाच कसलीहि घाई नसे अन् कुणालाहि कसलीहि यत्किंचित् देखील काळजी नसे.

एल्मिरा येथील मळ्यांत त्या उन्हाळ्यांत मार्क ट्वेननं 'दि ॲडव्हेंचर्स ऑफ टॉम सॉयर' हें पुस्तक लिहायला घेतलं. टेकडीवर त्याच्यासाठीं श्रीमती क्रेन यांनीं बांधलेल्या छोट्या अभ्यासिकेच्या ऐषआरामी थंड परिसरांत त्यानं आपल्या तारुण्याची कथा गुंफायला प्रारंभ केला. त्या उन्हाळ्यांत तिथं त्यानं संथपणें तें काम चालू ठेवलं. सकाळीं न्याहारी झाल्यावर तो जो कामाला लागे तो थेट सायंकाळच्या जेवणाच्या वेळेपर्यंत—म्हणजे जवळ जवळ पांचपर्यंत, कारण दुपारचं जेवण करायची त्याची प्रथा नव्हती. त्याच्या अभ्यासिकेजवळ जायची इतर कुटुंबियांची प्राज्ञा नव्हती. त्याच्याकडे तांतडीचं काम असल्यास भोंगा वाजविण्यांत येई. काम संपलं कीं, तो चिरूट पेटवी आणि संथपणें दगडी पायऱ्या उतरून खालीं येई. कुटुंबांतली मंडळी कुठं जमली आहेत तें पाहून, दिवसभरचं लिखाण त्यांना वाचून दाखवी.

पण ती कथा अर्धीअधिक लिहून झाल्यावर टॉम आणि हकविषयींची त्याची

स्फूर्ति ओसरली. अथवा त्याऐवजीं नवं औत्सुक्य निर्माण झालं. एक दिवस एक बातमी येऊन थडकली. सॅन फ्रॅन्सिस्कोमधल्या एका लेखकानं परवानगी न घेतांच 'दि गिल्डेड एज'वरून नाटक रचलं होतं. कर्नल सेलर्स ह्या व्यक्तिचित्राचा नाटकांत उपयोग करून घ्यायचा मार्क ट्वेनचा स्वतःचाच मानस होता, त्याप्रमाणें त्यानं नाटकाचे हक्क राखून ठेवले होते. कॅलिफोर्नियांतील प्रयोग त्यानं तत्काळ थांबवला. मग त्या नाटककाराला मित्रत्वाच्या भावनेनं एक पत्र पाठवलं. अन् लौकरच त्याचं नाटक विकत घेऊन त्यानं पुनर्लेखनास प्रारंभ केला. त्याच्या नाटकाला अमाप यश लाभलं. पुस्तकांतल्या इतकंच रंगभूमीवरहि कर्नल सेलर्सचं व्यक्तिचित्र कमालीचं लोकप्रिय झालं, आणि किफायतशीरदेखील.

शरद् ऋतूंत हार्टफर्डमधील नवं घर तयार झालं. ते एक रमणीय ठिकाण होतं. हिरवींगार झाडं आणि गवत यानीं भरलेली ती आच्छादित हिरवी उतरण पलीकडच्या संथ झऱ्याकडे उतरत गेलेली होती. त्या घरात अनेक दालनं आणि सज्जे होते. पाठीमागच्या बाजूच्या लांबलचक व्हराड्यांतून ती आच्छादित उतरण दिसत असे. मार्क ट्वेनकडे वारंवार येणारे पाहुणे त्याच्या ह्या घराच्या सौंदर्याचं वर्णन करण्याचा प्रयत्न करीत असत. सौंदर्य घरांत नव्हतं, घर सुसज्ज करणाऱ्या अद्ययावत् वस्तूंत नव्हतं—ह्या गोष्टी तर सुंदर होत्याच पण घरांत वावरणाऱ्या व्यक्तींच जीवन सुंदर होतं. त्यांचं दैनंदिन जीवन अन् नकळतच त्यांनीं आपल्या सभोंवतीं निर्माण केलेलं वातावरण सुंदर होतं. घरात सौजन्य आणि शांतता परिपूर्ण भरलेली होती. त्याचं श्रेय प्रामुख्यानं सौ. क्लेमेन्सला होतं. विवाहाच्या वेळेसारखी ती काहीं आता बुजरी, अननुभवी राहिलेली नव्हती. अमेरिकेच्या वाङ्मयीन क्षेत्रांतील सर्वश्रेष्ठ व्यक्तीला भेटायला जगांतील थोर व्यक्ति येत तेव्हां ती त्याच्या शेजारची जागा अशा काहीं डौलानं भूषवी कीं, ती सारी थोर मंडळी पुन्हां अधिक भक्तिभावानं त्याच्या अर्धांगीविषयींचा आदर व्यक्त करण्यासाठीं परत येत असत.

क्लेमेन्स यांच्या घरीं सदैव पाहुणे असत. वाचनालयाच्या दर्शनी भिंतीवर लिहिलेलं होतं :—"वारंवार भेट देणारे मित्र हेच घराचे अलंकार होत." क्लेमेन्स यांच्या घराला ह्या अलंकारांची वाण कधींच पडली नाहीं. अमेरिकेला भेट देऊन हार्टफर्डला न येणारा अन् मार्क ट्वेनला न भेटणारा एकहि ख्यातनाम माणूस आढळत नसे. हे लोक कांहीं येऊन लगेच जात नसत, साधारणतः त्यांचा मुक्काम काहीं दिवस तिथं असे. त्याचा लगतचा शेजारी जॉर्ज वॉर्नर एकदां म्हणाला, "जिथं सायंकाळीं गप्पा मारण्याखेरीज कोणालाच कांहीं उद्योग

नसे आणि जिथ पाहुण्यांचं सदैव स्वागत होई असं क्लेमेन्स यांच्याखेरीज दुसरं घर माझ्या पाहण्यांत आलेलं नाही." जवळच वास्तव्य असलेल्या मित्रांबद्दल सांगायचं तर ते वाटेल तेव्हा येत अन् जात. बहुधा येताना दार वाजवणं किंवा जाताना निरोप घेणं हे उपचारहि ते पाळीत नसत. अशा मंडळींत होतीं दोन वॉर्नर कुटुंबं; डॉ. आणि सौ. हॅरिएट बीचर स्टोव हेहि शेजारींच राहत असत; ट्विचेल ह्या धर्मोपदेशकाचं घरहि फारसं दूर नव्हतं. ही सारींजणं एका मोठ्या कुटुंबातल्यासारखीं होतीं, अन् मार्क ट्वेनचं घर ही या सर्वांची एकत्र जमण्याची मध्यवर्ती अशी जागा होती.

रेव्ह. जोसेफ एच्. ट्विचेल आणि मार्क ट्वेन अनेकदा मिळून लांब फिरायला जात. अन् एकदां तर त्यानीं हार्टफर्ड ते बोस्टन हे शंभर मैल अंतर चालून जायचं ठरवलं. नोव्हेंबर महिन्यातल्या एके दिवशी रमणीय प्रातःकाळीं त्यानीं चालायला सुरुवात केली आणि त्याच दिवशी सायंकाळपर्यंत २८ मैलाची मजल मारून ते वेस्टफर्डला पोचले. पण एव्हाना ते लंगडूं लागले होते, पाय चांगलेच ठणकत होते. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ते खुरडत खुरडत कसेबसे सहाएक मैल गेले असतील. मग मात्र क्लेमेन्सन रेडपाथला तार केली —"पाचाहून कमी दिवसात आम्हीं पस्तीस मैलाची मजल मारलेली आहे. यावरून ही गोष्ट सहजसाध्य आहे हें स्पष्ट आहे. उरलेला प्रवास रेल्वेनें पुरा करीत आहोत. तुम्हीं काही पैज वगैरे मारलेली नाहीं ना?"

नंतर एकदोन दिवसानीं हे पादचारी रेल्वेनें हार्टफर्डला परतले. नंतर एकदा अशाच पण कमी अंतराच्या पदयात्रेला ट्विचेल आणि क्लेमेन्सला निघाले असताना क्लेमेन्सला मिसिसिपीवर पुस्तक लिहिण्याची कल्पना सुचली. 'अटलांटिक'च्या जानेवारीच्या अंकासाठी काहींतरी लिहा असं हॉवेल सारखं सांगत होते पण मार्क ट्वेनची प्रतिभा आटली होती. अखेरीस त्यानं कळवून टाकलं, "माझं डोकं काहीं चालत नाही." त्याच दिवशी त्यानं घाईघाईनं त्यांना कळवलं, "जानेवारीच्या अंकासाठीं मी लिहूं शकणार नाहीं हें माझं विधान मी माग घेतों. कारण ट्विचेल याच्या समवेत मी आज लांब फिरायला गेलों होतो. आणि त्यांना मिसिसिपी नदींतल्या आगबोटींतल्या वैभवशाली जीवनाविषयीं मी सांगत होतों. 'ताडेलाच्या खोलीतून' मीं पाहिलेल्या भव्य, विशाल जीवनाचं वर्णन मी करीत होतों. तीन महिने, सहा किंवा नऊ किंवा चार महिने पुरेल एवढी लेखमाला चालेल का, कळवा." ही कल्पना पसंत असल्याचं हॉवेलनीं ताबडतोब कळवलं. त्याच्या नदीच्या वर्णनानं भरलेल्या पहिल्या चटकदार प्रकरणांचा

पहिला हप्ता क्लेमेन्सनं तत्काळ पाठवून दिला. त्याच्या सर्वोत्कृष्ट लिखाणांत हीं प्रकरणं मोडतात. पहिला हप्ता प्रसिद्ध झाल्यावर जॉन हे यांनीं कळवलं, "अगदीं उत्कृष्ट उतरलं आहे. कमी नाहीं, जास्त नाहीं. तुम्हांला हें कसं काय साधतं कळत नाहीं." 'ओल्ड टाइम्स' हें प्रकरण 'अटलांटिक'च्या सात अंकांतून प्रसिद्ध झालं. 'लाइफ ऑन दि मिसिसिपी' ह्या ग्रंथाचीं पहिलीं कांहीं प्रकरणं म्हणजेच तें एक प्रकरण होय. त्या पुस्तकांतला उरलेला भाग पुढें सात वर्षांनंतर जोडण्यांत आला.

वाङ्मयीन दृष्टया मार्क ट्वेनच्या जीवनांतले ते अत्यंत कार्यबाहुल्याचे दिवस होते. नदीविषयींचीं प्रकरणं लिहिताना त्याचं मन भूतकाळांत रमलं. तीं प्रकरणं हातावेगळीं करतांच त्यानं टॉम आणि हकची मागं पडलेली कथा हातीं घेतली आणि कमालीच्या उत्साहानं ती पूर्ण केली. प्रकाशनाला मात्र क्लेमेन्सनं विलंब लावला. त्यानं रेखाटलेल्या व्यक्तिचित्रांचा एक संग्रह तूर्त प्रसिद्ध होत होता. 'स्केचेस् न्यू अँड ओल्ड' हा संग्रह चांगला खपला. पण त्यानंतर सुमारें वर्षभरानें—१८७६ च्या डिसेंबरांत प्रसिद्ध झालेल्या 'दि ॲडव्हेंचर्स ऑफ् टॉम सॉयर' ह्या पुस्तकाइतका तो खपला नाहीं. बालपणाविषयीं अमेरिकेंत उपलब्ध असलेल्या कथांत त्या पुस्तकानं प्रसिद्धीच्या पहिल्या दिवसापासूनच अग्रस्थान पटकावलं. अन् आजहि हक् फिन् खेरीज त्या मानाच्या जागेवर दुसरी कोणतीहि कथा हक्क सांगूं शकत नाहीं.

आतां मार्क ट्वेनला अनेकजण अमेरिकन ग्रंथकारांत अग्रगण्य मानूं लागले होते. खरोखरच सर्वदूर कीर्ति पसरलेला असा तोच एकटा होता. केवळ 'मार्क ट्वेन' एवढा पत्ता असलेलीं पत्रें त्याला पोंचत असत. 'मार्क ट्वेन, पृथ्वी' अशीं पत्रें योग्य वेळीं हार्टफर्डला येत. 'मार्क ट्वेन. पत्ता परमेश्वराला ठाऊक—' अशा पत्त्याचीं पत्रेंहि सत्वर येत. उत्तरांत मार्क ट्वेन लिही, 'पत्ता परमेश्वराला खरंच ठाऊक होता.' नंतरच्या पत्रावर 'पत्ता सैतानाला ठाऊक' असं लिहिलेलं होतं. तेंहि पोंचलं. मार्क ट्वेननं उत्तरांत लिहिलं, "सैतानालाहि पत्ता ठाऊक होताच!"

मार्क ट्वेननं आपलं बरंचसं लिखाण त्या मळ्यांतच केलं. दरसाल उन्हाळ्यांत तें कुटुंब—आतां त्यांत दोन छोट्या मुली होत्या, सुसी आणि क्लारा—त्या रमणीय स्थळीं जाई. खूप वर्षांपूर्वी जॉन क्वार्ल्सचा मळा जसा त्यांच्या पित्याला आनंददायक वाटे तसाच हा मळा या मुलींना वाटे. हिंवाळ्याचे दिवस वाङ्मय-निर्मितीस योग्य नव्हते. सामाजिक समारंभहि फार असत. तरीहि एका

हिंवाळ्यांत—१८७६ च्या—मार्क ट्वेननं ब्रेट हार्टेसमवेत एक नाटक लिहिलं. हें लिखाण चालू होतं तेव्हां ब्रेट हार्टे हार्टफर्डला येऊन क्लेमेन्स-कुटुंबांतच राहिला होता. 'आह सिन' नांवाचं तें चिनी नाटक होतं. तें लिहीत असतांना दोघेहि खदखदून हसत असत. लिखाण संपल्यावर मात्र लोकांच्या दृष्टीनं तें फारसं यशस्वी ठरलं नाही.

भव्य मेजवान्या, बोस्टन आणि न्यूयॉर्कच्या सफरी, नव्या घरीं येणारे पाहुणे ह्यांतच मार्क ट्वेनचे हिंवाळ्यांतले सारे दिवस संपून जात. फावला वेळ तो मुलांत घालवी किंवा बिलियर्ड खेळे. बिलियर्डचा खेळ त्याला मनस्वी आवडे. दिवस किवा रात्रीं कोणत्याहि वेळेला घराच्या अगदीं वरच्या खोलीत तो एकटा किंवा त्यानं त्या गुहेंत ओढून नेलेल्या कुणाहि पाहुण्यासमवेत काठीनं चेंडू ढकलतांना दिसणं अशक्य नव्हतं. दर शुक्रवारीं हार्टफर्डमधले बिलियर्ड-प्रेमी तिथं जमत अन् खेळत असत, एकमेकांना गोष्टी सांगत अन् ती खोली निळसर होईपर्यंत धूम्रपान करीत. क्लेमेन्सला ह्या खेळाचा कधींहि कंटाळा येत नसे. शेवटच्या भिडू अगदीं थकून गेल्यामुळें मटकन् खालीं बसे तरीहि हा आपला नंतर एकटाच चेंडू फटकावीत बसे.

♠ ♠ ♠

१३.

# परदेशची पदयात्रा : ‘ राजपुत्र आणि कंगाल ’

आतां ‘ दि इनोसन्ट्स ॲब्रॉड ’ हें पुस्तक प्रसिद्ध होऊन दहा वर्षे होऊन गेलीं होतीं आणि मार्क ट्वेननं आणखी एक प्रवासवर्णनात्मक पुस्तक लिहावं अशी सर्वांची मागणी होती. युरोपचा पायीं प्रवास केल्यास आपल्याला हवी तशी सामग्री मिळूं शकेल असं क्लेमेन्सला वाटलं. आपले परममित्र रेव्ह. जो ट्विचेल यांना त्यानं ही कल्पना सांगितली आणि आपला पाहुणा या नात्यानं ह्या पदयात्रेंत सामील होण्याचं निमंत्रण त्यांना दिलं. वसंतऋतूंत कुटुंबियांना जर्मनींत न्यावं अन् ट्विचेल यांनीं पाठीमागून त्यांना येऊन मिळावं, मग उन्हाळ्यांत ह्या दोघानीं ‘ ब्लॅक फॉरेस्ट ’ व स्वित्झर्लंडमधून पदयात्रा करावी, अशी त्याची योजना होती. दरम्यान, क्लेमेन्स कुटुंबांतल्या मंडळींनीं जर्मन भाषा शिकायला प्रारंभ करावा, असंहि त्याचं मत होतं.

एप्रिल १८७८ मध्यें तें छोटं कुटुंब बोटीनं निघालं. अन् थोड्याच आठवड्यांच्या अवधीनंतर हायडेलबर्गच्या टेकडीवरील इलॅास हॉटेलांत स्थायिक झालं. खालीं सुंदर प्राचीन किल्ला, प्राचीन शहर, धुक्यानं भरलेल्या दरींतून नागमोडी वळणं घेत जाणारी नेकर नदी असं—जर्मनींत सर्वत्र दिसतं असंच—सुंदर दृश्य दिसे. हॉटेलपासून जवळच क्लेमेन्सला लिखाणासाठीं एक खोलीहि मिळाली. ट्विचेल यांना ऑगस्टमध्यें बोलावलं होतं. त्याप्रमाणें ते १ ऑगस्टला येऊन दाखल झाले. बाडेन-बाडेन येथें क्लेमेन्सनं त्यांची भेट घेतली. आणि ताबडतोब त्यांनीं आपल्या पदयात्रेला प्रारंभ केला. ‘ ब्लॅक फॉरेस्ट ’मधून ते मनास येईल तसा पायीं प्रवास करीत आनंदानं कालक्रमणा करीत चालले होते. ते सदैव चालत नसत. कधीं कधीं ते घोडागाडीनें, गाढवाच्या गाडीनें किंवा रेल्वेनेंहि जात; जें वाहन त्यांना चटकन् उपलब्ध होई तें ते पकडीत. ते घाई करीत नसत. रमतगमत, गप्पा मारीत, फुलें गोळा करीत किंवा रस्त्यावर भेटणाऱ्या मनोवेधक

पोषाख करणाऱ्या 'ब्लॅक फॉरेस्ट'मधल्या शेतकऱ्यांशीं बातचीत करीत पुढें जात. यथाकाळ ते स्वित्झर्लंडच्या हद्दींत येऊन ठेपले अन् आल्प्स पर्वत पादाक्रांत करण्याच्या तयारीला ते लागले. आल्प्सचीं शिखरें त्यांनीं सारींच कांहीं पायीं गांठलीं नाहींत. 'रिजि'वर ते पायीं गेले पण तदनंतर मार्क ट्वेन चांगल्या तऱ्हेनें चालण्याच्या परिस्थितींत नव्हता. नंतर मात्र 'जेमी खिंड' त्यांनीं पादाक्रांत केली.

हे मित्र दिवसभर एकमेकांबरोबर चालत असत. जेव्हां ते चालत नसत तेव्हां मिळेल तें सोयीस्कर वाहन भाड्यानं घेत. त्यांचं प्रवासाचं साधन कोणतंहि असलं तरी त्या रमणीय परिसरांतील त्यांच्या मित्रत्वाचा आनंद सारखाच होता. ट्विचेल यांनीं घरीं पाठवलेल्या पत्रांतून केलेल्या वर्णनावरून आपल्याला त्या काळांतील मार्क ट्वेनचें सुरेख शब्दचित्र पाहावयास मिळतें :—"आज मार्क फुलांमध्यें कमालीचा रंगला. सरपटत जाऊन त्यानं विविध प्रकारचीं फुलं गोळा केलीं. त्यांच्यायोगें त्याला अगदीं ब्रह्मानंद झाल्यासारखा दिसला. अशा सुंदर, सृष्टिसौंदर्यानं नटलेल्या परिसरांत मार्कबरोबर चालण्यांत विशेष मौज आहे: कारण तो त्या सृष्टिसौंदर्याविषयीं इतकं चांगलं बोलत राहतो—जोमदार आणि मनोहारी वर्णन करण्याचं सामर्थ्य त्याच्यापाशीं आहे. त्याचं आजचं बोलणं ऐकायला तूं हवी होतीस. आपण ज्यांच्याविषयीं नुसतं बोलतो त्या वस्तूंना त्यानं आपल्या प्रभावी वाणीनं खरोखर न्याय दिला." दुसऱ्या एका घटनेचा उल्लेख खुद्द मार्क ट्वेननंहि 'ए ट्रॅम्प ॲब्रॉड' मध्यें केलेला आहे :—"मार्क हा एक मजेशीर माणूस आहे. वेगवान् आणि जोमदार ओढ्यासारखी त्याला आनंद देणारी दुसरी गोष्ट नाहीं. असल्या एकाद्या ओढ्याच्या आकर्षणांत तो सांपडला कीं, मग त्याला तेथून घेऊन जाणं जवळ जवळ अशक्यप्रायच असतं. पाण्यांत दगड अन् काठ्या टाकण्यांत त्याला विशेष मौज वाटते असं दिसतं...एक तुकडा धबधब्यापाशीं पोंचून खालच्या फेसांत तो दृष्टीस पडला कीं, तो टणाटण उड्या मारी अन् किंचाळे. अगदीं लहान मुलासारखा वागला तो."

कांहींहि झालं तरी विनोद केलाच पाहिजे या भावनेनं 'ए ट्रॅम्प ॲब्रॉड' मध्यें मार्क ट्वेननं हॅरिस ट्विचेलबरोबरच्या पदयात्रेचं औपरोधिक वर्णन केलेलं आहे. पण आज त्या चित्राची दुसरी बाजू अधिक मोलाची वाटते. सारं कांहीं संपल्यावर ट्विचेल घरीं निघून गेल्यावर मार्कनं त्यांना पाठवलेल्या ह्या पत्रावरून आपल्या ध्यानांत येतं कीं, त्यावेळींहि त्यालादेखील तसंच वाटलं असावं :—

"प्रिय जो, सारं कांहीं खरंच संपलंय्! काल स्टेशनवर मला इतका निरुत्साह

वाटला कीं, आज सकाळीं उठून पाहिल्यावर तुम्ही खरोखरच निघून गेलां आहांत अन् आपली सुखद पदयात्रा आणि गप्पागोष्टी आतां संपल्या आहेत हें भयाण सत्य मान्य करायला मी तयारच नव्हतों. वाः मित्रा! मला केवढी सुखाची वाटली ही सुटी! तुम्ही आल्याबद्दल मी अत्यंत मनःपूर्वक तुमचा ऋणी आहें. गैरवर्तणूक करून मीं तुम्हांला दुखवलं त्या साऱ्या स्मृति मी आतां मनांतनं काढून टाकीत आहें. त्यांची मला क्षमा करण्यात आली आहे असें मानायचा आणि प्रवासांतले अत्यंत सुखद क्षण सांठवून तुमच्या सहवासांत राहण्यालायक मी असें त्यावेळेची स्मृति बाळगण्याचा माझा निश्चय होऊन चुकला आहे. तुमचं साहचर्य माझ्या लेखीं 'लिव्ही'च्या साहचर्याच्या खालोखाल अत्यंत महत्त्वाचं आहे."

लॉसेन येथे क्लेमेन्स कुटुंबियांना येऊन मिळाला. लौकरच तीं इटलींत गेलीं. तिथून परत जर्मनींत तीं म्युनिचला येऊन दाखल झाली. एकीकडे त्याचं नव्या प्रवासवर्णनात्मक पुस्तकाच्या लिखाणाचं काम चालू होतं. वसंतऋतु सुरु होताच तीं पॅरिसला गेलीं अन् तिथून मग लंडनला. ३ सप्टेंबर १८७९ ला अखेरीस तीं न्यूयॉर्कला पोंचली. दीड वर्षाच्या गैरहजेरींत मार्क ट्वेन बदलला असं वृत्तपत्रांचं मत पडलं. एका पत्रानं म्हटलं होतं, "जर्मनीला जातांना दिसे त्यापेक्षां तो आतां अधिक वयस्क दिसतो अन् त्याचे केसहि बरेच करडे झाले आहेत." तीं थेट मळ्यांतल्या घरीं गेलीं अन् क्लेमेन्सनं पुन्हां आपल्या पुस्तकाचं लिखाण पुढं सुरू केल. पण त्याची अपेक्षा होती तेवढं त्याचं लिखाण सुरळित चाललं नाहीं. हार्टफर्डला पोंचल्यावर बऱ्याच दिवसांनीं अखेरीस तें प्रकाशकांच्या हातांत पडलं.

दोन वर्षांपूर्वीच मळ्यांतल्या वास्तव्यांत सुरुवात केलेली कथा, दरम्यान क्लेमेन्सनं हातीं घेतली होती. उन्हाळ्यांत एक दिवस करमणुकीखातर कांहींतरी वाचीत असतां चार्लोट एम्. यंग यांचं 'दि प्रिन्स अँड दि पेज' हें पुस्तक त्याच्या हातीं लागलं. आंधळ्या भिकाऱ्याचं सोंग घेणाऱ्या एका राजपुत्राची कथा होती ती. वाचतां वाचतां अगदीं स्वतःच्या अशा निराळ्याच कथेची कल्पना मार्क ट्वेनला सुचली. राजपुत्र आणि एक कंगाल इसम परस्परांच्या भूमिकेंत वावरतात अन् बरींचशीं साहसं केल्यानंतर परस्परांच्या जीवनांतील कसोट्या आणि जबाबदाऱ्या ओळखतात, अशी त्याची कल्पना होती. ही कथा अत्यंत अद्ययावत् वातावरणांत रचायचा प्रथमतः त्याचा मानस होता. पण लंडनमधील गलिच्छ वस्तींत एक राजपुत्र वाट चुकतो ही कल्पना त्यालाच बरी वाटेना. ती सत्य भासेल अशी त्याला मांडतांच येईना. म्हणून त्यानं इतिहासाचा मागोवा घ्यायला सुरुवात

केली अन् तो आठव्या हेन्रीचा मुलगा एडवर्ड ट्यूडर याच्यापर्यंत येऊन ठेपला. त्याला वाटलं हा राजपुत्र बरा आहे. असल्या गोष्टी लिहायला अन् वाचायला मार्क ट्वेनला अतिशय आवडत. पहिल्या उन्हाळ्याच्या अखेरीपर्यंत त्यानं रोमहर्षक साहसांचा बराचसा भाग पुरा केला व नंतर जें घडेल असं वाटलं होतं त्याप्रमाणें त्याची प्रतिभा आटली अन् तें हस्तलिखित बाजूस सारण्यांत आलं.

पण शेवटीं त्रासदायक वाटूं लागलेलं 'ए ट्रॅम्प ॲब्रॉड'चं लिखाण पुरं होतांच तो आनंदित अंतःकरणानं कल्पित कथेच्या ऐषआरामी कामाकडे वळला. आतां ही गोष्ट समजण्याइतपत सुसी आणि क्लारा क्लेमेन्स मोठ्या झाल्या होत्या. प्रकरणं लिहून पुरीं होतांच तो आपल्या घरांतल्याच छोट्या श्रोतृसमुदायाला तीं मोठ्यानं वाचून दाखवी. त्याच्या दृष्टीनं हा श्रोतृसमुदाय अतिशय मोलाचा होता कारण त्याचं औत्सुक्यपूर्ण अवधान अगर दुर्लक्ष हेंच त्याच्या यशाचं खरं मोजमाप होतं.

'दि प्रिन्स ॲंड दि पॉपर' ताबडतोब प्रसिद्ध झालं नाहीं. त्याला अनेक कारणं होतीं. एक म्हणजे 'ए ट्रॅम्प ॲब्रॉड' नुकतंच छापखान्यातनं बाहेर पडलं होतं. अन् अशा वेळीं दुसरं पुस्तक काढलं तर त्याच्या विक्रीवर परिणाम व्हायची भीति होती. 'इनोसन्ट्स'एवढं जरी नाहीं तरी 'ट्रॅम्प'ला यश लाभलं. त्यांतला विनोद अन् वर्णनशैली पहिल्या पुस्तकांतल्या एवढी नावीन्यपूर्ण नव्हती. प्रारंभीं मात्र तें पुस्तक चांगलंच खपलं. पहिल्या वर्षी लेखकाला चाळीस हजार डॉलर मिळाले.

१८८० च्या उन्हाळ्यांत क्लेमेन्स कुटुंबांत तिसऱ्या छोट्या मुलीनं पदार्पण केलं. त्यावेळीं तीं मळ्यांत होतीं. आपले स्नेही ट्विचेल याना क्लेमेन्सनं लिहिलं, "प्रिय जो! जीन क्लेमेन्सच्या बाबतींत लिहायचं झाल्यास, 'मला त्यांत कांहीं विशेष दिसत नाहीं, बेडकासारखा बेडूक तो!' असं जर कुणीं म्हटलं तर आपण अगदीं निरुपयोगी निरीक्षक आहोंत हेंच तो सिद्ध करून देईल...प्रेम-फलकावरील सांठ्याच्या आंकड्यांत झालेला बदल लक्षांत घेण्यासारखा आहे. चार आठवड्यांपूर्वीं आपल्याला आवडणारांच्या यादींत मुलें आईला अग्रहक्क देत असत—तिचं नेहमीं तेंच स्थान असे; पण आतां :—

*जीन*
*आई*
*मोटले* }
*फ्रॉलीन* }
*बाबा*

असा यादींतला क्रम आहे. आईचा क्रम दुसरा आहे. मी चौथ्यावरून पांचव्या क्रमांकावर घसरलों आहें. कांहीं दिवसांपूर्वीं माझ्या अन् मांजरांच्या मध्यें निप् आणि टक् असायचे पण मांजरं मोठीं झाल्यावर माझं प्रयोजन उरलं नाहीं." मळयांतले ते दिवस मोठे सुखाचे होते. त्या उन्हाळयात टेकडीवरच्या त्या घरांत छोट्या नव्या मुलीनं चांगलंच बाळसं धरलं.

'दि प्रिन्स अँड दि पॉपर' हें पुस्तक ब्रॉस्टनच्या ऑसगुड प्रकाशन संस्थेनें प्रसिद्ध केलं. यापूर्वीं मार्क ट्वेननं प्रसिद्ध केलेल्या सर्व पुस्तकांपेक्षां सर्वच बाबतींत हें निराळं होतं. तें पुस्तक खरोखरच विलोभनीय होतं. आंत सुंदर सुंदर रेखाचित्रं होतीं, अन् बांधणी तर चांगलीच थाटामाटाची होती. आंत निर्भेळ कल्पित कथा होती, सुदर काव्यमय कथा—तरीहि विनोद अन् मानवतेची छटा पानापानावर विखुरलेली होतीच. प्रथमतः अभिप्रायलेखकांना ती समग्र कथा समजलीच नाहीं. कुठें तरी कांहीं तरी विनोद असेल अशी त्यांची अपेक्षा होती. पण त्यांत थट्टाविनोद नव्हता. ती एक साधीसुधी कथा होती—खूप दिवसांपूर्वींच स्मृतींत गडप झालेल्या काळाचं तें एक सुंदर चित्र होतं.

प्रसिद्धि आणि समृद्धि यांच्या पूर्णत्वाच्या रोखानें आतां मार्क ट्वेनची वाटचाल होती. लेखनावर त्याला होणारी प्राप्ति मोठी होती; सौ. क्लेमेन्सपाशीं स्वतःची अशी बरीच माया होती; त्यांना कर्ज असं कुणाचंच नव्हतं. तारुण्यांत सौ. क्लेमेन्सनं जसं पाहिलं होतं अन् दाक्षिणात्यांच्या स्वभावधर्मानुसार जसं वागायला तिच्या नवऱ्याला आवडे तशा थाटामाटानं आगतस्वागत करीत ती कालक्रमणा करीत होतीं. क्लेमेन्स-कुटुंबांत पाहुणे सतत असायचे. त्यांची ये-जा इतकी अखंड असे कीं, मार्क ट्वेन म्हणे, घोडागाड्यांचं भाडं वांचविण्यासाठीं मी एक खासगी बस ठेवणार आहें. दुर्दैवानें, कांहीं क्षण असे येत कीं, आपलं जीवन समाधानकारक आहे ही गोष्ट तो विसरून जाई आणि तें सुधारण्याचा प्रयत्न करी. कर्नल सेलर्सची कल्पनाशक्ति हा त्याला घराण्यांतील उभयपक्षीयांकडून मिळालेला वारसा असल्यामुळें तो अनेक आर्थिक साहसांना उद्युक्त होई आणि तीं सर्वसाधारणपणें तोट्यांतच पडत.

एकदां एक माणूस वाफ तयार करणारं एक यंत्र घेऊन आला. त्यायोगें ९० टक्के कोळशांत बचत होते हें पाहून मार्क ट्वेननं त्यावेळीं बँकेंत असलेली सारी शिल्लक त्यांत गुंतवली. ती रक्कम त्याला पुन्हां कधींच दिसली नाहीं. वाफ तयार करणाऱ्या यंत्रानंतर वाफेवर चालणारं खोबणीचं चाक आलं. दिसायला साधी अन् एवढीशी वस्तु पण अल्पशा काळांत तिनं त्याच्या जवळचं बत्तीस हजार

डॉलरचं ओझं हल्कं केलं ! त्याची बँकेंतली शिल्लक पुन्हां वाढली तेव्हां सागरी तारायंत्राची नवी पद्धत त्याला कुणींतरी विकत देऊं केली. शोध खरोखरच लाभदायक होता, पण त्यानं त्यांत गुंतवलेले पंचवीस हजार डॉलर मात्र परत येऊं शकले नाहींत. अखेरीस खरोखरच अमाप संपत्तीचा लाभ करून देणारी संधि आली होती. एके दिवशीं अलेक्झांडर ग्रॅहॅम बेल नांवाचा माणूस त्याच्याकडे आला. विजेच्या तारेंतून माणसाचा आवाज वाहून नेणारी यंत्रसामग्री त्यानं देऊं केली. पण ट्वेनला वाटलं, आपण आतां अनुभवानं शहाणे झालों आहोंत. बऱ्याच दिवसानंतर त्यानं लिहिलं :—"मीं नकार दिला. बेभरवशाच्या सौद्यांत यापुढं मला भाग घ्यायची मुळींच इच्छा नाहीं असं मीं सांगून टाकलं... कोणत्याहि किंमतींत मला तें नको म्हणून स्वच्छ नकार दिला. तो (बेल) उत्सुक झाला होता. निदान पांचशें डॉलरची सामग्री मीं विकत घ्यावी असा आग्रह त्यानं धरला. पांचशें डॉलरला मीं मागेन तेवढी सामग्री द्यायची त्यानं तयारी दर्शविली...पण हात पोळलेल्या पोरासारखी माझी अवस्था झाली होती. सारे मोह मीं टाळले. अन् दुसऱ्याच दिवशीं एका मित्राला पांच हजार डॉलर दिले. अवघ्या तीन दिवसांनीं त्या मित्रानं दिवाळं काढलं." हे सारे अनुभव मिळून मार्क ट्वेनचं आर्थिक नुकसान बरंच झालं. अर्थात् पुढें एका प्रकरणांत टाइप-मशीनच्या ज्या घोर आपत्तींत तो सांपडल्याचं आपण जाणून घेणार आहोंत त्या मानानं हें नुकसान म्हणजे कांहींच नव्हतं.

सुदैवानं अशा नुकसानीमुळें मार्क ट्वेन फारसा अस्वस्थ होत नसे. त्याच्या लिखाणांत तर फारच थोडा अडथळा येई. एक दिवस मिसिसिपीसंबंधींचीं प्रकरणं वाचीत असतांना त्याला त्या नदीबद्दल नवीनच उत्सुकता वाटूं लागली. सेंट लुई पासून न्यू ऑर्लीन्सपर्यंत आगबोटींतून प्रवास करायचा अन् आपल्या एकवीस वर्षांच्या गैरहजेरींत झालेल्या फेरबदलांचं इतिवृत्त तयार करायचं त्यानं ठरवलं. सेंट लुईला त्यानं 'गोल्ड डस्ट' बोटीचं तिकीट एका टोपणनांवावर काढलं. पण तत्काळ लोकांनीं त्याला ओळखलं. बोटीच्या तांडेलानं आपल्याला कसं ओळखलं अन् आपण लौकरच त्याचे मित्र कसे झालों तें त्यानं पुस्तकांत नमूद करून ठेवलंय्. ती कल्पना आणखी ताणून तो नियमितपणें घड्याळांतल्या चाराच्या ठोक्याला उठूं लागला. हेतु हा कीं, प्रातःकाळचे देखावे निसटूं नयेत. तो पुन्हां तांडेल बनला—विशींतला तरुण, जीवनांतील समस्यांचे अंदाज बांधणारा अन् तारे व ग्रह यांच्या चालीवर आपल्या भवितव्याचा वेध घेणारा ! ब्रिक्स्बींना त्यानं लिहिलं, "माझ्या आयुष्यांत जी जी भूमिका मजकडे आली

त्यांतील दुसऱ्या कोणत्याहि पेशापेक्षां मला तांडेल होण अधिक आवडेल. 'प्लम पॉइंट' तुम्ही कसा ओलांडतां?"

न्यू ऑर्लीन्सला तो बिक्स्बींना भेटला—दोघांनीं मिळून केलेल्या पहिल्या सफरीनंतर जवळ जवळ पंचवीस वर्षांनंतर. आतां 'सिटी ऑफ बेटन रोज' ह्या उत्कृष्ट आगबोटीवर बिक्स्बी कॅप्टन झाले होते. १८५० चा तो सुरेख कालखंड परतल्यासारखं बिक्स्बींना वाटलं. सेंट लुईपलिकडच्या नदीचं निरीक्षण करायचं मार्क ट्वेननं ठरवलं. जुन्या मित्रांसमवेत कांहीं दिवस घालवतां यावेत म्हणून तो हनिबालला गेला. घरीं धाडलेल्या पत्रांत त्यानं लिहिलं होतं, "दिवस मजेंत चालले आहेत. सारा दिवस भटकत असतों अन् तीस-चाळीस वर्षांपूर्वी ज्या माझ्याबरोबरीच्या मुलं-मुली होत्या त्या आतां शुभ्रकेशधारी म्हाताऱ्यांशीं गप्पा मारीत असतों." सेंट पॉलच्या बोटींत बसून त्यानं नदीचं अवलोकन केलं. हा भाग त्यानं यापूर्वी कधींच पाहिला नव्हता. नोंदवहींत त्यानं केलेल्या नोंदींत म्हटलं आहे :—"आगबोटीच्या प्रवासांतली मौज आतां नष्ट झाली आहे. हनिबालमधले लोक बोटीच्या तांडेलाला आतां देव मानीनासे झाले आहेत." त्या उन्हाळ्यांत मळ्यांतल्या वास्तव्यांत त्यानं 'मिसिसिपी'संबंधींच्या पुस्तकाचं लिखाण सुरू केलं पण त्यावेळीं कांहीं त्यांत फारशी प्रगति झाली नाहीं. पुढील वर्षी (१८८३) तें छापखान्यांतून बाहेर पडलं. ऑसगुड यांनीं तें प्रकाशित केलं. आणि मार्क ट्वेनची भाची (त्याची बहीण पामेला हिची मुलगी) ॲनी हिच्याशीं विवाह केलेल्या चार्लस् एल्. वेब्स्टर यांनीं विक्रीच्या एजन्सीचं काम अंगावर घेतलं. वस्तुतः मार्क ट्वेननं स्वतःच प्रकाशक व्हायची तयारी चालवली होती, आणि ही त्याची सुरुवात होती.

१४.

# प्रकाशक मार्क ट्वेन

चार्ल्स् एल्. वेब्स्टर यांनीं ऑसगुड यांच्या समवेत 'मिसि-सिपी' ह्या पुस्तकाचा व्यवहार केला होता. आतां ते 'चार्ल्स् एल्. वेब्स्टर आणि कंपनी' ह्या नांवानं सुस्थिर झाले होते—'आणि कंपनी' म्हणजे सॅम्युएल एल्. क्लेमेन्स ! क्लेमेन्सनं आणखी पुस्तक लिहून तयार ठेवलं होतं आणि ह्या कंपनीनं अथपासून इतिपर्यंत त्याचा सारा कारभार पाहायचा असं ठरलं होतं. हें नवं पुस्तक म्हणजे सुमारें आठ वर्षांपूर्वीं मळ्यांत एके दिवशीं सुरू केलेली कथा होती. टॉम सॉयर आणि हक् फिन् यांच्या साहसकथेचाच पुढचा भाग. विशेषतः हक् फिन्नं स्वतःच सांगितलेला उत्तरार्ध. पण लेखकाला त्या कथेबद्दल विशेष विश्वास वाटत नव्हता. म्हणून लौकरच त्यानं ती बाजूला ठेवून दिली होती. नंतर पुढें सात-एक वर्षांनीं त्यानं त्या नदींतून प्रवास केला तेव्हां जुन्या काळची त्याची प्रतिभा फिरून जागृत झाली. हक्च्या साहसांची कथा पुन्हां हातीं घेऊन त्यानं ती पुरी केली. वेब्स्टर आणि कंपनी ह्या संस्थेचा जन्म वस्तुतः ही कथा प्रकाशित करण्याच्याच हेतूनें झाला. ह्या कार्यात मार्क ट्वेननं मनःपूर्वक लक्ष घातलं. एक चित्रकार त्यानं निवडला. त्या तरुणाचं नांव होतं ई. डब्ल्यू. केंबल. दाक्षिणात्य व्यक्तिचित्रें रेखांकित करणारा नामवंत चित्रकार म्हणून आज यानं नांव कमावलेलं आहे.

आपण व्यापारी वृत्तीचे आहोंत असं मार्क ट्वेन स्वतःला पटवीत होता. निदान ह्या प्रकरणांत तरी त्यानं एकहि चूक केली नाहीं. 'हक्'चीं पुढचीं कांहीं प्रकरणं 'सेंचरी मॅगझीन' मध्यें क्रमशः प्रसिद्ध झालीं. आणखी असं वाचायला मिळावं म्हणून लोक उत्सुक होते. 'सेंचरीं'तील प्रकरणं संपण्याच्या सुमारास चाळीस हजार लोकांकडून पुस्तकाची आगाऊ किंमत घेऊन ठेवण्यांत आली होती. अशा रीतीनं हक् फिन् यानं स्वतः सांगितलेली कथा मोठ्या थाटामाटांत

प्रकाशित झाली. टॉम सॉयरच्या पुस्तकापेक्षांहि हें श्रेष्ठ असल्याचं मत अनेक प्रौढ वाचकांनीं आणि बहुतेक टीकाकारांनीं व्यक्त केलं. खरं म्हणजे, हकच्या कथेनं लौकरच प्रौढ मंडळींत वादविवाद माजला—त्यांतील मानसशास्त्र आणि नैतिक टप्पे यांविषयीं! वाङ्मयीन दृष्ट्या 'टॉम सॉयर' पेक्षां 'हक् फिन्' निःसंशय श्रेष्ठ दर्जाचा आहे. कथा म्हणून त्या एकमेकींच्या हातांत हात घालून चालतात. दुसरीशिवाय कोणतीच पुरी होऊं शकत नाहीं. अन् जोंपर्यंत खरे मुलगे अन् खऱ्या मुली त्या वाचायला अस्तित्वांत असतील तोपर्यंत या दोन्ही कथा खात्रीनं टिकून राहतील.

प्रकाशक या नात्यानं मार्क ट्वेननं आतांपर्यंत मिळवलेलं यश, आगामी यशाच्या मानानं कांहींच नव्हतं. बरंचसं आर्थिक नुकसान झाल्यानंतर जनरल ग्रॅंट यांनीं स्मृतिचित्रं लिहायला प्रारंभ केल्याचं एके दिवशीं क्लेमेन्सला समजलं. त्यांनीं स्मृतिचित्रं लिहावींत असा आग्रह क्लेमेन्स त्यांना गेलीं कितीतरी वर्षं करीत होता. दुसऱ्या दिवशीं सकाळींच त्यानं जनरलसाहेबांना भेटून अधिक चौकशी केली. असं पुस्तक आगाऊ वर्गणी घेऊन विकावं असं क्लेमेन्सनं सुचवलं. अशा प्रकारच्या पुस्तकाला चांगलं यश लाभेल असं भविष्यहि त्यानं वर्तविलं. जनरल ग्रॅंट यांना तेवढीशी खात्री नव्हती. त्यांना पैशाची अतिशय जरुरी होती. पण अखेरीस मार्क ट्वेन आपलं म्हणणं त्यांना पटवून देऊं शकला. हार्टफर्ड येथील आपल्या जुन्या प्रकाशकांकडे त्यांना पाठवावे असा मार्क ट्वेनचा पहिला विचार होता. अखेरीस तें पुस्तक त्यानं स्वतःच प्रसिद्ध करायचं ठरवलं. एकूण मिळकतीचा सत्तर टक्के भाग त्यानं ग्रॅंट यांना देऊं केला आणि आपल्या स्वतःच्या हिश्श्यांतून कचेरीचा खर्च भागवायचं त्यानं ठरवलं.

अर्थात् अशा करारांत पुस्तकाची प्रचंड विक्री झाली नाहीं तर प्रकाशकाचा कांहींच लाभ नसतो. ही गोष्ट ध्यानांत येऊन जनरल ग्रॅंट यांनीं प्रथम नकारच दिला. पण मार्क ट्वेननें पुनःपुनः त्यांच्याकडे जाऊन त्यांना पटवून दिलं कीं, विक्री अफाट होईल याची शाश्वती असल्यामुळेंच केवळ धंदा म्हणून हा करार करणं इष्ट आहे. अशा रीतीनं चार्लस् एल्. वेब्स्टर आणि कंपनीनं ग्रॅंट यांचं पुस्तक घेतलं; शारीरिक व आर्थिक दृष्ट्या दुर्बळ झालेल्या त्या वयोवृद्ध सैनिकाला शांत मनानं आपलं काम पुरं करतां यावं म्हणून सर्व साधनं मुक्त हस्तानं उपलब्ध करून देण्यांत आलीं. हळूहळू त्यांनींहि त्याच कामाचा पाठपुरावा केला. प्रथम ते आपल्या हातानं लिहीत, नंतर लघुलिपी-लेखकाला ते मजकूर सांगत. त्यांना कॅन्सर झाला होता आणि कॅन्सरनं त्यांच्या प्रकृतीचा सत्यनाश चालवला

होता. पण 'या आघाडीवरहि ते शौर्यानं लढले' अन् अखेरीस त्यांना मोठ्यांदा बोलणं अशक्य झालं तेव्हां त्यांनीं स्मृतिचित्रांचीं अखेरचीं पानं स्वतःच्या हातानं लिहून काढली.

मार्क ट्वेन बराच वेळ त्यांच्या सहवासात असे. त्यांना गोष्टी सांगून आणि पुस्तकाच्या आगाऊ विक्रीच्या बातम्या देऊन उत्साहित करी. लेखनसमाप्ती-पूर्वी कांहीं आठवडे जनरल ग्रँट यांनीं विचारलं, "या पुस्तकांतून माझ्या कुटुंबाला किती रक्कम मिळेल याचा कांहीं अंदाज येईल का?" क्लेमेन्सनं तत्काळ उत्तर दिलं, "एक लाखाहून अधिक प्रती अगोदरच विकल्या गेल्या आहेत. तुमच्या वांट्याला निदान दीड लक्ष डॉलर्स तरी येतीलच." या उत्तरानं ग्रँट यांना अतिशय समाधान झालं.

ग्रँट यांच्या स्मृतिचित्रांचा प्रचार सुरू झाल्याबरोबर मार्क ट्वेननं अंदाजानं एक मसुदा तयार केला होता. त्याचं भविष्य असं होतं कीं, ह्या पुस्तकाच्या तीन लक्ष प्रती खपतील आणि जनरल ग्रँट यांना आपण रॉयल्टी म्हणून ४ लक्ष २० हजार डॉलर्स देऊं शकूं. त्याचं हें भाकीत अपेक्षेबाहेर खरं ठरलं. श्रीमती ग्रँट यांना पहिला चेक देण्यांत आला तोच दोन लक्ष डॉलर्सचा होता. नंतर देण्यांत आलेल्या रकमा जमेस धरतां रॉयल्टीची एकूण रक्कम ४ लक्ष ५० हजार डॉलरपर्यंत गेली. एकदां का होईना, मार्क ट्वेनचा धंद्याबाबतचा दृष्टिकोण अचूक ठरला. त्याच्या स्वतःच्या वांट्यालाहि बरीच मोठी रक्कम आली. कारण वेब्स्टर आणि कंपनीला एक लाख डॉलरहून अधिक फायदा झाला.

कांहीं काळपर्यंत असं वाटत होतं कीं, मार्क ट्वेननं जणुं कांहीं धंद्यासाठीं लिखाण सोडून दिलंय्. ग्रँट यांच्या पुस्तकाला लाभलेल्या यशामुळें त्याच प्रकारच्या योजना त्याच्या डोक्यांत घर करून होत्या. जनरल मॅक्क्लेलान आणि जनरल शेरिडन यांच्या स्मृतिचित्रांचे करार झाले होते व आणखी एक योजना साकार होऊं लागली होती. वयोवृद्ध पोप तेरावा लिओ यानें आपलीं स्मृतिचित्रें तयार करण्यास अनुमति दिली होती आणि त्याच्याच आशीर्वादानें हार्टफर्ड येथील वेब्स्टर आणि कंपनी-तर्फे तीं प्रसिद्ध होणार होतीं. कर्नल सेलर्सलाहि जेवढी आंकडेमोड करतां आली नसती तेवढी त्याच्या जनकानं संभाव्य नफ्याचा हिशोब करतांना केली. 'पोपच्या पुस्तकाची प्रत प्रत्येक कॅथालिक माणसापाशीं हवीच आणि एकट्या अमेरिकेंतच लक्षावधि कॅथलिक होते. पोपशीं समक्ष वाटाघाटी करण्यासाठीं वेब्स्टर रोमला गेले. त्यांना खासगी भेट मिळाली. मार्क ट्वेनची प्रकाशन संस्था यशाच्या अत्युच्च लाटेवर आरूढ झाल्यासारखी दिसत होती.

मॅक्क्लेलान आणि शेरिडन यांचीं पुस्तकं प्रसिद्ध झाली अन् यथावकाश 'पोप तेरावा लिओ याचं चरित्र' एकाच वेळीं सहा भाषांतून प्रसिद्ध झालं. प्रचार करणाऱ्या एजंटांनीं खूप मोठ्या विक्रीची आगाऊ हमी दिली होती. नेमकी हीच गोष्ट सुदैवाची ठरली. कारण, सांगितलं तर खरं वाटणार नाहीं पण त्या पुस्तकाला काहीं फारसं यश लाभलं नाहीं. कदाचित् कॅथालिक लोकांना असं वाटलं असावं कीं, अनेक पोप होऊन गेले मग ह्या एकाच पोपच्या चरित्राचें एवढें काय होय. त्या पुस्तकांत नफा झाला पण फार नाहीं. मॅक्क्लेलान आणि शेरिडन यांची पुस्तकंहि अशींच अंशतः यशस्वी झाली. प्रवासवर्णन, कथाकादंबऱ्या, काव्य— अशा सर्वसाधारण प्रकारचीं पुस्तकं वेब्स्टर आणि कंपनी हातीं घेत असे. त्यांतली अनेक किफायतशीर ठरत नसत. प्रचंड यशापासून प्रारंभ झालेल्या त्यांच्या धंद्यांत अखेरीस जगण्यासाठीं लढा द्यावा लागला.

ज्या काळांत वस्तुतः मार्क ट्वेननं वाङ्मयीन यशोगिरीवर असायला हवं होतं त्या काळांत मनःस्वास्थ्य बिघडविणाऱ्या ह्या घटनांचा परिणाम मार्क ट्वेननं होऊं दिला ही दुर्दैवाची गोष्ट होय. धंद्यांतले हितसंबंध आणि काळज्या ह्यांत त्याची जी शक्ति वायां जाई ती अन्यथा ग्रंथरचनेच्या कामीं आली असती, एवढं मात्र खरं. मधून मधून तो एकादा लेख किंवा एकादी कथा नियत-कलिकासाठीं लिही. अन् एका पुस्तकाचंहि लेखन त्यानं सुरू केलं होतं. तें काम मधून मधून चाले. कनेक्टिकटमधला एक यँकी अचानक किंग आर्थरच्या राज-वटींत परत जाऊन पडतो—अशी ती कथा होती. दोन वर्षांच्या अखंड कामाच्या ताणामुळें वेब्स्टर आजारी पडले तेव्हां धंद्याच्या व्यवस्थेचं काम दुसऱ्याच्या हातांत गेलं. एक मोठी प्रकाशन-संस्था म्हणून ती कंपनी अद्यापहि ओळखली जात असली तरी चार्लस् एल्. वेब्स्टर आणि कंपनींतल्या लोकांना मात्र ठाऊक होतं कीं, कंपनीचं भवितव्य फारसं उज्वल नाहीं. शिवाय मार्क ट्वेननं दुसऱ्या एका पेटंटमध्येंहि पैसे गुंतवले होते अन् तिकडून येणारी पैशांची मागणी जबर असे. १८८७ च्या अखेरीस आपली बहीण पामेला हिला लिहिलेल्या पत्रांत त्यानं म्हटलं होतं, "त्या टाइप-सेटर यंत्रासाठीं दरमहा ३००० डॉलर भरावे लागतात....माझ्या अंदाजानुसार तीन-चार महिन्यांत आम्ही यांतनं मोकळे होऊं." ही आशा खोटी ठरली; कारण तीन चार महिन्यांऐवजीं तो काळ किती तरी वर्षेंपर्यंत लांबला.

◆ ◆ ◆

१५.

## अधिक आनंददायक गोष्टी

व्यावसायिक आकाशांत जरी ढग जमूं लागले असले तरी त्यांची छाया मार्क ट्वेनच्या घरावर बहुधा पडूं दिली जात नव्हती. हार्टफर्डमधलं तें सुंदर घर म्हणजे पाहुण्यांचं आणि सुखी बालकांचं स्वागत करणारं आनंदनिधान होतं. प्रथम जॉर्ज वॉर्नर यांच्या घरांत उभारलेला रंगमंच तेथून काढून क्लेमेन्स याच्या घरांतल्या शाळेच्या खोलीत प्रस्थापित करण्यात आला होता. दर शनिवारीं तेथें नाटकें आणि तालमी होत. वारंवार, खालच्या वाचनालयाच्या मोठ्या खोलींत सर्वांसाठीं मोठे प्रयोग होत, त्यावेळीं नाटकांत काम करणाऱ्या मुलांचे आईवडिलांनीं आणि निमंत्रित पाहुण्यांनीं तें वाचनालय भरून जाई. नंतर बऱ्याच वर्षांनीं मार्क ट्वेननें करून ठेवलेल्या नोंदींत म्हटलें आहे, "रात्रीचं जेवण बहुधा कुणातरी शेजाऱ्यासमवेत आम्ही जमलं तसं उरकलं. आठ वाजायला पंधरा मिनिटं कमी असतांनाच हॉलमधल्या शेकोटींतल्या हिकरी-लाकडांच्या ज्वाळा चिमणींतून बाहेर पडूं लागल्या होत्या. अगदीं तळमजल्यापासून सबंध घर गॅसच्या उजेडांत उजळून निघालं होतं. पाहुणे येऊन दाखल होत होते. मनःपूर्वक केलेल्या अभिवादनाच्या गजबजाटांत आमच्या ओळखीचा आणि आपुलकीचा नव्हता असा एकहि आवाज नव्हता. आणि पडदा वर गेला तेव्हां व्यासपीठावरून आम्हीं समोर पाहिलं तों आम्हांला प्रिय नसलेला अन् आमचं स्वागत करण्यास उत्सुक नसलेला असा एकहि चेहरा आम्हांला दिसला नाहीं."

सारींच नाटकं कांहीं मुलं करीत नसत. मार्क ट्वेननं जर्मन भाषेचा आपला अभ्यास चालूच ठेवला होता. त्यांच्या घरीं नियमितपणें वर्ग भरे आणि 'डर, डाय अन् डास'शीं त्यांची कुस्ती चाले. लौकरच त्यानं या वर्गासाठीं 'मायस्टर शॅफ्ट' नांवाचं नाटक लिहिलं. जर्मन आणि इंग्लिश भाषेचं मनोहारी

मिश्रण असलेल्या ह्या नाटकाचे दोन प्रयोग त्यांनीं केले व ते कमालीचे यशस्वी झाले. मार्क ट्वेनखेरीज दुसऱ्या कोणालाच असलं नाटक लिहितां आलं नसतं. ह्या काळांतल्या अनेक सुखद् आणि मनोरंजक आठवणी सांगतां येतील. रॉबर्ट लुई स्टीव्हन्सनची भेट ही अशीच एक आठवण आहे. वॉशिंग्टन चौकांतील एका छोट्या हॉटेलांत स्टीव्हन्सन उतरला होता. तो आणि क्लेमेन्स एका बाकावर उन्हांत बसले अन् किमान एक सबंध दुपारभर ते बोलत होते. 'हक् फिन्' हें स्टीव्हन्सनचं एक अत्यंत आवडतं पुस्तक. एक चित्रकार त्याची प्रतिभा चितारीत असतां त्याला तें पुस्तक मोठ्यांदा वाचून दाखवायचा आपण कसा आग्रह धरला, ही हकीकत एकदा स्टीव्हन्सननं सांगितली. चित्रकारानं प्रथम हरकत घेतली पण मग लौकरच त्या कथेंत तो पूर्णपणें रमला. एकदा स्टीव्हन्सनन पाठवलेल्या पत्रात म्हटलं होतं, "माझे वडील आतां खूप म्हातारे झाले आहेत. (बहुधा त्यांचं मनोरंजन धार्मिक पुस्तकें करतात.) एकदां त्यानीं 'रफिंग इट' वाचायला घेतलं. त्यांनीं एक संध्याकाळ त्या पुस्तकाबरोबर घालवल्याबरोबर ते म्हणाले, 'मला भीति वाटूं लागली आहे. ह्या वयांत माणसानं इतकं हसणं कांहीं सुरक्षितपणाचं नाहीं.'"

१८८८ च्या जूनमध्यें येल कॉलेजनं मार्क ट्वेनला 'मास्टर ऑफ आर्ट्स' ही पदवी बहाल केली. ह्या सन्मानाचा त्याला अभिमान वाटे : कारण अशा प्रकारची मानमान्यता त्याला यापूर्वीं लाभली नव्हती. ही मानमान्यता खात्रीनं उल्लेखनीय होती. कारण लहानपणीं शाळेचा त्याला कसा तिटकारा होता आणि बारावं वर्ष लागण्यापूर्वींच त्यानं शाळेला रामराम कसा ठोकला हें सारं आपल्याला आतां आठवतं. त्यावेळीं कांहीं तो न्यू हॅवनला जाऊं शकला नाहीं पण त्याच वर्षी नंतर त्यानं तेथील विद्यार्थ्यांपुढें एक छानदार भाषण केलं.

अंशतः वाङ्मयीन निष्क्रियतेच्या त्या प्रदीर्घ काळांत मार्क ट्वेनच्या आयुष्यांत महत्त्वाच्या अशा फारशा घटना घडल्या नाहींत. पण अनेक मजेशीर घटना घडल्या. विनोदमूर्ति बिल नाय् आणि जेम्स हिटकोंब रिले यांनीं मिळून एक करमणुकीचा कार्यक्रम सादर करायचं ठरवलं तेव्हां बोस्टन येथील प्रेक्षकांना मार्क ट्वेननं त्यांची ओळख करून दिली. त्यांच्या आणि बोस्टनवासीयांच्या दृष्टीनं ती संस्मरणीय घटना होती. मधून मधून क्लेमेन्स स्वतःहि वाचनपाठ घेत असे पण पैशासाठीं नाहीं. एकदां कर्नल रिचर्ड माल्कम जॉन्स्टन आणि थॉमस नेल्सन पेज यांनीं बाल्टिमूर येथें वाचनपाठ घ्यायचें ठरवलें असतांना पेज यांची पत्नी आजारी पडली. कर्नल जॉन्स्टन यांनीं चार्लस् डडले वॉर्नर यांना पेज

यांच्याऐवजीं येण्याची तार धाडून विनंती केली. वॉर्नेर यांनाहि जाणें शक्य नसल्यानें त्यांनीं ती तार क्लेमेन्सच्या हातांत दिली. त्यानं तत्काळ आपण येत असल्याचं कळवलं. त्यांच्या वाचनपाठाच्या वेळीं सभागृह गच्च भरलं होतं. श्रोते घरोघर परतल्यावर प्राप्तीची मोजदाद घेण्यांत आली. दोघां लेखकांना समसमान रक्कम वांटून देण्यांत आली. तेव्हां आपला वांटा जॉन्स्टन यांचेकडे लोटून क्लेमेन्स म्हणाला, "हाहि वांटा तुमचाच आहे, कर्नल. अलिकडे मी पैशासाठीं वाचनपाठ देत नसतों." कर्नल जॉन्स्टन यांना ती रक्कम मोलाची होती. ते क्लेमेन्सचे आभार मानूं लागले तेव्हां तो म्हणाला, "जाऊं द्या कर्नलसाहेब! मनावर घेऊं नका. तुमच्यासाठीं हें छोटंसं काम केल्यामुळें मला अतिशय आनंद झाला. एकादा दिवस तुम्ही असेच दुसऱ्या कुणाच्या तरी उपयोगी पडा."

१८८९ च्या उन्हाळ्यात एके दिवशीं एल्मिरा येथें एक महत्त्वाची मुलाखत घडून आली. दुपारच्या तळपत्या उन्हांत पूर्व टेकडीच्या बाजूनें मळ्यांतल्या घरापर्यंत एक लहानसर बांध्याचा तरुण चढण चढून आला. त्यानं मार्क ट्वेनची चौकशी केली. तेव्हां खाली गांवांत लॅंग्डन यांच्या घरीं तो असल्याचं सांगण्यांत आलं. तो तरुण तर नुकताच गांवांतनं इकडं वर आला होता, तेव्हां तो थोडा वेळ तिथंच त्या आल्हाददायक व्हरंड्यांत बसला. त्यावेळीं तिथं श्रीमती क्रेन आणि सुसी क्लेमेन्स होत्या. त्यांनीं त्याला पेलाभर थंड दूध दिलं. नंतर तो बोलत होता आणि त्या ऐकत होत्या. त्याचं बोलणं त्यांना अतिशय मनोरंजक आणि आश्चर्यकारक वाटत होतं. जातांना त्यानं दिलेल्या कार्डावर त्याचं नांव होतं. तें त्याना चमत्कारिक वाटलं, जगालाहि त्यावेळीं तें चमत्कारिकच वाटलेलं होतं. तें नांव होतं रुडयार्ड किपलिंग. कार्डावरील पत्त्यांत अलाहाबादहि होतं. सुसीनं तें जपून ठेवलं. कारण तिला भारत म्हणजे पऱ्यांचा देश आहे असं वाटे.

किपलिंगनं एल्मिरा गांवांत जाऊन मार्क ट्वेनला शोधून काढलं. 'अमेरिकन नोट्स' ह्या आपल्या पुस्तकांत त्यानं ह्या भेटीचं वर्णन नोंदून ठेवलं आहे. मार्क ट्वेनला भेटण्यासाठीं आपण जगाचा प्रवास केला असा त्याचा दावा होता. त्या लेखाच्या प्रारंभींच त्यानं म्हटलंय्, "अवनीतलावरील लोक हो, तुम्ही सारे माझ्यापुढं तुच्छ आहांत. तुमच्यापैकीं कुणी कमिशनर असतील, कुणी लेफ्टनंट गव्हर्नर असतील, कुणाला व्हाइसरॉय कमिशन मिळालेलं असेल; कांहीं थोड्या मंडळींना 'मॉल'मध्यें व्हाइसरॉय यांच्या हातांत हात घालून फिरण्याची खास सवलतहि मिळाली असेल, पण आज सुप्रभातीं मी मार्क ट्वेनला भेटलों, त्याच्याशीं हस्तांदोलन केलं; त्याच्या संगतींत एक नाहीं, दोन सिगार ओढल्या,

आणि दोन तासांहून अधिक वेळ त्याच्याशीं गप्पा मारल्या."

बऱ्याच दिवसांनीं क्लेमेन्सनंहि या भेटीचं वर्णन नोंदवलं : "किपलिंग खालीं आला आणि दोन एक तास तो माझ्याबरोबर होता. आमची मुलाखत संपली तेव्हां मीं त्याला जेवढं आश्चर्यचकित करून सोडलं होतं तेवढंच त्यानंहि मला आश्चर्यचकित करून सोडलं होतं...तो गेल्यावर मला श्रीमती लँग्डन यांनीं त्याच्याविषयीं माहिती विचारली. मीं म्हटलं, 'तो मला अगदींच अपरिचित आहे. पण तो एक अत्यंत उल्लेखनीय मनुष्य आहे—दुसरा मी ! आम्हां दोघांना मिळून सारं ज्ञान अवगत झालेलं आहे. जें जाणून घेतां येणं शक्य आहे तें सारं त्यानं जाणलंय्. आणि बाकीचं सारं मला ज्ञात आहे.'...हार्टफर्ड येथील आमच्या वाचनालयांत एके दिवशीं जॉर्ज वॉर्नर हातांत एक छोटंसं पुस्तक घेऊन आले. रुडयार्ड किपलिंगचं नांव मीं पूर्वीं कधीं ऐकलं होतं का, असं त्यांनीं मला विचारलं. मीं म्हटलं, 'नाहीं!'...एकदोन दिवसांनीं लंडन येथील 'वर्ल्ड'-चा एक अंक घेऊन ते आले. त्याच्यांत किपलिंगचं व्यक्तिचित्र होतं. त्यानं अमेरिकेचा प्रवास केलेला आहे ह्या गोष्टीचीहि त्यांत नोंद होती. एल्मिरा येथें तो येऊन गेला असं त्या व्यक्तिचित्रांत म्हटलं होतं. हें विधान—अन् शिवाय मूळचा तो भारतांतला आहे हें वाचल्यावर माझं अन् सुसीचं देखील लक्ष वेधलं गेलं. ती आपल्या खोलीत गेली अन् आरशाच्या चौकटींत ठेवलेलं त्याचं कार्ड तिनं आणलं. आणि आमच्या मळ्यांत येऊन गेलेल्या पाहुण्याची तत्काळ आम्हांला ओळख पटली."

पांच वर्षांत मार्क ट्वेननं एकहि पुस्तक प्रसिद्ध केलं नव्हतं. १८८४ च्या अखेरीस 'हक् फिन' प्रसिद्ध झाल्यापासून नियतकालिकांतून क्वचित् एकादी कथा अगर लेख त्यानं वाचकांना सादर केला असेल तेवढाच. व्यवसायांतील झगडा आणि 'टाइप-सेटर' यंत्राची भानगड यामध्यें त्याची सारी संपत्ति तर गेलीच पण वेळ आणि शक्तीहि खर्चीं पडली. अखेरीस आतां मात्र एक पुस्तक तयार होतं. 'ए कनेक्टिकट यँकी इन् किंग आर्थर्स कोर्ट' हें पुस्तक १८८९ च्या अखेरीस वेब्स्टर आणि कंपनीनं प्रकाशित केलं. ह्या सुरेख पुस्तकांत डॅन बिअर्डनं काढलेलीं अनेक उत्कृष्ट रेखाचित्रं होतीं. हा डौलदार ग्रंथ मात्र शेवटचा असं मार्क ट्वेन खरंच मानीत असे. "हें माझं हंस-गीत आहे; वाङ्मयांतून ही माझी कायमची निवृत्ति आहे" त्यानं हॉवेल्सला कळवलं—त्यावेळीं त्याचं वय अवघं चौपन्न होतं. तसा हा निष्कर्ष काढण्याइतका कांहीं तो म्हातारा झालेला नव्हता.

'यँकी'च्या कथेंतला विनोद अनेकदां विचित्र वाटतो. पण त्यामागें अन्याय्य कायदे, व्यक्तीचा अगर सत्ताधारी वर्गाचा जुलूम, कोणत्याहि प्रकारची दडपणूक, यांचा अत्यंत कडक शब्दांत उदात्त मनानं केलेला निषेध असल्यामुळें मार्क ट्वेन-मधील महान् मानवता दृष्टीस पडते. 'दि प्रिन्स अँड दि पॉपर'मध्यें जसा सिंहासनाचा तो भटक्या वारस निर्दय अन्याय आणि दुःख याच्या सांनिध्यांत आणला जातो, तसाच 'यँकी'तील राजा स्वतःच बंदिवान गुलामांच्या टोळींतला एक बनतो आणि आत्म्याची अवनति झाल्यामुळें कींव व दया प्राप्त करून घेतो. मार्क ट्वेनच्या अगोदरच्या पुस्तकाइतकें चांगलें स्वागत लोकांनीं 'यँकी'चें केलें नाहीं. पण ती कथा इतकी सुरस आहे कीं, आपल्याला ती वाचल्याशिवाय राहण परवडणार नाहीं.

उन्हाळा आला तशीं मार्क ट्वेन आणि त्याच्या कुटुंबियांनीं निर्णय घेऊन टाकला कीं, यापुढें मळ्यांत न जातां उन्हाळ्याप्रीत्यर्थ कॅट्सकिल्स येथें जायचें. लौकरच ऑंटीओरा येथील एका रमणीय वसाहतींतील पर्णकुटींत तीं येऊन दाखल झालीं. 'सेंट निकोलस'च्या त्यावेळच्या संपादिका श्रीमती मेरी मेप्स डॉज् त्या वेळीं तिथं होत्या. शिवाय ब्रॅंडर मॅथ्यूज, लॉरेन्स हटन प्रभृति अनेक इष्टमित्र तिथं होते. एका झोपडींतून दुसऱ्या झोपडींत सारख्या गांठीभेटी चालत, शिवाय भोजनगृह हें मुख्य ठाणें असल्यानें तिथें तर वारंवार मेळावे भरत. आतां अठरा वर्षांची झालेली सुसी क्लेमेन्स ही आकर्षणाचा केंद्रबिंदु असे—बुद्धिमान्, उत्सुक, महत्त्वाकांक्षी, भेदक—फक्त शारीरिक दृष्ट्या कमकुवत होती ती. तो उन्हाळा अतिशय सुखांत गेला. अगदीं शेवटीं मात्र एक दुर्घटना घडली. ऑगस्टमध्यें क्लेमेन्सला किओककला बोलावून घेण्यांत आलें. त्याची आई मृत्युशय्येवर पडलेली होती. कांहीं आठवड्यांनीं ती निवर्तली, जेन क्लेमेन्सचं प्रदीर्घ आणि उपयुक्त जीवन संपुष्टांत आलं. त्यावेळीं तिचं वय ८८ होतं. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं एल्मिरा येथें सौ. क्लेमेन्स हिचीहि आई परलोकवासी झाली.

❦ ❦ ❦

## १६.

# तें जीवघेऊ यंत्र : जोन : व्यावसायिक अपयश

टाइप-सेटर यंत्रामुळें उपलब्ध होणाऱ्या मोठमोठ्या रकमा दृष्टिपथांत येईपर्यंत 'यँकी' ह्या पुस्तकाच्या नफ्यांतून सर्व गरजा भागतील अशी अपेक्षा होती. त्या पुस्तकांतून चांगली प्राप्ति झाली, पण हाय! टाइप-सेटर यंत्राबाबतची अपेक्षा कधींच फलद्रूप झाली नाहीं. त्या यंत्राचा संशोधक जेम्स डब्ल्यू. पेज "हा कवि आहे, खराखुरा महान् कवि आहे, त्याच्या भव्य कलाकृति पोलादी अक्षरांत लिहून ठेवण्यांत आलेल्या आहेत" असं वर्णन मार्क ट्वेननें एकदां केलं होतं. त्यानं दहा वर्षे अविरत प्रयोग करून, आजवर तयार करण्यांत आलेल्या सर्व यंत्रांत अत्यंत आश्चर्यकारक असं यंत्र तयार करण्याची खटपट चालवली होती. तें यंत्र खिळे पाडणं, जुळविणं, शब्दांतलं अंतर सारखं करणं, चुका शोधून काढणं—थोडक्यांत म्हणजे जीं जीं कामं माणसं करीत असत तीं सर्व कामं अधिक बिनचूकपणें आणि कितीतरी अधिक वेगानें करूं शकणार होतं. अशा परिपूर्ण 'टाइप-सेटिंग' यंत्रापासून किती फायदा होईल याची जाणीव असल्यामुळें त्याच्या निर्मितीचें काम पुरें करण्यासाठीं आपल्या जवळचा शेवटचा डॉलरहि देऊन टाकायला मार्क ट्वेन तयार होता. पण तिथेंच खरी अडचण होती. तें यंत्र कधींच पूर्ण होऊं शकलं नाहीं. तें अत्यंत गुंतागुंतीचं, माणसाशीं कमालीचं साम्य असलेलं, अगदीं चटकन् नादुरुस्त होणारं अन् पुन्हा कार्यान्वित करायला अत्यंत अवघड असं यंत्र होतं. पेज यांना संपूर्ण आत्मविश्वास होता. ह्या सर्व अडचणींवर मात करणारी एकादी तरी युक्ति आपण अगदीं निश्चितपणें शोधून काढण्यांत जवळ जवळ यशस्वी होत आलों आहोंत असा सदैव त्यांचा विश्वास असे. अखेरीस त्या यंत्राचे वीस हजार अत्यंत सूक्ष्म व ठराविक मापाचे सुटे भाग तयार झाले. प्रत्येक सुट्या भागाला कसबी कारागिरीची आवश्यकता होती आणि प्रत्येक भाग हातानेंच बसवावा लागे. मार्क ट्वेननं

एकदां लिहिलं होतं, "मन थक्क करून सोडणाऱ्या ह्या यांत्रिक आश्चर्याशीं तुलना करतां आजवरचे सर्व आश्चर्यकारक शोध अत्यंत खुजे ठरून त्या नेहमींच्या व्यवहारांतल्या वस्तु वाटूं लागतील."

विश्वास बसूं नये इतकं तें आश्चर्यकारक यंत्र होतं. कधीं कधीं तें कांहीं तास संथपणें चाले पण मग त्यांतल्या नाजुक यंत्रणेचा एकादा भाग काम देईनासा होई आणि तो दुरुस्त करायला मग कधीं कधीं कित्येक दिवस किंवा आठवडेहि लागत. १८९० च्या अखेरीपर्यंत ह्या यंत्रावर मार्क ट्वेननं एक लक्ष ९० हजार डॉलर खर्च केले—त्यांतला एक छदामहि परत मिळणार नव्हता. हें काम पुढें चालविण्यासाठीं इतरांनीं भांडवल देण्याचं आश्वासन दिलं होतं, पण तें कुणीच पाळलं नाहीं. ह्या यंत्रांतून आपल्याला लक्षावधि डॉलर्स उपलब्ध होणार आहेत असा अजूनहि त्याचा विश्वास होता. पण तूर्त तरी त्या बाबतींत आपल्याला कांहींहि करतां येणार नाहीं हें त्यानं जाणलं. दोन गोष्टी उघड होत्या:—प्राप्ती-साठीं त्याला लेखनावरच अवलंबून राहणं भाग होतं. आणि दुसरं म्हणजे, खर्चांत कपात करण आवश्यक होतं. त्यानं आपलं कुटुंब परदेशीं नेण्याचं ठरवलं; तिथं राहणीहि स्वस्त होती आणि त्याचं मन दुसरीकडे वेधणाऱ्या गोष्टीहि कमी होत्या. त्यामुळें लिखाण करणं त्याला शक्य होणार होतं. नियत-कालिकांसाठीं लेख आणि गोष्टी जबर वेगानं लिहायला त्यानं प्रारंभ केला. बऱ्याच दिवसांपूर्वीं हॉवेल्स यांच्या समवेत लिहिलेलं जुनं नाटक त्यानं हुडकून काढल. त्याचं पुस्तक तयार केलं—'दि अमेरिकन क्लेमंट.' १८९१ च्या जूनमध्यें त्यांनीं हार्टफर्ड येथील आपल्या सुंदर घराला कुलुप ठोकलं. सतरा वर्षे तें त्याचं आदर्श सुखनिधान होतं. फर्निचर झाकून ठेवण्यांत आलं, खिडक्यांवरील पडदे खालीं सोडण्यांत आले आणि दिवे मालवले गेले.

प्रत्येकीं एक हजार डॉलर याप्रमाणें सहा वृत्तपत्रांतून पत्रें लिहिण्याचे करार मार्क ट्वेननं केलेले होते. त्याचा हात संधिवातानें दुखत होता. त्यानं पहिलं पत्र एक्स-लेस-बेन्स इथून धाडलं. पाणी घेण्याच्या ह्या ठिकाणाला तो 'आरोग्याचा कारखाना' म्हणत असे. दुसरं, मारियनबाद येथून धाडलं. ऑगस्टमध्यें तीं जर्मनींत पोंचलीं. आणि तेरा वर्षांपूर्वीं हायडेलबर्गमधील इलॉस हॉटेलांत त्या ज्या चाळीस नंबरच्या खोलींत त्यांनीं वास्तव्य केलं होतं त्याच ठिकाणीं एक दिवस येऊन दाखल झालीं. मग लौकरच तीं स्विल्झर्लंडमधील जिनीव्हा या सुंदर सरोवरानजीक असलेल्या आऊची-लॅसेन ह्या गांवीं आलीं. क्लेमेन्सनं एक मार्गदर्शक आणि एक नावाडी घेऊन, आपल्या कुटुंबियांना तिथंच ठेवून ऱ्होन

नदींतून जलपर्यटनाला प्रारंभ केला. सपाट बुडाच्या त्या चमत्कारिक होडींतून पर्यटन करून एकाद्या पुस्तकाची सामग्री मिळते कीं काय तें पाहायचा त्याचा उद्देश होता. पण त्या रमणीय नदींतून सप्टेंबरला महिन्यांत पर्यटन करणं ही इतकी आरामशीर कामगिरी होती कीं, तींत लेखन करणं अशक्यच होतं. घरीं धाडलेल्या एका पत्रांत त्यानं लिहिलं होतं:—" या शांत आणि निश्चळ वातावरणांत, स्वच्छ सूर्यप्रकाश पडलेला असतांना, वेगवान् प्रवाहांतून जलपर्यटन करणं ही अत्यंत आल्हाददायक गोष्ट आहे. कांहीं विचित्र प्राचीन ऐतिहासिक शहरें पाहण्याचा मोह क्वचित् मला होतोहि, पण पाण्याच्या पृष्ठभागावर इतकी मौज आहे कीं, मी कुठंच थांबत नाहीं. बाहेरूनच त्याचं दर्शन घेतों अन् होडी हाकारतों. ... उन्हाळ्यांत, उघड्या होड्यांतून युरोपांतल्या सगळ्या नद्या पालथ्या घालायची माझी मनीषा आहे." क्लेमेन्सनं आपलं जलपर्यटन आर्लेस इथं संपवलं. अथपासून इतिपर्यंत अत्यंत आल्दाददायक अशीच झाली ती सफर, पण त्यांतून वाङ्मयीन फलनिष्पत्ति कांहींच झाली नाहीं.

तो हिंवाळा क्लेमेन्स कुटुंबानं बर्लिनमध्यें घालवला. जर्मन राजधानींत मार्क ट्वेन ही ख्यातनाम व्यक्ति असल्यामुळें त्यांचे ते दिवस थाटांत पार पडले. सगळीकडे त्याचं चांगलं स्वागत झालं. कैसर दुसरा विल्यम यानं एकदां निवडक लोकांसमवेत त्याला मेजवानी दिली. नंतर मग महाराणींनीं त्याला न्याहारीचं निमंत्रण दिलं. कैसरला 'मिसिसिपी'वरचं पुस्तक अतिशय आवडलं. 'ट्रॅम्प अॅब्रॉड' मधील 'भयानक जर्मन भाषा' हें प्रकरण म्हणजे तर विनोदी लिखाणाचा एक अत्युत्कृष्ट नमुनाच होता. वस्तुतः मार्क ट्वेनचीं सारींच पुस्तकं सबंध जर्मनींत लोकप्रिय होतीं.

तिकडे अमेरिकेंतल्या घडत असलेल्या गोष्टी कांहीं चांगल्या नव्हत्या. काय करतां येईल याचा विचार करण्याकरतां जूनमध्यें क्लेमेन्स एकदां तिकडे जाऊन आला. त्यानं बहुधा फारच थोडं काम केलं असावं आणि लौकरच तो नॉहिम इथं परतला. तिथं तो निश्चितपणें लेखन करूं शकला. दोन गोष्टी त्यानं 'सेंट निकोलस' या नियतकालिकासाठीं लिहायला घेतल्या—त्यांतली एक म्हणजे 'दि एक्स्ट्रॉऑर्डिनरी ट्विन्स' (असामान्य जुळें) ही कथा म्हणजे 'पुडनहेड विल्सन'चं पहिलं स्वरूप होय; आणि दुसरी 'टॉम सॉयर अॅब्रॉड' ही होय. फ्लॉरेन्सच्या बाहेर, सेटिग्नानो बाजूच्या टेकडीवरील 'व्हिला व्हिव्हिआनी' ह्या अत्यंत जुन्या वाड्यांत मार्क ट्वेननं 'टॉम सॉयर अॅब्रॉड' आणि 'पुडनहेड विल्सन' ह्या कथा पुऱ्या केल्या. आणि जोन

ऑफ आर्कच्या कारुण्यपूर्ण पुस्तकाचा पूर्वार्ध लिहून काढला. वस्तुतः हनिबाल-मध्यें शिकाऊ कामगार म्हणून काम करीत असतांना जें एक पान वाऱ्यावर उडत उडत एके दिवशीं त्याला दिसलं होतं त्याच दिवशीं ह्या पुस्तकाच्या लिखाणाचा प्रारंभ झालेला होता. आयुष्यभर ती त्याची देवता बनून राहिली होती, आणि केव्हां ना केव्हां तरी तिच्यासंबंधीं लिहायची त्याची मनीषा होती.

आतांपर्यंत लिहिल्या गेलेल्या अत्यंत सुंदर कथांतील सर्वोत्कृष्ट अशी 'दि पर्सनल रिकलेक्शन्स ऑफ् जोन ऑफ् आर्क' ह्या कथेच्या लिखाणास त्यानं प्रारंभ केला. जोनचा खासगी चिटणीस सिउर लुई द कॉंटी यांची भूमिका स्वतः-कडे घेऊन म्हातारपणीं तो स्वतः न्यू ऑर्लीन्सच्या ह्या कुमारिकेची महान् कथा सांगत आहे अशी कल्पना करून त्यानं प्रथम पुरुषांत ती कथा लिहिली. एक दिवस व्हिव्हिआनी वाड्यांत जमिनीवर येरझारा घालतांना, एकीकडे जोरजोरानें धूम्रपान करीत करीत तो सौ. क्लेमेन्स आणि सुसी याना म्हणाला, "माझी स्वतःची सही असली तरी लोक मानणार नाहींत. मी जें जें लिहितों तें वाचून हसायला लोक आतुर असतात. माझ्या लिखाणांत त्यांना विनोद आढळला नाहीं तर ते निराश होतात. हें पुस्तक तर गंभीर होणार आहे. आजपर्यंत मीं जें जें लिहिलं त्यापेक्षां कितीतरी अधिक महत्त्व मी या पुस्तकाला देतों. मी तें निनांवींच लिहीन म्हणतों."

योजना पूर्ण झाली आणि मजकुराची जुळवाजुळव झाली कीं, तो वेगानें लिहीत असे. तारुण्यांतलं वाचन आणि प्रौढत्व यांची स्मृति आतां ताजी झाली होती—केवळ वाचन म्हणून नव्हे तर स्मरणांकित सत्य म्हणून सहा आठवड्यांत त्यानं एक लक्ष शब्द लिहिले, केव्हांहि झाली तरी ही प्रगति उल्लेखनीयच. पण ज्या ग्रंथांचा आधार त्यानं घेतला त्यांतले कांहीं परभाषेंतले होते ही गोष्ट आपण ध्यानांत घेतली म्हणजे ती प्रगति विशेष उल्लेखनीय वाटते. खूप दिवसांपूर्वी नदीवरील तांडेलाच्या जीवनांत सुरू केलेला फ्रेंच भाषेचा अभ्यास त्यानं कमी अधिक प्रमाणांत सतत चालू ठेवला होता, त्याचा त्याला आता अतिशय उपयोग झाला. तरीहि तें काम कांहीं त्याला कधींच सोपं गेलं नाहीं. ज्या फ्रेंच ग्रंथांचा त्यानं आधार घेतला, त्या ग्रंथांतील समासांत त्यानं करून ठेवलेल्या नोंदी पाहिल्या म्हणजे त्याच्या कष्टांची व्याप्ति ध्यानांत येते. कुटुंबांतील इतर मंडळी बहुधा रोज खालीं शहरांत जाऊन येत असत पण तो मात्र त्या निःशब्द बगिचांत जोनसमवेत बसून राही.

मार्च १८९३ च्या वसंत ऋतूंत हें हस्तलिखित बाजूला ठेवून त्याला

अमेरिकेची वारी करणं भाग पडलं अर्थात् तीहि निष्फळ ठरली. वेब्स्टर आणि कंपनी बुडत चालली होती. कशानंच ती वांचणार नव्हती. 'टाइप-सेटिंग' यंत्राबद्दल नवी आशा निर्माण झाली होती. पण एकूण पुनरुजीवनाविषयींची त्याची श्रद्धा बळकट नव्हती. ह्या भानगडीमुळें त्याच्यावर भलताच ताण पडत होता. ह्या धंद्यांतलीं देणीं बरींच थकलीं होतीं. कुठूनहि आशेचा किरण दिसत नव्हता. युरोपांत परतल्यावर न्यूयॉर्क येथील आपला व्यवस्थापक एफ्. डी. हॉल याला लिहिलेल्या पत्रांत मार्क ट्वेननं म्हटलं होतं, "धंद्याचा मला मनस्वी वीट आला आहे. स्वभावतः आणि वृत्तीनं मी धंद्याला नालायक आहें, यांतनं बाहेर पडायला मी आतुर झालों आहें. ज्वालामुखीच्या तोंडावर मी बसलों आहें. कसंहि करून मला धंद्यांतून बाहेर काढा." पुन्हां त्यानं हॉलला कळवलं, "हें वर्ष तुम्हांला अन् मला फारच लांबल्यासारखं वाटतंय्. कॅलेंडर इतकं लांबू शकतं हें मला ठाऊक नव्हतं...अधाशासारखा मी तुमच्या पत्रांची वाट पाहत असतों— 'यंत्राचं काम संपलंय' या तारेची पूर्वीं जशी वाट पाहत असे तसा! पण 'आतां पुढील आठवड्यांत निश्चित' हा वायदा 'खात्रीनं तीन आठवड्यांत' इतका फुललेला पाहून माझ्या ध्यानांत आलं कीं, माझ्या कानांना परिचित असलेला सूरच पुन्हा निघूं लागला आहे."

व्हिव्हिआनी इथलं बिऱ्हाड आवरून जूनमध्यें तीं जर्मनीला परतलीं. ऑगस्टच्या अखेरीस अमेरिकन उलाढालींचा ताण क्लेमेन्सला असह्य झाला. जर्मनींतल्या एका नहाळींत कुटुंबियांचा निरोप घेऊन क्लेमेन्स बोटीनं न्यूयॉर्कला गेला. प्लेअर्स क्लबमधल्या एका खोलींत—"दिवसाला दीड डॉलरची एक स्वस्त खोली घेतली आहे" असं त्यानं घरीं कळवलं होतं—मार्क ट्वेननं हें आर्थिक वादळ टळेल अशा अनाठायीं आशेनं हिंवाळा कसाबसा काढला. पूर्वी कधींहि नव्हतं इतकं त्याचं नशीब यावेळीं फिरलं होतं; एस्मराल्डा टेकड्यांत खाणी खोदण्याच्या दिवसांत देखील त्याच्या नशिबाचा फेरा इतका उलटा पडला नव्हता. प्रकाशन-संस्थेला एकूण दोन लक्ष डॉलर्सचं कर्ज होतं. त्यांतले ६० हजार डॉलर्स सौ. क्लेमेन्स यांनीं वेळोवेळीं दिलेल्या रकमेपोटीं द्यायचे असले तरी उरलेली भलीमोठी रक्कम बँका, छापखाने, बांधणी करणारे आणि कागदाचे कारखानदार यांना द्यायची होती. सगळीकडे घबराट पसरली होती. धंदा पार बसत चालला होता. बहुतेक दिवसभर क्लेमेन्स खोलींतच बसून राही, लिहिण्याचा प्रयत्न करी. नियतकालिकासाठीं अनेक लेख त्यानं लिहून काढले. बाहेरून तो आनंदी दिसे पण एकंदर परिस्थितीबद्दलची कटुता त्यानं मनांत दडवून ठेवलेली असे.

मात्र फारच थोड्या मंडळींना त्याच्या खऱ्या परिस्थितीची माहिती होती. अशांतल्या एकानं एके दिवशीं रात्रीं 'स्टँडर्ड ऑइल' चे लाखोपति मालक हेन्री एच. रॉजर्स यांच्याशीं ओळख करून दिली. श्री. रॉजर्स म्हणाले, "श्री. क्लेमेन्स, फार पूर्वींपासूनचा मी तुमचा एक चाहता आहें. खूप दिवसांपूर्वीं सँडविच आयलॅंड्सवर तुम्हीं दिलेलं व्याख्यान मीं ऐकलंय्." मग तीं दोघं एका टेबलापाशीं बसलीं. मार्क ट्वेननं अनेक गमतीदार गोष्टी सांगितल्या. तेव्हांपासून ते परस्परांचे मित्र झाले. यथावकाश मार्क ट्वेननं आपल्या सर्व आर्थिक विवंचना त्यांच्यापाशीं कबूल केल्या. रॉजर्स म्हणाले, "तुमच्या ह्या सगळ्या भानगडींत आतां मला थोडंसं लक्ष घालूं द्या." येथून पुढं "तुमच्या त्या खोलींतल्या येरझारा बंद करा" असा सल्ला त्यांनीं दिला. बोजा उचलायला कुणी समर्थ आहे अस वाटलं तर त्याच्या खांद्यावर तो टाकून आपला खादा हलका करायला मार्क ट्वेन तयार असे. हा त्याचा एक स्वभाव-विशेष होता. एका रात्रींतच तो पार बदलला—साफ नवा मनुष्य बनला. रॉजर्स कुटुंबाचं अन् दुसऱ्या अनेक जणांचीं निमंत्रणं त्यानं स्वीकारलीं. लौकरच तो इतका आनंदी दिसूं लागला आणि इतक्या ठिकाणीं लोकांच्या नजरेस पडूं लागला कीं, त्याचा एक परिचित म्हणाला, "हा गृहस्थ म्हणजे न्यूयॉर्कमधली एक अत्यंत देखणी स्त्री होऊन बसलाय्!"

दरम्यान, हेन्री रॉजर्स यांनीं त्याच्या भानगडींत 'लक्ष घातलं' होतं. 'टाइप-सेटर' यंत्रावर त्याची वाजवी श्रद्धा होती अन् त्याला यश लाभावं म्हणून बरीच मोठी रक्कम त्यानं आगाऊ दिली होती. त्यावेळीं पॅरिसमध्यें असलेल्या आपल्या कुटुंबियांना केबल पाठवून मार्क ट्वेननं अनेक आनंददायी आणि आशादायक चित्रं रेखाटलीं. एकदां त्यानं लिहिलं होतं:—"आतां जहाज दृष्टिपथांत आलंय्...एकदां का नांगर पडला कीं, मग मी म्हणेन : हे व्यवसाया! तुला रामराम, अगदीं कायमचा रामराम असो! मी पुन्हां कधींहि त्याला स्पर्श करणार नाहीं. वाङ्मयांतच मी जगेन. त्यांतच मी गडबडा लोळेन, चैन करीन. मी शाईंत पोहेन!" एकदां त्यानं केबल पाठवली:—"दहा दिवसांच्या आंत चांगली बातमी कळवितों." आणखी कांहीं दिवसांनीं:—"चांगली बातमी येत आहे." आणि नंतर थोड्याच दिवसांनीं :—"यश जवळ आलें आहे."

वेब्स्टर आणि कंपनीचा कारभार कोलमडण्याच्या बेतांत असल्याचं रॉजर्स यांच्या लक्षांत आलं. अखेरीस एप्रिल १८९४ मध्यें संकट आलंच. मुख्य धनकोनं रकमेची मागणी केली तेव्हां तत्काळ बेचनपत्र देण्याखेरीज दुसरा मार्ग उरलेला

नाहीं, असा सल्ला त्यानं दिला. अवघ्या दहा वर्षांपूर्वी एवढ्या किफायतशीरपणें सुरू झालेला व्यवसाय अपयशांत विराम पावला. वयाच्या ५९ व्या वर्षी मार्क ट्वेन दिवाळखोर बनला. कंपनीची सारी मालमत्ता विकून जमेच्या बाजूला धरण्यांत आली तेव्हां देखील त्याच्या डोक्यावर ७० हजार डॉलरचं कर्ज उरलं. रॉजर्स यांच्या मध्यस्थीनं एका डॉलरला ५० सेंट अशा प्रमाणांत कर्जफेड करावयाचा करार झाला. मार्क ट्वेन म्हणाला, "मला वेळ द्या, उरलेले ५० सेंटहि मी फेडून टाकीन."

हें वचन तो ह्या वयांत पाळूं शकेल अशी खात्री त्याची पत्नी आणि श्री. रॉजर्स यांच्याखेरीज कुणालाच नव्हती. कधीं कधीं नैराश्याच्या झटक्यांत तो अगतिक होई. एकदां तो म्हणाला, "तें फेडण्याचीं स्वप्नं पाहण्याची मला गरज नाहीं. मला तें कधींच जमणार नाहीं." पण असे क्षण फार थोडे. बहुतेक वेळ त्यानं आपलं मन आनंदी ठेवलें आणि आत्मविश्वास कायम राखला. 'टाइप-सेटर' यंत्रावर आतां फिरून त्याचा विश्वास बसूं लागला होता. त्यांतल्या फायद्यांतूनच आपण दिवाळखोरींतून बाहेर पडूं असं त्याला वाटत होतं. पण त्या वर्षीच नंतर हीहि आशा कायमची मालवली. श्री. रॉजर्स यांनीं त्याला कळवलं कीं, अंतिम चांचणींत तें यंत्र व्यवहार्य ठरलं नाहीं. आतां ती सगळी योजना पूर्णपणें आणि कायमची सोडून देण्यांत आली आहे.

जास्तींत जास्त वाईट घटना घडून चुकली होती. आतां कशाचंहि भय बाळगण्याचं कारण नव्हतं. एक आठवड्याच्या आंतच मार्क ट्वेन (आतां तो आपल्या कुटुंबियांसह पॅरिसमध्यें राहत होता) पुन्हां 'दि रिकलेक्शन्स ऑफ् जोन'च्या लिखाणास लागला. टाइप-सेटरची सारी आठवण, त्याचा उल्लेख देखील कायमचा बाजूस सारण्यांत आला. जुन्या पुस्तकांखेरीज आतां प्राप्तीचा दुसरा मार्ग नव्हता. आणि हेंहि उत्पन्न या काळांत फारसें येत नसे. तरीहि क्लेमेन्स कुटुंब आनंदांत असे. आणि मार्क ट्वेन तर पुनश्च लिखाणाच्या ऐन भरांत आला होता.

जोनच्या कथेचा कारुण्यपूर्ण शेवट लौकरच समीप आला. दिवसभर केलेलं लिखाण रोज रात्रीं तो कुटुंबियांना वाचून दाखवी. सुसीच्या भावना तत्काळ उचंबळून येऊन ती म्हणे, "थांबा, थांबा ! मला हातरुमाल आणूं द्या." एके दिवशीं सुसीनं आपल्या नोंदवहींत लिहिलं, "आज रात्रीं जोन ऑफ् आर्कला अग्नि देण्यांत आला."—म्हणजेच पुस्तकाचं लेखन समाप्त झालं होतं.

♠ ♠ ♠

## १७.

# जगप्रवास : प्रिय कन्येचा मृत्यु : कर्जाची परतफेड

सुसी आणि तिचे वडील या दोघांनाहि अगोदरच्या कोणत्याहि पुस्तकापेक्षां 'जोन'ची अधिक काळजी होती. श्री. रॉजर्स यांना क्लेमेन्सनं कळवलं, "कदाचित् हें पुस्तक खपणारहि नाहीं. पण त्याची मला फिकीर नाहीं. आपुलकीच्या पोटीं हें लिहिलंय्." 'हार्पर्स मॅगॅझीन'मध्यें तें क्रमशः, निनांवीं प्रसिद्ध करण्यांत आलं. पण लोकांनीं लौकरच मार्क ट्वेनची अद्वितीय शैली ओळखली.

१८९५ च्या वसंतऋतूचा सुमार होता. गेलेलं वैभव परत मिळविण्यासाठीं मार्क ट्वेननं नवी योजना आंखली. व्यासपीठावरील कामगिरींतून त्याला चांगलीच प्राप्ति झाली होती. आणि आतां त्याला त्या गोष्टीचा कमालीचा तिटकारा वाटत होता तरीहि या क्षेत्रांत एक अत्यंत अभूतपूर्व गोष्ट करायचं त्यानं ठरवलं. व्याख्यानं देत जगाची सफर करायची. मे महिन्यांत कुटुंबियांसमवेत तो बोटीनं अमेरिकेला गेला. मळ्यांतल्या निवासस्थानीं एकदोन महिने विश्रांति घेतल्यानंतर सौ. क्लेमेन्स, क्लारा आणि त्याचे अमेरिकेंतले एजंट श्री. जे. बी. पॉड यांच्यासमवेत पॅसिफिक किनारा पादाक्रांत करण्यास तो निघाला. सुसी आणि जीन मळ्यांतच मावशीजवळ राहिल्या. मार्क ट्वेनचा जागतिक दौरा प्रारंभापासून यशस्वी झाला. अमेरिका, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, भारत, सिलोन, दक्षिण आफ्रिका—सर्वत्र त्याचा चांगला सन्मान झाला.

जिथं जिथं तो गेला तिथलीं थिएटरें आणि सभागृहें श्रोतृसमुदायाला सामावूं शकत नसत. प्रत्येक ठिकाणीं त्याच्यावर देणग्यांचा वर्षाव होई. 'फॉलोइंग दि इक्वेटर'मध्यें ह्या साऱ्या हकीकती त्यानं आपल्या आल्हाददायक शैलींत नमूद करून ठेवल्या आहेत. वेळोवेळीं जमलेला नफा मार्क ट्वेन धनकोंचा भरणा करण्यासाठीं रॉजर्स यांच्याकडे पाठवी. आणि दक्षिण आफ्रिकेहून तीं बोटीनं

निघालीं तेव्हां ही रक्कम इतकी मोठी होती कीं, या प्रवासवर्णनाच्या पुस्तकाची रॉयल्टी जमेस धरतां सारं कर्ज पूर्णतया फेडून पुन्हां एकदां जगापुढें अनृणी म्हणून आपल्याला उभं राहतां येईल असा विश्वास त्याला वाटूं लागला होता. त्यांचा हा प्रदीर्घ दौरा संपत आला होता. हिंवाळा तीं लंडनमध्यें घालवणार होतीं. त्याप्रमाणें सुसी आणि जीन यांना आगाऊ सूचना देऊन तेथें येऊन मिळण्याविषयीं कळवलं होतं. पुन्हां एकदां भवितव्य उज्ज्वल दिसूं लागलं होतं.

जुलै अखेरीस तीं इंग्लंडला पोंचलीं. १२ ऑगस्टला सुसी आणि जीन येऊन पोंचणार होत्या. बारा तारीख उजाडली पण मुली आल्या नाहींत. फक्त पत्र आलं. सुसीची प्रकृति बरी नव्हती म्हणून प्रयाण लांबणीवर टाकलं होतं. काळजी करण्याचं कारण नाहीं असं पत्रांत म्हटलं होतं पण तरीहि ताबडतोब आईवडिलांनीं केबल पाठवून पुढील बातमी विचारली. समाधानकारक उत्तर न आल्या-कारणानं क्लारासह बोटीनं अमेरिकेला जायचं सौ. क्लेमेन्स यांनीं निश्चित केलं. क्लेमेन्सनं लंडनलाच राहून हिंवाळ्यांतल्या निवासस्थानाची तजवीज करावी असं ठरलं. सुसीची प्रकृति संथपणें पण निश्चित सुधारणार आहे अशी केबल आली. सौ. क्लेमेन्स आणि क्लारा ताबडतोब बोटीनं रवाना झाल्या. पुढें एकदा केलेल्या नोंदींत मार्क ट्वेननं म्हटलंय्: "१८९६ च्या ऑगस्टची ती १५ तारीख होती. नंतर तीन दिवसांनीं, माझी पत्नी आणि क्लारा अर्धाअधिक महासागर ओलांडून गेल्या असतील अशा वेळीं मी भोजनगृहांत उभा होतों. माझ्या मनांत विशेष असा कसलाच विचार नव्हता. तेवढ्यांत माझ्या हातांत केबलग्रॅम येऊन पडला. यांत लिहिलं होतं: आज शांतपणें सुसीची मुक्तता झाली."

मार्क ट्वेनच्या आयुष्यांत अनेक दुःखदायक घटना घडल्या. पण हिच्याशीं तुलना दुसऱ्या कोणत्याच आपत्तीची होऊं शकणार नाहीं. मृतकन्या हा त्याच्या हृदयाचा ठेवा होता. त्यांची ताटातूट होऊन एक वर्ष झालं होतं. अन् आतां भेट कधींच होणार नाहीं हें त्याला कळून चुकलं होतं. हा घाला आला त्यावेळीं तो अगदीं एकटा होता, परक्यांच्या सहवासांत होता. महासागरावरून दररोज पुढें पुढें सरकत अंतःकरण भेदून टाकणाऱ्या त्या शोकांतिकेजवळ जात असलेल्या घरच्या मंडळींना ती बातमी कळवणं देखील त्या सबंध दिवसांत त्याला जमलं नाहीं.

हार्टफर्डमधल्या जुन्या घरांत सुसी क्लेमेन्स वारली. मळ्यांत कांहीं काळ तिला बरं वाटलं, पण मग तिची प्रकृति खालावली. अखेरीस तिनं डॉक्टरचा सल्ला घेतलाच पाहिजे असं तिला बजावण्यांत आलं. डॉक्टर आले. त्यांनीं उपचार सांगितले आणि तिनं आपल्या स्वतःच्या घरीं शांतपणें विश्रांति घेतली पाहिजे

असा सल्ला दिला. पण सुसीची प्रकृति खालावतच गेली. मेंदूचा वेष्टनदाह करणाऱ्या रोगानं तिला पछाडलंय् असं डॉक्टरांनीं कांहीं दिवसांनीं सांगितलं. ती होती ऑगस्टची १५ तारीख. त्याच दिवशीं तिची आई आणि क्लारा इंग्लंडहून बोटीनं निघाल्या. तीन दिवसांनीं ती मरण पावली अन् ज्या दिवशीं सौ. क्लेमेन्स आणि क्लारा येऊन पोंचल्यां त्याच दिवशीं रात्रीं एल्मिराला दफनविधीसाठीं तिचा मृत देह नेण्यांत आला. अनेक वर्षांपूर्वीं मरण पावलेल्या छोट्या भावा-शेजारींच त्यांनीं तिला पुरलं. रॉबर्ट रिचर्डसन यांच्या पुढील ओळी ऑस्ट्रेलियांतील मुक्कामांत त्यांच्या स्मरणांत राहिल्या होत्या :—

*[भावार्थ :—उन्हाळ्यांतला तेजस्वी सूर्य तळपूं दे. येथें उबदार दक्षिणवारा हळु वाहूं दे येथें. हरित तृणाचें वर आच्छादन, घे विश्रांति तेज-शलाके ! निरोप घेतों अखेरचा तव हृदयबालिके.]*

क्लारा आणि जीनला घेऊन सौ. क्लेमेन्स इंग्लंडला परतल्या. अन् लंडन-मधील टेडवर्थ स्क्केअर या अगदीं एका बाजूच्या कोपऱ्यांत एका छोट्याशा घरांत ह्या दुःखी कुटुंबानं हिंवाळ्यापुरता आसरा घेतला. त्यांच्या अगदीं निकटच्या मित्रांपैकींहि फारच थोड्यांना त्यांचा ठावठिकाणा माहीत होता. यथावकाश अशी बातमी पसरली कीं, 'मार्क ट्वेन म्हातारा झाला असून आजारी आहे. कुटुंबियांनींहि त्याला सोडलं आहे. अशा अवस्थेंत दारिद्र्यांत दिवस कंठून कर्जफेडीसाठीं तो श्रम करतोय्.' नंतर आणखी एक बातमी पसरली—'मार्क ट्वेन एव्हांना मरण पावला आहे.' मग एका बातमीदारानं कसाबसा टेडवर्थ स्क्केअरमधला त्यांचा पत्ता काढला. स्वतः मार्क ट्वेननंच त्याचं स्वागत केलं. काय हवं त्याची चौकशी केली. बातमीदारानं तें वृत्त सांगितल्यावर अत्यंत गंभीरपणें, आपल्या नेहमींच्या संथपणें, नाकांत, हेल काढून बोलण्याच्या पद्धतीनं क्लेमेन्स म्हणाला, "असं लिहा कीं, माझ्या मृत्यूबाबत देण्यांत आलेली बातमी–कमालीची–अतिशयोक्तिपूर्ण–आहे." दुसऱ्याच दिवशीं ह्या वाक्यान पृथ्वीच्या दोन्ही गोलार्धांतील लोकांची चांगलीच करमणूक केली. त्याच्या अंतःकरणांतील निराशा कितीहि बद्धमूल असली तरी त्याच्या तोंडून आश्चर्यचकित करून टाकणारे हेल निघत असत अन् अगदीं अखेरच्या दिवसापर्यंत ते तसेच निघत राहिले.

नोव्हेंबरपर्यंत नव्या प्रवासवर्णनात्मक पुस्तकाच्या लिखाणाला त्यानं प्रारंभ केला. प्रथम 'अराउंड दि वर्ल्ड' असं नांव द्यावं असा त्याचा बेत होता. त्या हिंवाळ्यांत तो मुळींच बाहेर पडला नाहीं. संथपणें लेखन चालू होतें. १८९७ च्या

मे महिन्यांत तें पुरं झालं. दरम्यान, त्याचा जगप्रवास चालू असतांना प्रकाशकांनीं मार्क ट्वेनचीं दोन पुस्तकें प्रकाशित केलीं—जोन ऑफ् आर्क आणि टॉम सॉयरचं दुसरं पुस्तक. 'सेंट निकोल्स' ह्या नियतकालिकांत क्रमशः प्रसिद्ध झालेली त्याची 'टॉम सॉयर ॲब्रॉड' ही कथा आणि 'टॉम सॉयर, डिटेक्टिव्ह' ही कथा अशा दोन छोट्या गोष्टी त्या दुसऱ्या पुस्तकांत समाविष्ट केलेल्या होत्या. 'जोन ऑफ् आर्क' हें पुस्तक त्यानं आपल्या पत्नीला अर्पण केलं होतं. आजवर केलेल्या लिखाणांत हा मान देण्याजोगं असं हें एकच पुस्तक आहे असं त्याचं मत होतं. आपण लिहिलेल्यांतलं हें सर्वांत चांगलं पुस्तक आहे असं त्याला वाटे अन् त्यानं आपलं हें मत कधींच बदललं नाहीं. नंतर बारा वर्षांनीं ३० नोव्हेंबर १९०८ रोजीं आपल्या ७३ व्या वाढदिवशीं त्यानं अंतिम निर्णय दिला : "माझ्या सर्व पुस्तकांत मला 'जोन ऑफ् आर्क' अतिशय आवडतं. तें सर्वांत चांगलं आहे हें मला पूर्णपणें ठाऊक आहे. अन् दुसरं असं, अन्य कोणत्याहि पुस्तका-पेक्षां सातपट आनंद त्या पुस्तकानं मला दिलाय्. बारा वर्षं त्याच्या लिखाणाची पूर्वतयारी चालली होती. अन् दोन वर्षं प्रत्यक्ष लिखाणाला लागलीं. इतर पुस्तकांना पूर्वतयारीची आवश्यकताच नव्हती."

सुरवातीला लोकांना लेखकाचं हें मूल्यमापन पटलं नाहीं. त्यामुळं पुस्तकाला विशेष अशी मागणी आली नाहीं. पण पुढें लोकांनीं आपलं मत दुरुस्त केलं अन् दरसाल 'जोन' ला अधिक मागणी येत गेली. मार्क ट्वेनच्या अत्यंत लोकप्रिय पुस्तकाच्या खपाएवढा खप होईपर्यंत हा क्रम चालू होता. टॉम आणि हक् यांच्या नव्या कथा, त्यांच्या पूर्वींच्या साहसांइतक्या कधींच लोकप्रिय झाल्या नाहींत. प्रवासवर्णनाचं पुस्तक हातावेगळं करतांच क्लेमेन्सनं नव्या कथा लिहायला घेतल्या. पण लौकरच उन्हाळयासाठीं तो कुटुंबियांसह स्वित्झर्लंडला जायला निघाला. लेक ल्युसेनेनजीक वेइगिस गांवीं 'व्हिला बुहलेग' ह्या दिवसाला पांच फ्रँक भाड्याच्या अत्यंत सामान्य अशा घरांत तीं राहिलीं. कारण कर्जफेडीसाठीं पैसे बाजूला काढून ठेवतां यावेत म्हणून तीं अत्यंत काटकसरीनें राहत होतीं. लिखाण करण्याच्या मनःस्थितींत मार्क ट्वेन नव्हता. शिवाय 'फॉलोइंग दि इक्वेटर'—हें त्या पुस्तकाचं नवं नांव—मुद्रितें तपासण्यासाठीं येऊं लागलेलीं होतीं.

शरदृतूंत हें कुटुंब व्हिएन्नाला येऊन दाखल झालं. हॉटेल मेट्रोपोलमध्यें हिंवाळा काढायचा ठरला. आल्या क्षणापासूनच मार्क ट्वेन आणि त्याचं कुटुंब यांच्या मागं धांदलीचं जीवन लागलं. व्हिएन्नाचं जीवन रमणीय करून सोडणाऱ्या अनेक क्षेत्रांतील ख्यातनाम व्यक्तींचं एकत्र भेटण्याचं ठिकाण असं स्वरूप मेट्रोपोल-

मधल्या त्यांच्या खोलीला आलं. ऑस्ट्रेलियन राजधानींत आपण वाङ्मयकेसरी होऊन राहिलों आहोंत असं मार्क ट्वेनला दिसून आलं. प्रत्येक क्लबानं त्याचा सत्कार केला अन् त्याचीं जर्मन भाषेंतलीं भाषणं ऐकून आनंदानं पोट धरधरून सारे हसले. रस्त्यांत तो दिसला रे दिसला कीं, लोक त्याला ओळखूं लागले, "अरे, त्यांना जाऊं दे! हेर मार्क ट्वेन चालले आहेत, दिसत नाहीं तुला?" —असं एका अधिकाऱ्यानं रक्षकाला फर्मावलं. खूप गर्दी जमल्याकारणानं तो रक्षक त्याला अडवूं पाहत होता.

इतके सामाजिक समारंभ असूनहि ह्या काळांत मार्क ट्वेननं पुष्कळ चांगलं लिखाण केलं. 'कन्सर्निंग ज्यूज्' (ज्यू लोकांसंबंधीं) ह्या मथळ्याचा त्याचा लेख, व्हिएन्ना येथील पहिल्या हिंवाळ्यांत त्यानं लिहिला. खास करून त्यांची बाजू मांडणारा तो एक उत्कृष्ट लेख होता. 'दि मॅन दॅट करप्टेड हॅडलेबर्ग' ही उत्कृष्ट कथाहि त्यानं याच काळांत लिहिली. ह्या काळांत त्यानं चांगलं लिखाण केलं याला कारणहि तसंच होतं. फार मोठ्या ओझ्याखालून त्याचं मन रिकामं झालं होतं—त्यानं सारं कर्ज फेडून टाकलं होतं! व्हिएन्नांत "आपण तीं कर्जे फेडून टाकूं या. आतां तें ओझं मला बिलकुल सहन होत नाहीं. त्यामुळें मी कामाला अगदीं निरुपयोगी होऊन जातों." कर्जफेडीसाठीं त्यानं बरीच मोठी रक्कम जमवली होती. आणि नव्या पुस्तकाच्या रॉयल्टीचे पैसेहि हातीं येऊं लागले होते. कर्जाचे पैसे परत देण्यास सुरुवात झाली होती. डिसेंबरच्या अखेरीस त्यानं पुन्हां कळवलं, "कर्ज कमी होतंयू हें पाहून आम्हांला अतिशय आनंद होतो. आयुष्यांत प्रथमच पैसे जमविण्याऐवजीं पैसे देऊन टाकतांना मला अधिक आनंद होत आहे."

१८९८ च्या जानेवारीच्या अखेरीस सर्व धनकोंचा अखेरचा हप्ता देऊन टाकण्याइतके पैसे क्लेमेन्सनं जमवले होते. धंद्यांत अपयश आलं तेव्हां पांच वर्षांत कर्जफेड करायची असं त्याच्या मनानं योजलं होतं पण चार वर्षांहून कमी कालावधींत त्यानं हें उद्दिष्ट गांठलं होतं. श्री. रॉजर्स यांच्याकडून आलेल्या अहवालावरून धनकोंचे अखेरचे हप्ते दिल्यावर क्लेमेन्सच्या खात्यावर तेरा हजार डॉलर्स उरत होते. आपल्या ह्या आर्थिक व्यवहारांचा सुगावा वृत्तपत्रांना लागूं नये म्हणून क्लेमेन्स पुष्कळ जपले. पण त्यानं कर्जाचे अखेरचे हप्ते दिले ही बातमी तो छपवूं शकला नाहीं. वृत्तपत्रांनीं तिला जास्तींत जास्त प्रसिद्धि दिली. मोठमोठे मथळे देण्यांत आले. अग्रलेखांतून मार्क ट्वेनला दुसरा वॉल्टर स्कॉट ठरवण्यांत आलं. कारण स्कॉटनंहि कर्जाचा बोजा हलका करण्यासाठीं खूप श्रम घेतले होते. त्याच्या

देशबांधवांना मार्क ट्वेनविषयीं यापूर्वीं एवढी आपुलकी कधींच वाटली नव्हती.

सॅम्युएल क्लेमेन्सवर हेन्री रॉजर्स यांचे उपकार खूपच होते. पण अनेकांना वाटत होते ते हे उपकार नव्हत. अनेकदां असं सांगितलं जाई कीं, त्या धनाढ्य माणसानं मार्क ट्वेनला मोठ्या रकमा उसन्या, अगर तशाच देऊन टाकल्या, अन् सौदे करण्याचे मार्गहि दाखवले. पण ह्या विधानांत सत्याचा लवलेशहि नाहीं. हेन्री रॉजर्सनं मार्क ट्वेनला जर कांहीं दिलं असेल तर तो त्याचा अमूल्य सल्ला आणि वेळ—विशिष्ट रकमापेक्षां ह्या देणग्या फार मोलाच्या होत्या—अन् हे उपकार मार्क ट्वेन यत्किंचितहि कमीपणा न मानतां स्वीकारूं शकत होता. पत्रांत कृतज्ञतेचा उल्लेख नाहीं असं क्वचितच होई, अन् मार्क ट्वेनला रॉजर्स यांच्याविषयीं केवढी कमालीची कृतज्ञता वाटत होती तें त्याच्या पुढील पत्रावरून आपल्या ध्यानांत येऊं शकतं : "मला अफाट मनःशांति पुनश्च लाभली आहे—आतां कसलंहि ओझं नाहीं. लिखाण पुन्हां आनंददायी वाटूं लागलंय्, आतां त्याला काबाडकष्टाचं स्वरूप राहिलेलं नाहीं."

त्यानं खूप लिहिलं, चांगलं लिहिलं. बहुतेक नियतकालिकांसाठीं लेख लिहिले. त्यांतल्या कांहींचा संग्रह पुढं 'ख्रिश्चन सायन्स' नामक ग्रंथात करण्यांत आला आहे. नव्या स्वातंत्र्यांत अन् ऐश्वर्यात, मिळणाऱ्या उदंड मानसन्मानांत, व्हिएन्नांतील वैभवशाली वातावरणांत तो एखाद्या बालकासारखा मौज करीत होता. पण पृष्ठभागाच्या खालीं लागूनच अविस्मरणीय दुःख असे. विश्रांतीच्या वेळीं त्याचा चेहरा सदैव दुःखी असे. एकदां हॉवेल्स यांना आपल्या यशाविषयीं लिहिल्यावर पुढं त्यानं लिहिलं, "ह्या सर्व गोष्टींत एकाद्याचं मन रमेल, हलेलहि. आज रात्रीं बालगृहांत 'अॅट दि बॅक ऑफ् दि नॉर्थ विंड'ची एक जुनी प्रत दृष्टीस पडतांच माझ्या अंतःकरणांत विलक्षण खळबळ माजली. तें पुस्तक आम्ही वाचीत असूं, ते दिवस किती सुखाचे होते! सुसीला तें किती आवडे!"

क्लेमेन्स-कुटुंबान व्हिएन्नांत दोन हिंवाळे काढले. दुसऱ्या हिंवाळ्यांत तीं हॉटेल फ्रान्समध्यें राहिलीं. मेट्रोपोलमधल्या खोल्यांपेक्षां इथल्या खोल्या मोठ्या होत्या; अधिक चांगल्या होत्या आणि ख्यातनाम लोकांची गर्दीहि तिथं अधिक होई. त्यांच्या दिवाणखान्याला 'दुसरी वकिलात' असं नांव पडलं अन् खरोखरच ऑस्ट्रियन राजधानींत अमेरिकेचा खराखुरा प्रतिनिधि मार्क ट्वेनच होता. सार्वजनिक हिताच्या प्रत्येक प्रश्नावर त्याचा सल्ला घ्यायची फॅशन पडून गेली. अन् त्यानं व्यक्त केलेलं मत गंभीर स्वरूपाचं असो कीं नसो, तें प्रसिद्धिलायक मानलं जाई. अनेकांनीं देऊं केलेल्या अनेक गोष्टी त्यानं नाकारल्या. एका विशिष्ट जातीच्या

तंबाखूची शिफारस करण्याबद्दल देऊं करण्यांत आलेले दहा हजार डॉलर त्यानं नाकारले. खरं म्हणजे ती तंबाखू त्याला अतिशय आवडत असे. एका विनोदी नियतकालिकावर त्याचं नांव संपादक म्हणून घालण्याबद्दल सालिना १० हजार डॉलर पांच वर्षेपर्यंत देऊं करण्यांत आले होते, तेहि त्यानं नाकारले. दहा व्याख्यानांचा मोबदला म्हणून देऊं केलेले दहा हजार डॉलर त्यानं नाकारले. ह्याच दरानं म्हणजे दर व्याख्यानाला एक हजार डॉलर याप्रमाणें पन्नास व्याख्यानांचं निमंत्रणहि त्यानं नाकारलं. तो म्हणे, "या रकमांवांचूनहि माझं भागेल अन् शिवाय माझ्या स्वाभिमानाचे कांहीं अवशेषहि मी जतन करून ठेवूं शकेन."

क्लेमेन्स अन् त्याचे कुटुंबीय यांनीं व्हिएन्ना सोडलं, तो १८९९ चा मे महिना होता. जीन क्लेमेन्सच्या प्रकृतीप्रीत्यर्थ त्यांनीं तो उन्हाळा स्वीडनमध्यें घालवला अन् हिंवाळयासाठीं तीं ३० वेलिंग्टन कोर्ट ह्या लंडनमधील एका घरीं राहिली. तदनतरचा उन्हाळा लंडन शहराच्या थोडं बाहेर टेकडीवरील डोलिस हिल नामक एका, सुंदर, आच्छादित निवासस्थानीं त्यांनीं घालवला. त्यावेळीं शहराचा पसारा कांहीं तिथपर्यंत पसरलेला नव्हता. मोठमोठे ओकवृक्ष, लिलीचीं फुलें असलेलीं छोटीं कुंडें, हरिततृणांकित विस्तीर्ण मैदानें तिथं होतीं. 'डोलिस हिल'हूनहि अधिक मोठं आकर्षण त्यांना होतं—अमेरिकेचं, स्वदेशाचं. मार्क ट्वेन आतां पासष्ट वर्षांचा झाला होता, पुनश्च अनृणी झाला होता. स्वदेशीं परत जायचं त्यानं ठरवलं. सप्टेंबर अखेरीस त्यांनीं 'डोलिस हिल'ला कुलुप ठोकलं. अन् ६ ऑक्टोबर १९०० रोजीं 'मिनेहाहा' बोटीनं ती न्यू यॉर्कला निघालीं. मार्क ट्वेनच्या मतें आतां त्यानं परदेश-प्रवासाचा कायमचा निरोप घेऊनच ह्या बोटीवर पाय ठेवला. नऊ दिवसांनंतर जहाजावर भेटायला आलेल्या एका बातमीदाराला तो म्हणाला, "मी किनाऱ्यावर पोंचलोंच तर माझे दोन्ही पाय मोडून टाकणार आहें, म्हणजे मला पुन्हां कुठं कधीं निघून जातांच येणार नाहीं."



## १८.

# स्वदेशांत सन्मान

मार्क ट्वेनचा सत्कार करण्याच्या बाबतींत व्हिएन्ना आणि लंडन शहरावर मात करण्याचा प्रयत्न न्यू यॉर्कनं केला. कर्जाविरुद्ध त्यानं केलेल्या प्रचंड झगड्याच्या वर्णनानं अन् त्यानं मिळविलेल्या विजयाच्या बातम्यांनीं सारीं वर्तमानपत्रं भरून निघालीं. त्याचा भव्य सत्कार करण्याच्या बाबतींत मंडळें आणि संस्था यांची एकमेकांशीं स्पर्धा लागली होती. लेखनाच्या असंख्य मागण्या अन् व्याख्यानांचीं निमंत्रणं त्याच्याकडे येऊन पडत. लिखाणांत एका शब्दाला एक डॉलर त्याला देऊं करण्यांत आला अन् व्याख्यानाच्या शर्ती तर त्यानं हव्या त्या सांगाव्यात असं लोक म्हणत. पण या खळबळजनक प्रकारांनीं त्याला मोह पडला नाहीं. कांहीं नियतकालिकांपुरतीच त्यानं आपली वाङ्मयसेवा मर्यादित केली. अन् लौकरच हार्पर अँड ब्रदर्सशीं त्यानं करार करून टाकला. तो जें कांहीं लिहील त्यांतल्या प्रत्येक शब्दाला वीस सेंट (नतर तीस सेंट) द्यायचे असं ठरलं. सारीं पुस्तकं प्रकाशित करण्यासंबंधींचा करारहि त्यानं त्याच कंपनीशीं करून टाकला. एव्हांना त्याचीं सारीं पुस्तकं सुसूत्रपणें एका आवृत्तींत संग्रहित झालीं होतीं. शक्य तेवढ्या साऱ्या गोष्टी मार्गीं लावाव्यात अशी त्याची इच्छा होती. कांहीं काळ तरी शांततेंत घालवून विश्रांति घ्यावी असंहि त्याला वाटे, पण तें अशक्य होतं. आपल्यावर होणारा मानसन्मानाचा प्रचंड वर्षाव म्हणजे एकप्रकारची कृतज्ञतेची भव्य अभिव्यक्ति असल्यामुळें आपण त्याला साफ नकार देऊं शकत नाहीं, याची त्याला जाणीव झाली होती. हॉवेल्सनं म्हटलंय्, "मार्क ट्वेनच्या देशबांधवांनीं पूर्वींचे सारे पायंडे मोडून त्यांचा सत्कार केला. त्यानंहि आपल्या परीनें त्याचा मोबदला देण्याचा कसून प्रयत्न केला."

विविध मेजवान्यांच्या आणि अन्य प्रसंगीं मार्क ट्वेननं या काळांत केलेल्या भाषणांतून श्रोत्यांना एक नवा आणि गंभीर आशय प्रतीत होई. अद्यापहि तो त्यांना

हसवी, पण त्याचबरोबर त्यांना विचारदेखील करायला लावी. नव्या राष्ट्रवादाचं तत्त्वज्ञान तो मांडूं लागला—पट्टे आणि तारांकित असा अमेरिकेचा ध्वज जिथं जिथं उभविला जाईल तिथं तिथं त्याचं हर्षोन्मादानं जयगान करायला सांगणारा राष्ट्रवाद नव्हे तर पट्टे आणि तारांकित ध्वज निर्मळ ठेवून जयगान करण्यालायक राखा असें सांगणारा तो राष्ट्रवाद. एके ठिकाणीं तो म्हणाला, "आपलं स्वातंत्र्य मर्यादित करण्याची शिकवण आपण देतों. देशभक्तीला दुय्यम स्थान द्या असं आपण शिकवतों. कोणत्याहि प्रश्नाचा बरेवाईटपणा पारखून न घेता अधिक मोठा जमाव असेल त्या बाजूनें ओरडायला शिकवतों. राजसत्तेंत नेमकी अशीच शिकवण मिळते—सदैव अशीच शिकवण मिळत आलेली आहे." राजसत्तेशीं अंधनिष्ठा ठेवण्याच्या वृत्तीचा त्यानं निषेध केला. तो स्वतः 'अधिक मोठा जमाव असेल त्या बाजूला' क्वचित् असे. त्यावेळीं अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणांत बराच गोंधळ माजला होता. त्यांतील ज्या गोष्टी त्याला अन्याय्य वाटल्या त्यांसंबंधीं त्यानं आपल्या लिखाणांत अत्यंत कठोर आणि निर्भीड प्रहार केले. परिणामीं एका व्यंगचित्रांत हक् फिन् ही तोफ उडविणारा मार्क ट्वेन हा सशस्त्र उमराव आहे असं दाखवण्यांत आलं होतं. पण त्याची वृत्ति नेहमीं चढाईची नसे. त्या हिंवाळ्यांत कार्नेजी हॉलमध्यें लिंकन जयंतीनिमित्त एकदां त्यानं आणि पूर्वी कॉन्फेडरेशनच्या बाजूनं लढलेला एक सैनिक कर्नल हेन्री वॅटरसन यांनीं भाषणं केलीं. यासंबंधीं त्यानं ट्विचेलला कळवलं, "म्हणजे गंमत पाहा! दोघे जुने बंडखोर तिथं जमले होते. त्या दिवशीं मी होतों अध्यक्ष अन् वॅटरसन वक्ते. चाळीस वर्षांत परिस्थिति इतकी बदलली आहे, त्याबद्दल परमेश्वराचे आभार मानले पाहिजेत!"

क्लेमेन्स कुटुंब परत हार्टफर्डला गेलं नाहीं. परदेशांतल्या वास्तव्यांत प्रारंभीं सौ. क्लेमेन्स यांना वाटे, परत तिथंच जावं, तिथलं तें सुंदर घर पुनश्च गजबजावं, सारं कांहीं अगदीं पूर्वीसारखं असावं. पण सुसीच्या निधनामुळें हें सारंच पालटलं. म्हणून तीं तिथं परत गेलींच नाहींत. बाहेर गाडी उभी होती अन् आंतल्या रिकाम्या खोल्यांवरून एकदां शेवटची नजर टाकण्यासाठीं सौ. क्लेमेन्स आंत गेल्या होत्या तेंच त्या दिवशीं त्यांनीं घेतलेलं त्या घराचं अखेरचं दर्शन. हिंवाळ्यासाठीं त्यांनीं १४ वेस्ट टेन्थ स्ट्रीटवर एक घर घेतलं अन् उन्हाळा येतांच तीं सारानॅक् लेकवरील एका लाकडी खोलींत राहायला गेलीं; तिला तीं 'दि सेअर' म्हणत. त्या ठिकाणीं मार्क ट्वेननं 'ए डबल बॅरल्ड डिटेक्टिव्ह स्टोरी' लिहिली. शर्लॉक होम्सवरील हें प्रहसन कांहीं तितकंसं

यशस्वी ठरलं नाहीं. उन्हाळ्यांतला बहुतेक वेळ तो विश्रांति घेई अन् रमत गमत हिंडत असे—त्याचा तो हक्कच होता. हें कुटुंब मग न्यूयॉर्कला परतलं नाहीं. हडसन नदीवरील रिव्हरडेल इथलं एक सुदर घर त्यानीं घेतलं. १९०१ सालीं तिथंच तीं स्थायिक झालीं. अन् अमेरिकेंत असेपर्यंत तिथंच राहायचं त्यांनीं निश्चित केलं. तें त्यानीं विकतहि घेतलं असतं पण किमत त्यांच्या आवाक्याबाहेरची होती.

पुढील वर्षीच्या जूनमध्यें मार्क ट्वेनला पश्चिम प्रदेशांतील त्याच्या जन्मभूमींतील विद्यापीठाकडून एल् एल्. डी. ही पदवी स्वीकारण्यासाठीं निमंत्रण आलं. जुने संबंधित आणि मित्र याना साधारणतः शेवटची भेट देण्यासाठीं त्यानं तो प्रवास पत्करला. सेंट लुईमध्यें तो होरेस बिक्स्बींना भेटला. पंचेचाळीस वर्षांपूर्वी ते जसे ताजेतवाने, कृश परंतु काटक आणि निकोप प्रकृतीचे होते तसेच याहि भेटींत ते त्याला दिसले. तांडेल-संघटनेच्या कचेरींत ते दोघे गेले तेव्हा मार्क ट्वेनच्या पुनरागमनाबद्दल सत्कार करण्यासाठीं झाडून सारे तांडेल जमले होते. तिथून तो आगगाडीन हनिबालला गेला. तिथं त्यान बरेच दिवस घालवले. तो लॉरा हॉकिन्सला भेटला —ती आतां श्रीमती फ्रेझर होती अन् विधवा झालेली होती. म्हातारा झालेला जॉन ब्रिग्ज आणि चांगल्या वर्तणुकीबद्दल सुवर्णपदक मिळविणारा जॉन रोबार्ड्स यांनाहि तो भेटला. हिल स्ट्रीटवरील जुन्या घरांत—जिथं एके काळीं तो राहत असे, खेळ जुळवीत असे तेथें—तो एकदां जाऊन आला.

घराची पाहणी झाल्यावर तो म्हणाला, "हें सारं आतां मला किती छोटं वाटतंय्. पण ही गोष्ट मुलाला किती मोठी वाटते. पण आणखी दहा वर्षांनीं जर मी इथं आलों तर मला हें जणुं पक्ष्यांच्या घरट्याएवढं वाटेल." तो हक्लला भेटला नाहीं. टॉम ब्लॅकनशिप फार वर्षें हनिबालमध्यें राहिला नाहीं. पण 'लव्हर्स लीप' गुंफा, वगैरे सगळ्या परिचित ठिकाणीं तो मोटारींतून जाऊन आला. 'टॉम सॉयर' मध्यें जिला 'कार्डिफ हिल' हें नाव दिलंय् त्या 'हॉलिडेज् हिल'वर रविवारीं दुपारीं तो जॉन ब्रिग्जबरोबर फिरून आला.

पन्नास वर्षांहून अधिक काळ उलटून गेला होता; आणि टॉम सॉयर अन् जो हार्पर हे दोघे पुनश्च एकत्र आले होते. दोन म्हातारे. ती टेकडी पूर्वीसारखीच हिरवीगार होती अन् नदींतल्या जललहरींवर सूर्यप्रकाश तसाच चमचमत होता. इलिनॉइज्च्या बाजूच्या किनाऱ्याकडे दूरवर दृष्टिक्षेप टाकून सॅम क्लेमेन्स म्हणाला, "जॉन! मीं असलं सुंदर दृश्य पूर्वी कधींच पाह्यलं नव्हतं. खालीं त्या तिथं पलिकडे तो माणूस बुडाला होता. अन् तिकडे ती आगबोट बुडाली होती. तिकडे

'लव्हर्स लीप' पाशीं एके रात्रीं स्वर्गांत जाण्यासाठीं मिलराइट मंडळींनीं तयारी केली होती. त्या रात्रीं त्यांच्यांतलं कुणीच स्वर्गस्थ झालं नाहीं, पण आतां मला वाटतं त्यांतले बहुतेकजण स्वर्गवासी झाले असावेत." असंच कशाकशाबद्दल बोलत बोलत ते फिरत होते. मोटारींतनं ते नदीकाठानं चालले होते. मग जिथून पोहून परत येतांना पाय दुखावला होता ती जागा सॅम क्लेमेन्सनं दाखवली. तो म्हणाला, "एकदां किनाऱ्याजवळ पोंचलों कीं आपण पाय टेकू असं मला वाटलं. पण पाय टेकवायची मला भीति वाटत होती. जर का पाणी खोल असलं, तर गच्छन्तीच! पण अखेरीस माझ्या गुडघ्याला वाळू लागली अन् मी सरपटत पाण्याबाहेर आलों. परलोकच निमंत्रण अगदीं थोडक्यांत मीं टाळलं ती घटना इथं घडली."

निरोप घेतांना जॉन म्हणाला, "सॅम! बहुधा पृथ्वीच्या पाठीवरची हीच आपली शेवटची भेट ठरेल. परमेश्वर तुला आशीर्वाद देवो. कदाचित् कुठंतरी आपण आपल्या मैत्रीला नवा उजाळा देऊं शकूं."

"जॉन, आजचा हा दिवस माझ्या लेखीं सहस्र डॉलर मोलाचा आहे. एके काळीं आपण भावाभावासारखे वागलों. आणि आजहि आपण तसेच आहोंत असं मला वाटतं. गुडबाय् जॉन, कुठं तरी तुला भेटायचा प्रयत्न मी खात्रीनं करीन."

दुसऱ्या दिवशीं क्लेमेन्स कोलंबियाला रवाना झाला. तिथं तें विद्यापीठ होतं. प्रत्येक स्टेशनवर गाडी येतांच जयजयकार करण्याकरतां अन् गाडी उभी राहतांच त्याला फुलं देण्याकरतां लोकांचा जमाव जमलेला असे. कांहीं ठिकाणीं त्यानं काहीं शब्द बोलण्याचा प्रयत्न केला पण त्याचा आवाज बाहेर फुटला नाहीं. हें सारं टॉम सॉयरच्या अपेक्षेबाहेरचं होतं. दुसऱ्या दिवशीं विद्यापीठात श्रोत्यांनीं गच्च भरलेल्या सभागृहांत त्याला पदवीचा स्वीकार करण्यासाठीं पाचारण करण्यांत आलं तेव्हां आपण भाषण करावं कीं ह्या सन्मानाबद्दल केवळ आभार मानावेत ह्या संशयानं तो क्षणभर थबकला. तेव्हां तिथं जमलेल्या त्या प्रचंड श्रोतृसमुदायान 'मि–सु–री' असं एका विशिष्ट सुरांत एकेक अक्षर थांबून थांबून म्हणत गाऊन दाखवलं. हें गाण संपतांच त्याच्याकडून लोकांची अपेक्षा काय आहे याबद्दल मार्क ट्वेनच्या मनांत कसलीहि शंका राहिली नाहीं. श्रोत्यांना एक व्याख्यान हवं होतं—व्याख्यान—अन् त्यानं एक व्याख्यान त्यांच्यासमोर दिलंहि. तें त्याच्या मृत्यूपर्यंत कुणीहि विसरूं शकलं नाहीं. परत सेंट लुईला आल्यावर तिथल्या बंदरांतल्या 'सेंट लुई' या बोटीचं नांव बदलून 'मार्क ट्वेन' हें नाव ठेवायच्या समारंभाला तो हजर राहिला. या नूतन नामकरणविधीनतर सारे जण त्या बोटीला 'मार्क ट्वेन' म्हणणार होते.

१९.

# एका सुंदर जीवनाची अखेर

रिव्हरडेल इथल्या जीवनाला अत्यंत आनंदानं प्रारंभ झाला. परंतु त्याची अखेर फारच दुःखमय वातावरणांत झाली. ऑगस्टमध्यें मेनमधील यॉर्क हार्बर येथील मुक्कामांत सौ. क्लेमेन्स यांची प्रकृति एकदम बिघडली. अपंगावस्थेंतच त्यांना घरीं आणण्यांत आलं आणि त्या आपल्या खोलींतच अंथरुणाला खिळून राहिल्या. त्यांची प्रकृति बिघडे—आणि असे दिवस वारंवार उजाडत—तेव्हां क्लेमेन्स दुःखी आणि आतुर अंतःकरणानें त्यांच्या खोलीच्या दाराशीं घुटमळे, काय बातमी मिळते याची वाट पाही किंवा क्षणभर आंत जाऊन पत्नीची विचारपूस करायची मुभा मिळेपर्यंत थांबून राही.

दहा वर्षांपूर्वी फ्लॉरेन्स इथं घालविलेल्या हिंवाळ्याची हृद्य स्मृति सौ. क्लेमेन्स यांना सतत येई. आणि आतां जर आपण फ्लॉरेन्स इथं असतों तर आपली प्रकृति पुन्हां सुधारली असती, अशी भावना त्यांनीं व्यक्त केली. त्यांच्या अंगीं प्रवास करण्याइतपत ताकद आली कीं, लगेच त्यांना तिकडे न्यायचं ठरलं. जून-पर्यंत त्यांची प्रकृति बरीच सुधारली, तेव्हां त्यांनीं एल्मिरापर्यंतचा प्रवास केला. तिथल्या टेकडीवरच्या मळ्यांत त्यांची ताकद इतकी वाढली कीं, त्यांची प्रकृति पूर्ण सुधारायची आशा बळावली. त्या उन्हाळ्यांत एल्मिरा इथं मार्क ट्वेननं 'ए डॉग्ज टेल' ही प्राणिहत्येचा निषेध करणारी कारुण्यपूर्ण कथा लिहिली.

आतां युरोपांतलं वास्तव्यच कायमस्वरूपी होणार असं वाटायला लागलं होतं. २४ तारखेला बोटीनं निघून तीं नेपल्स आणि जिनोआ मार्गें फ्लॉरेन्सला येऊन पोंचलीं. शहराबाहेर वॅलॉम्ब्रोसा व चिॲंटी टेकड्यांच्या बाजूला एका प्राचीन उद्यानांत असलेल्या 'व्हिला रिएल डी क्वार्टो' नामक एका सुरेख प्राचीन इटालियन प्रासादांत लौकरच तीं स्थानिक झालीं. तिथं सौ. क्लेमेन्स यांची प्रकृति सुधारली. इतकी कीं, मे महिन्यांत तिथं राहण्यासाठीं एकादं छोटंसं टुमदार घर

विकत मिळतंय् कीं काय याची चौकशी सुरू केली.

सर्व गरजा पुऱ्या होऊं शकतील असं एक छोटंसं घर एक दिवस त्याला आढळलं. अन् हा शोध पेशंटच्या कानावर घालण्यास अत्यंत आतुर होऊन तो मोठ्या उत्साहानं अन् आशेनं घरीं आला. नव्या घराबाबतचे सारे बेत मोठ्या उत्साहानं अन् आतुरतेनं ऐकायला पत्नी तयार असल्याचं त्याला दिसून आलं. रात्रीच्या जेवणाचा तासभर तो तिजपाशींच होता. अन् तीं दोघं अगदीं पूर्वी-सारखीच बोलत होतीं. अखेरीस त्याला जाण्याविषयीं सांगण्यांत आलं. आपण इतका वेळ बसल्याबद्दल त्याला स्वतःचाच राग आला. पण "कांहीं बिघडलं नाहीं" असं म्हणून तिनं त्याचं चुंबन घेतलं. मग विचारलं, "पुन्हां याल?"

"हो. 'गुड नाइट' करायला." तो उत्तरला.—म्हणजे नेहमींप्रमाणें रात्रीं साडेनवाला. त्यावेळीं त्याला क्षणमात्र भेटून निरोप घेऊं देण्याची प्रथा होती.

आपण पुन्हां सुखी होऊं अशी त्याला फार आशा वाटत होती. वरच्या मजल्यावर जाऊन त्यानं पियानो वाजवायला सुरुवात केली. अन् 'स्विंग लो, स्वीट चॅरियट' आणि 'माय् लॉर्ड ही कॉल्स मी' हीं पदं त्यानं म्हटलीं. सौ. क्लेमेन्स यांनीं आपल्या खोलींतून तीं ऐकली. अन् त्या म्हणाल्या, "हीं गाणीं गाऊन ते मला 'गुड नाइट' करीत आहेत." लौकरच संगीत थांबलं. क्षणार्धातच त्यांनीं आपल्याला वर उचलायला सांगितलं. अन् जवळ जवळ त्याच क्षणीं कसलाहि आवाज न करतां कुडींतून प्राण निसटले.

आपल्या नोंदवहींत त्या दिवशीं रात्रीं त्यानं लिहिलं, "बावीस महिन्यांच्या अन्याय्य आणि अनाहूत दुःखानंतर आज रात्रीं सव्वा-नऊ वाजतां माझ्या प्राणांचा प्राण असलेली ती मृत्युरूप शांततेंत विलीन होऊन तिची मुक्तता झाली. प्रथम मीं तिला सदतीस वर्षांपूर्वीं पाहिलं अन् आज तिच्या चेहऱ्याचं मी अखेरचं दर्शन घेतलं...या चौतीस वर्षांच्या वैवाहिक आयुष्यांत लिव्हीचं मन दुखवणाऱ्या ज्या ज्या गोष्टी मीं केल्या, जें जें मी बोललों त्या सर्वांबद्दलच्या तीव्र पश्चात्तापानं माझं अंतःकरण कांठोकांठ भरून आलं होतं." त्यांनीं तिला अमेरिकेला आणलं. आणि ज्या घरांतून, ज्या खोल्यांतून ती नववधू म्हणून बाहेर पडली तिथूनच त्यांनीं तिला उचललं आणि सुसी व छोटा लँग्डन यांच्या शेजारीं तिची पेटी पुरली.

मॅसॅच्युसेट्समधल्या टायरिंग हॅम इथल्या एका छोट्या झोपडींत सॅम्युएल क्लेमेन्स आणि त्याच्या मुली यांनीं आपल्या भवितव्याची योजना आंखण्याचा प्रयत्न केला. सौ. क्लेमेन्स ही सदैव त्यांची मार्गदर्शक शक्ति असे. आतां

तिच्याविना त्यांना चुकल्या-चुकल्यासारखं झालं. अखेरीस त्यांनीं न्यूयॉर्क सिटींतल्या क्रमांक २१, फिफ्थ ॲव्हेन्यूवरचं एक घर घेऊन तिथं स्थायिक होण्याचा पुन्हां एकदां प्रयत्न केला. तें घर आंतून-बाहेरून अतिशय सुरेख होतं—पूजनीय लेखक आणि तपस्वी अशा मार्क ट्वेनला साजेसं असंच होतं तें. पण त्यांत त्याला एकाकीपणा वाटे. अंतःकरणापर्यंत पोचेलसं सुख तिथं नव्हतं. लौकरच त्यानं एक 'एओलियन' वाद्यवृंद नियुक्त केला.—त्याच्या विविध मनोविकारांनुसार संगीताचा आस्वाद घेतां यावा म्हणून ही योजना होती. त्या हिंवाळ्यांत अगदीं क्वचितच तो बाहेर जाई. अगदीं जुन्या अन् निकटच्या मित्रांना तो भेटे. त्यानं जें कांहीं लिखाण केलं तें गंभीर विषयावरच होतं अन् त्यांतून तो विविध स्वरूपांतील अन्याय आणि दडपणूक याचा निषेध करी.

पुन्हां उन्हाळा सुरू झाल्यावर न्यू हॅम्पशायरमधील डब्लिन येथील मोनाडनॉक उतरणीवरील त्या सुंदर घरांत त्याला पुनश्च पूर्वींसारखी लेखनस्फूर्ति आल्यासारखी दिसते. 'ए हॉर्सेस टेल' ही कारुण्यपूर्ण कथा त्यानं लिहिली. 'ईव्हज् डायरी' हि त्यानं लिहिली. तिच्यांतल्या वरवरच्या विनोदाला नाजुकतेचं अस्तर आहे. 'थ्री थाउजंड यीअर्स अमंग दि मायक्रोब्स' ह्या आत्यंतिक स्वप्नरंजित कथेच्या लिखाणालाहि त्यानं प्रारंभ केला. ह्या उपहासात्मक कथेंत त्यानं गलिव्हरवरहि मात केली आहे. ती त्यानं पुरी केलीच नाहीं. कारण तिच्यांतल्या उपकथांनीं आश्चर्यकारक वळणं घेतली अन् अखेर कशाचाच कशाशीं संबंध लागेना. ती कथा जनमनाची पकड घेऊं शकली नाहीं.

एकामागून एक जुने मित्र इहलोक सोडून चालले होते आणि मार्क ट्वेनला अधिकाधिक एकाकी वाटूं लागलं. त्यानं लिहून ठेवलंय्: "या मिरवणुकींतला मी ज्या भागांत आहें तो भाग पुढं सरकायला आतां फारच थोडा अवकाश उरलाय्." खरोखरच जुन्या सहकाऱ्यांपैकीं बहुतेकजण एव्हांना परलोकवासी झाले होते. कॅलिफोर्नियांतील एका समारंभाचं निमंत्रण सॅनफ्रॅन्सिस्कोहून आलं तेव्हां त्यानं कळवलं, "भटकण्याचे माझे दिवस संपले असून आयुष्यांतले उरलेले दिवस शेकोटीपाशीं बसून विश्रांति घ्यायचा माझा मानस आहे." दुसऱ्या एका पत्रांत त्यानं लिहिलं, "सॅनफ्रॅन्सिस्कोच्या जुन्या नागरिकांपैकीं दुसऱ्या कुणापेक्षांहि त्या शहरासाठीं मीं अधिक केलंय्. मीं तें शहर सोडल्यापासून तिथली लोकसंख्या चांगली तीन लाखांपर्यंत वाढली आहे. मी अधिक कांहीं करूं शकलों असतों. —म्हणजेच मी थोडं अगोदरच निघून जायला हवं होतं—असा त्याचा अर्थ."

△ △ △

२०.

# सत्तरावा वाढदिवस : ट्वेन आणि पेन

मार्क ट्वेन सत्तरी गांठण्याच्या बेतांत होता. ३० नोव्हेंबर १९०५ रोजीं तो ही शास्त्रोक्त मर्यादा गांठीत होता. हार्पर पब्लिशिंग हाउसचे अध्यक्ष कर्नल जॉर्ज हार्वे यांनीं या निमित्तानें मार्क ट्वेनला एक मोठी मेजवानी देण्याचं योजिलं. एकाद्या छोट्या, सोयीच्या ठिकाणीं त्याच्या अगदीं जुन्या आणि निकटच्या मित्रच्या मेळाव्यांत हा समारंभ होणं क्लेमेन्सला अधिक आवडलं असतं. पण कर्नल हार्वे यांचं मत निराळं होतं. यापूर्वी भरलेल्या कोणत्याहि वाङ्मयीन मेळाव्यावर ह्या मेळाव्यानं मात करायला हवी असं त्यांना वाटे. थँक्सगिव्हिंग्ज हॉलिडेमुळें बाध यायला नको म्हणून ५ डिसेंबर हा दिवस मुक्रर करण्यांत आला.

त्या दिवशीं सायंकाळीं डेल्मोनिकोच्या भव्य 'बॅंक्वेट-हॉल' मध्यें दोनशें अमेरिकन आणि इंग्लिश स्त्रीपुरुष वाङ्मयसेवक आपल्यांतील श्रेष्ठ वाङ्मयो-पासकाच्या सत्कारार्थ जमले. विल्यम डीन हॉवेल्स यांनीं नजराणा भेट दिल्यानंतर यथावकाश मार्क ट्वेन भाषणास उठला. त्याच क्षणीं तो बुद्धिमंतांचा मेळावा उठून उभा राहिला. जयजयकाराची प्रचंड लाट उठली अन् वर फडफडते शुभ्र हातरुमाल उफाळत्या फेंसासारखे दिसूं लागले. त्या रात्रीं केलं एवढं सर्वांग-परिपूर्ण भाषण मार्क ट्वेननं कधींच केलं नव्हतं. प्रारंभापासूनच त्यानं सुरुवात केली, ज्या छोटया झोपडींत त्याचा जन्म झाला तिथं कसकशा उणिवा होत्या तें सागून त्यानं आपल्या आयुष्यांतील संवयी सांगितल्या. त्यानं सत्तरी गांठतांना जीवनाच्या ज्या योजना आंखल्या त्यांच्या ओझ्याखाली दुसरा एकादा खलास कसा झाला असता, अन् तसं पाहिलं तर मोलाच्या अशा कोणत्याच संवयी नसल्याचंहि त्यानं सांगितलं. आणि मग अखेरीस त्यानं तो अविस्मरणीय समारोप केला : "वयाची सत्तरी! ही शास्त्रोक्त मर्यादा आहे. यानंतर

सक्रिय अशा कर्तव्याची तुमच्याकडनं अपेक्षा नसते. काबाडकष्टाचं आयुष्य समाप्त झालेलं असतं......तुम्ही या प्रजासत्ताकाचे सन्माननीय सदस्य झालेले असतां. तुमची मुक्तता झालेली असते, कसलीहि सक्ति तुमच्यावर नसते. कुठलाहि शंखनाद तुम्हांला बोलावूं शकत नाहीं. फक्त 'खेळ खलास' असा फलक आला तरच जायचं. तुम्हांला वाटलंच तर मुदतीबाहेर गेलेलीं कर्तव्याचीं बिलं तुम्ही चुकतीं करूं शकतां किंवा तीं न द्यायचंहि तुम्हीं ठरवलं तरी कुणीहि तुम्हांला जाब विचारूं शकत नाहीं, कारण कायदेशीरदृष्ट्या तीं वसूल करण्याजोगीं नसतातच. भेटीची वेळ आगाऊ दिलेली आहे हा दावा गेली चाळीस वर्षं तुम्हांला सतत टोंचणी देत आलेला असतो पण आतां तुम्ही तें कायमचं बाजूला सारूं शकतां. चिरनिद्रेच्या इतकं नजीक येऊन ठेपलं असतांना तुम्हांला पुन्हां कधींच त्याची गरज पडणार नसते. रात्र झाली आहे, हिंवाळा आला आहे, मेजवानीहून—तिथल्या रोषणाईतून आणि हास्यकल्लोळांतून—घरीं यायला उशीर झाला आहे म्हणून तुम्ही चपापूं लागलां अन् निर्जन रस्त्यांतून वाट काढीत असलां, तरी गेलीं कित्येक वर्षे जसं तुम्हांला वाटत असे कीं, आतां आपले मित्र झोपले असतील, आपण यत्किंचितहि आवाज न करतां घरांत शिरलं पाहिजे—तसं आतां तुम्हांला वाटण्याचं कांहींच कारण नाहीं. तुम्ही कधींहि त्यांचा शांतताभंग करूं शकणार नाहीं याचीच तुम्हांला आठवण होईल. ह्या गोष्टींच्या आठवणीनं तुम्ही चपापलांत तर तुम्ही एवढं उत्तर दिलं तरी बस्स :—'तुमच्या निमंत्रणामुळें माझा सन्मान झाला, मला आनंद झाला, कारण अद्याप तुम्ही माझी स्मृति बाळगून आहांत.—पण मीं सत्तरी गांठली आहे, सत्तरी. शेकोटीच्या कोपऱ्यांत मी सुखानं चिकटून बसेन. पाइप ओढीन, माझीं पुस्तकं वाचीन, विश्रांति घेईन; तुम्हा सर्वांचं प्रेमानं शुभचिंतन करीत बसेन. यथाक्रम तुमचं जहाज जेव्हां सत्तरीच्या धक्क्याला लागेल तेव्हां तुमच्यासाठीं थांबलेल्या बोटीवर तुम्ही शांत चित्तानं पाऊल ठेवा आणि मावळत्या सूर्याच्या दिशेनं संतुष्ट अंतःकरणानं मार्गक्रमण करूं लागा."

इतका वेळ आवरून धरलेल्या अश्रूंना यापुढें अडवणं शक्य नव्हतं. सारी लाजलज्जा बाजूस ठेवून तिथं जमलेल्यांपैकीं ज्यांनीं आपले अश्रु वाहूं दिले नसतील, हुंदक्यांमुळें दबलेल्या आवाजांतहि ज्यांनीं जयजयकाराच्या गर्जना केल्या नसतील त्यांना नंतर तसं सांगण्याची सोय नव्हती. त्याच्या जुन्या मित्रांपैकीं एकामागून एक उठले—केबल, कार्नेजी, गिल्डर प्रभृति—सर्वांनींच आपलं त्याच्याविषयींचं प्रेम व्यक्त केलं. श्री. रॉजर्स बोलले नाहींत, रेव्हरेंड ट्विचेलदेखील. पण

ते त्याच्या खास टेबलापाशीं बसून होते. आल्ड्रिच् तिथं येऊं शकले नाहींत पण त्यांनीं पत्र पाठवलं. आल्फ्रेड ऑस्टिन, बॅरी, चेस्टरटन, डॉब्सन, डॉयल, हार्डी, किपलिंग, लँग प्रभृति इंग्लिश लेखकांनीं मिळून एक अभिनंदनपर केबल पाठवली.

१९०६ च्या प्रारंभीं—म्हणजे सत्तराव्या वाढदिवसानिमित्त देण्यांत आलेल्या मेजवानीनंतर सुमारें महिनाभरानें प्रस्तुत लेखकाचा मार्क ट्वेनशीं दृढ परिचय झाला. तसा मी पूर्वीं त्यांना भेटलों होतों. मीं एकादं पुस्तक लिहिलं आणि त्यांना पाठवलं कीं, वेळोवेळीं ते माझा प्रेमळ समाचार घेत असत. एकदां तर थॉमस नास्ट या थोर व्यंगचित्रकाराचं चरित्र मी लिहीत होतों तेव्हा मार्क ट्वेन यांनीं लिहिलेल्या कांहीं पत्रांचा वापर त्या पुस्तकांत करण्यास त्यांनीं परवानगीहि दिली. सत्तराव्या वाढदिवसानिमित्त झालेल्या त्या मेजवानीच्या पूर्वी कांहीं क्षण मी आणि मार्क ट्वेन दोघंच एकत्र आलों होतों. त्यावेळीं त्या पत्रांचा उपयोग करूं दिल्या-बद्दल मीं आठवणीनं त्यांचे आभार मानले.

प्लेअर्स क्लबाचं सन्माननीय सदस्यत्व मार्क ट्वेन यांना बहाल करण्याच्या निमित्तानं त्या क्लबनं दिलेल्या छोट्या खासगी मेजवानीच्या प्रसंगीं हजर राहण्याचं निमंत्रण मला मिळालं होतं. तत्पूर्वीं एक-दोन दिवस मी त्या क्लबांत गेलों असतां ‘दि नॉर्थ अमेरिकन रिव्ह्यू’चे डेव्हिड मनरो मला अतिशय आनंदांत दिसले. त्यांना मला कांहींतरी सांगायची तीव्र उत्सुकता होती हें त्यांच्या उजळलेल्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होतं. त्यांनीं सांगितलं कीं, मेजवानीच्या प्रसंगीं मार्क ट्वेन यांची प्रास्ताविक ओळख करून देण्याची कामगिरी त्यांच्याकडे आली होती. रात्रीं बिछान्यांत रेलून त्यांनीं माझं थॉमस नास्ट यांच्यावरचं पुस्तक वाचून काढलं होतं. डेव्हिड यांचं अंतःकरण थोर असल्यामुळेंच मार्क ट्वेन माझ्या त्या पुस्तकाबद्दल बोलले असावेत असा मला संशय आहे. त्यांच्या उद्गारांची पुनरुक्ति डेव्हिड यांनीं उत्सुकतेनं केली. दुसऱ्यांना सुख देण्यांत सदैव आनंद मानणाऱ्या मनरोंनीं त्या दिवशीं सायंकाळीं अनेकांपाशीं अशी पुनरुक्ति केली.—नव्हे, त्यांत आणखी पदरची भरहि घातली.

३ जानेवारी १९०६ रोजीं सायंकाळीं मार्क ट्वेन यांना ती मेजवानी देण्यांत आली. त्या प्रसंगाचं चित्र माझ्या डोळ्यापुढं अद्याप ताजं आहे. खासगी भोजन-गृहांतील एका टेबलाभोंवतीं जमलेल्या पाहुण्यांची संख्या कांहीं पंचविसाहून अधिक नसावी. योगायोग असा कीं, त्या दिवशींच्या प्रमुख पाहुण्यांच्या नेमकी समोरची खुर्ची मला मिळाली होती. आच्छादित मेणबत्त्यांच्या मंद प्रकाशांत त्यांची उजळलेली मूर्ति विशेषच सुंदर दिसत होती. ती पाहून माझ्या अंतःकरणांत

भूतकाळांतल्या स्मृति उचंबळून आल्यानं त्यांच्यावरून माझी नजर मी काढूं शकत नव्हतों. माझ्या शेजारींच बसलेले चार्लस् हार्वे जीनंग यांना हळूच मीं म्हटलं, "वाङ्मय आणि जीवन या दोन्ही क्षेत्रांत मला मार्क ट्वेन यांच्याविषयीं जेवढा आदर वाटतो तेवढा दुसऱ्या कुणाहिविषयीं वाटत नाहीं. अन् आतां एका टेबलाशीं ते माझ्यासमोर बसले आहेत."

जीनंग म्हणाले, "तुम्ही चरित्र लिहा ना त्यांचं." कुणीतरी अधिक निकटचा, प्रदीर्घ काळाचा अन् व्यापक अनुभवाचा मित्र या कामासाठीं खात्रीनं निवडलेला असेल, असं सांगून मीं त्यांची सूचना बाजूस सारली. मग भाषणं सुरू झालीं अन् ती गोष्ट माझ्याहि मनांतून निघून गेली. थोड्या वेळानंतर मी मार्क ट्वेन यांच्यापाशीं 'जोन ऑफ् आर्क' बद्दल थोडंसं बोलूं शकलो. तें पुस्तक मीं नुकतंच पुन्हां वाचलं होतं. त्यांनीं मग मला तो जुना प्रसंग सांगितला—जोनच्या चरित्राचं एक पान वाऱ्यावर उडत कसं आलं अन् त्यायोगें आपल्याला वाङ्मयाची गोडी कशी लागली हें सारं सांगितलं—तें ऐकून मला मनस्वी आनंद झाला. त्यांनीं कदाचित् उत्स्फूर्त उत्साहाच्या भरांत तें सांगितलं असेल, कदाचित् जोन ऑफ् आर्कचं नांव काढतांच चटकन् प्रज्वलित झालेल्या कृपेच्या पोटीं ते बोलून गेले असतील, कांहींहि. त्या क्षणीं निरोप घेतांना त्यामुळें मी आणखी बोलून गेलों, "मिस्टर क्लेमेन्स, पुन्हां कधींतरी एखाद्या दिवशीं मी आपल्याला भेटायला येऊं का?" आणि कसं तें मला आजवर समजलेलं नाहीं पण ते चटकन् उत्तरले, "हो, या कीं! लौकरच!"

दोन दिवसांनीं त्यांच्या चिटणिसांकडून भेटीची वेळ ठरवून घेऊन मी २१ फिफ्थ ॲव्हेन्यूवर येऊन पोंचलों अन् ते बोलावतील म्हणून वाट पाहत वाचनालयांत बसून राहिलों. थोड्याच वेळांत मी पायऱ्या चढूं लागलों तेव्हां माझ्या मनांत विचार आला, या निष्फळ कामासाठीं आपण आलों तरी कशाला? आतां आलोच आहोंत तर कांहींतरी सबब सांगतां येईल कीं काय याचाहि मी शोध करूं लागलों. बिछान्यांत रेलून ते 'हकलबेरी फिन'च्यीं पानं चाळीत होते. कुणींतरी अनोळखी पत्रलेखकानं विचारलेला परिच्छेद शोधीत होते ते. मजकडे चिरूट सरकवून त्या पत्रलेखकाबद्दल अन् सर्वसाधारण पत्रलेखनाविषयीं त्यांनीं गमतीचे उद्गार काढले. हळू हळू संभाषणांत शैथिल्य आलं तेव्हां मीं त्यांना त्यांच्या लिखाणाबद्दल आपल्याला किती आदर वाटतो तें सांगितलं—यापूर्वी सहस्रावधि लोकांनीं जसं सांगितलं असेल तसंच. मीं लौकरच विषय बदलावा आणि डेव्हिड मनरो यांनीं शब्द खर्च केल्याबद्दल आभार मानावेत अशीच त्यांची इच्छा असणं

सहज शक्य होतं. त्यांची टीका कांहीं मला आठवत नाहीं पण मी चटकन् बोलून गेलों, 'त्यांच्या प्रोत्साहनामुळें मला आशा वाटूं लागली आहे (अगदीं अत्यल्प प्रमाणांत कां होईना) कीं, एक दिवस मी आपलं चरित्र लिहिण्याचं काम हातीं घेऊं शकेन.' इथं माझं संपलं अशी माझी कल्पना होती. त्यांचं मौन मला प्रदीर्घ अन् अशुभसूचक वाटलं.

अखेरीस ते म्हणाले, "वेळोवेळीं माझ्या चरित्रांतली प्रकरणं मीं स्वतःच लिहून काढलीं आहेत. पण नेहमीं त्या कामाचा कंटाळा येई म्हणून मी तें बाजूला सारीं." मला वाटतं, त्यांनीं आणखी एकदोन विधानें केली अन् मग मजकडे वळून, आपले ते निळसर भेदक डोळे मजवर रोखून ते एकदम म्हणाले, "मग केव्हां करतां सुरुवात?" खोलीच्या टोकाला ड्रेसिंग टेबलाचा भला मोठा आरसा होता. माझं प्रतिबिंब त्यांत मला स्वच्छ दिसत होतं. मनांतल्या मनांत मीं त्या प्रतिबिंबाला म्हटल्याचं मला स्पष्ट आठवतं, "हें खरं नाहीं. असल्या अनेक स्वप्नांपैकींच हेंहि एक स्वप्नच आहे." पण स्वप्नांत झालं तरी माणसालादेखील उत्तर हें द्यावंच लागतं. अन् मींहि म्हटलं, "तुम्ही म्हणाल तेव्हां. मी आतादेखील सुरुवात करूं शकतों." कोणतंहि नवं काम हातीं घ्यायला ते नेहमीं उत्सुक असत. ते म्हणाले, "तर मग जितकं लौकर तितकं चांगलं. उत्साह वाटतो आहे तोंवरच कामाला प्रारंभ करूं या. असल्या प्रकारचं काम तुम्ही जेवढं पुढं ढकलाल, तेवढं तें पुरं होण्याची शक्यता कमी." ही शनिवारची गोष्ट. मंगळवार—ता. ९ जानेवारी—चालेल का असं मीं विचारलं. त्या दिवशीं चालेल असं सांगून त्यांनीं माझ्या कामाच्या योजनेची चौकशी केली. मीं असं सुचवलं कीं, 'त्यांनीं जसं आठवेल तसं चरित्र सांगावं, तें लिहून घ्यायला मीं एक लघुलिपीलेखक आणावा. अन् ह्याला पूरक म्हणून पत्रें, नियतकालिकें सारींच उपयोगीं पडतील.'

ते म्हणाले, "मी लघुलिपीलेखकाला मजकूर सांगेन त्यावेळीं कुणीतरी श्रोता असावा, मध्येंच सांखळी जोडून देणारं कुणीतरी मागं असावं, असं मला वाटतं. ह्याला लागून असलेली खोली माझी अभ्यासिका म्हणूनच तयार करण्यांत आलेली आहे. तिथं पोटमाळ्यावर एक दोन ट्रंका भरून माझीं पत्रं, खासगी पुस्तकं, माझं हस्तलिखित अन् असलंच सारं साहित्य आहे. ती खोली मी स्वतः क्वचितच वापरतों. माझं सारं लिखाण अन् वाचन बिछान्यांतच चालतं. ह्या कामासाठीं ती खोली मी तुमच्या स्वाधीन करीन. तुम्हांला ज्या ज्या गोष्टींची गरज लागेल तें तें सारं तुम्हांला तिथं आणून दिलं जाईल. इथं आपण सकाळच्या

वेळीं मजकूर सांगत जाऊं. दिवसाचा उरलेला वेळ तुम्ही तुमच्या मनाला वाटेल तसा कामीं लावा. किल्ली तुमच्यापाशींच असूं द्या. तुम्हांला हवं तेव्हां येतां जातां येईल." त्यांची कामाची पद्धत सदैव अशीच असे. अर्धवट असं ते कधींच कांहींहि करीत नसत. त्यांनीं उठून मला आपली सर्व सुखसोयींनीं युक्त अशी अभ्यासिका दाखवली. तींत विखुरलेली सामग्री अस्ताव्यस्त पण अमोल होती.

मंगळवार ता. ९ जानेवारी १९०६ रोजीं एका लायक लघुलिपीलेखकाला बरोबर घेऊन मी हजर झालो. दरम्यान, क्लेमेन्स यांच्या मनांत एक नवीच कल्पना उद्भवली. ते म्हणाले, "पूर्वी सुरू केलेल्या आत्मचरित्राचं लिखाण पुढं चालू करण्यासाठीं मी मजकूर सांगेन. हें आत्मचरित्र पुरं झालं कीं, बाजूला ठेवून देण्यांत येईल. शंभर वर्षें तें अप्रकाशित राहील. लघुलिपीलेखकाचा मेहनताना मी देईन अन् त्या टिप्पणी माझ्या मालकीच्या होतील." अर्थात् त्यांचा उपयोग मीं लिहायला घेतलेल्या चरित्रासाठीं करूं द्यायची मुभा त्यांनीं दिली. कालानुक्रमे आपण आपली जीवनकथा सांगूं शकूं असा विश्वास त्यांना वाटत नव्हता. स्मृति अगर लहर यानुसार इकडे तिकडे भटकल्यानंतर मूळ कथेचा धागा पुन्हां पकडावा लागेल असं त्यांना वाटलं. मीं विषय सुचवून प्रश्न विचारावेत असं त्यांनीं सुचवलं. मी या सगळ्या गोष्टी कबूल केल्या अन् लागलीच कामाला लागलों.

त्या दिवशीं सकाळीं त्यांनीं कॉमस्टॉक खाणीच्या कांहीं आठवणी सांगितल्या. मग ते एकदम मागं बालपणाकडे वळले. अखेरीस अगदीं अलिकडील कांहीं गोष्टींवर त्यांनीं टीका केली. तें सारंच कमालीचं सुखद होतं—हेल काढीत संथपणें बोलण्याची त्यांची ती वैशिष्टयपूर्ण शैली, त्यांच्या नाजुक हातांच्या नकळत होणाऱ्या हालचाली, शब्दसमूह आणि कल्पना त्यांच्या मनांत उद्भवत, स्वीकारल्या जात अगर बाजूला ठेवल्या जात असतांना त्यांच्या चेहऱ्यावर दिसणारे फेरबदल! आपल्या कालखंडांतील एका महान् वाङ्मयोपासकाचं प्रत्यक्ष रचनेचं कार्य चालू असतांना आम्ही त्यांच्याकडे पाहत होतों. वेळेचा प्रश्नच नव्हता. अखेरीस त्यांनीं काम संपवलं तेव्हां दोन तास कुठल्या कुठं निघून गेल्याचं पाहून आम्हांला अतिशय आश्चर्य वाटलं. ते म्हणाले, "अन् मलाहि ह्या कामानं अतिशय आनंद झाला. अशा प्रकारच्या कामाची हीच आदर्श योजना आहे. आपल्या घरांतलं जेवायचं टेबल हें माणसाचं नेहमींचं स्फूर्तिस्थान असतं अन् लघुलिपीलेखकाला मजकूर सांगतांना अगदीं घरांतल्या जेवणाच्या टेबलाशीं बसून बोलल्यासारखं वाटतं. तुमच्यासारखीं चांगलीं माणसं इथं येऊन ऐकायला

तयार असलीं तर उरलेलं सारं आयुष्य मी असाच मजकूर सांगण्यांत घालवावं म्हणतों."

अशा रीतीनं मजकूर सांगायचं काम सुरू झालं तें आठवडे न् आठवडे चाललं. ते कशाबद्दल बोलणार आहेत तें आम्हांला कधींच ठाऊक नसे. बोलण्यास सुरुवात करीपर्यंत त्यांना स्वतःलाहि तें क्वचितच ठाऊक असे. पण त्यांचं बोलणं नेहमींच कमालीचं आकर्षक असे. जगांतल्या सर्व चरित्रलेखकांत मी स्वतःला सुदैवी समजतों. अर्थात् तें सारंच काम कांहीं सुतासारखं सरळ नव्हतं. हळूहळू माझ्या ध्यानांत आलं कीं, त्यांनीं मजकूर सांगून तयार होत असलेलीं हीं सुरेख प्रकरणं इतिहासाशीं पूर्णतया सुसंगत नसत. उलट अनेकदां अंशतः अथवा पूर्णतः काल्पनिक असत. टॉम सॉयर आणि हक् फिन्चा जनक जुन्या घटनांवर भरतकाम करीत होता अथवा इतिहासाशीं सुसंबद्ध होऊं शकणार नाहींत अशा नव्या घटनाहि हुडकून काढीत होता. व्यक्तिगत घटनांबाबतची त्यांची स्मृतीहि बिनचूक राहिलेली नव्हती. ही गोष्ट त्यांच्याहि ध्यानांत आली होती. अन् नेहमींच्या लहरी, सौम्य पद्धतीनं ते एकदां म्हणालेहि होते, "मी तरुण होतों तेव्हां एकादी घटना घडो किंवा न घडो ती माझ्या लक्षांत राहत असे, पण मी आतां म्हातारा होत चाललोंय्, अन् लौकरच, न घडलेल्या तेवढ्याच घटना माझ्या लक्षांत राहतील." तरीहि सदैव वस्तुस्थितीला धरून बोलण्याचा त्यांचा मानस असे आणि विशेष म्हणजे आपण स्वतः होतों त्याहून अधिक चांगले होतों असं भासवायचा प्रयत्न त्यांनीं कधींहि केला नाहीं.

मजकूर सांगण्याचा तो कार्यक्रम खरोखर अमोल होता. कारण दुसऱ्या कशानंहि जे स्वभावविशेष ध्यानांत आले नसते ते त्यानं स्पष्ट दिसून आले. इतिहासांतील सामग्रीबाबत मात्र त्यांचा मजकूर शेजारच्या खोलींतील पत्रें, नोंदवह्या, करारपत्रें वगैरेंच्या कसोटीला उतरत नसे. या साऱ्या सामग्रीच्या मदतीनें मीं हळूहळू अनेक वर्षांच्या ह्या वस्तूची पुनर्रचना करण्यास सुरुवात केली होती. मजकूर सांगण्याचं काम संपल्यावर लघुलिपीलेखक निघून जाई अन् मग आमचं दोघांचं जें संभाषण होई त्यांतून मला कितीतरी मोलाची सामग्री मिळे. प्रारंभीं मीं योजल्या होत्या त्या चौकशा अशा वेळीं मी करीत असें. अन् त्यांचीं उत्तरं चटकन्, विचार न करतां येत असल्यामुळें त्यांत कल्पनाशक्तीला मुळींच वाव मिळत नसे. कधीं कधीं ते एकाद्या विशिष्ट मुद्द्यावर खास प्रवचन करीत येरझारा घालूं लागत, आपलं तत्त्वज्ञान सांगत अन् सर्व-साधारण शेरे मारीत. त्यांची ही पद्धति नेहमींच मानवजातीला आणि तिच्या

प्रगतीला उपकारक असे असं नाहीं. मजकूर सांगतांना कधीं आपल्या हातून पुनरुक्ति झाली, विसंगति आली किंवा मला ठाऊक असलेल्या सत्य घटनेचा विपर्यास होत असला तर थांबवीत जा, असं त्यांनीं मला सांगून ठेवलं असूनहि त्यांचं बोलणं चालू असतांना मीं त्यांना कधींहि प्रश्न विचारला नाहीं.

तत्क्षणींच चूक दाखवून देण्याचं धैर्य प्रारंभीं मला होत नसे. त्यांचं बोलणं संपल्यावर सावधानतेनं मी ती गोष्ट त्यांच्या नजरेस आणून देई. मग ते बहुधा म्हणत, "त्याच वेळीं कां नाहीं थांबवलंत मला? वेळींच तुम्ही मला वांचवूं शकत असतांना मला पुढचा गाढवपणा कशाला करूं दिलात?" मग पुढें मी स्वतःवर वीज कोसळण्याचाहि धोका पत्करून बहुधा त्यांना अगदीं योग्य वेळीं अडवीत असें. पण अशानं त्यांचे विचार विस्कळित झाले कीं, मग वादळी गडगडाट हमखास होई. ते म्हणत, "माझ्या डोक्यांतलं सारं कांहीं तुम्हीं पार बाहेर घालवून दिलंत." मग मला अर्थातच वाईट वाटे आणि मी दिलगिरी व्यक्त करीं. मग क्षणार्धांतच आकाश पुनश्च निरभ्र होई. विषय कोणताहि असला तरी सर्वसाधारणतः मजकूर सागण्याचा त्यांचा ढंग सदैव विनोदी असे. विनोद हा त्यांचा प्राणवायु होता—त्याचा अभाव अगदीं क्वचित् दिसे.

सत्तराव्या वाढदिवसानिमित्त दिलेल्या मेजवानीनंतर मार्क ट्वेन पुनश्च 'न्यूयॉर्कमधील सर्वांत देखणी स्त्री' होऊन राहिले अन् पूर्वीपेक्षांहि अधिक भव्य प्रमाणांत! 'ईव्हिनिंग मेल' च्या अग्रलेखांत त्यांचा 'ह्या अमेरिकन शहराचे ते ॲरिस्टायडिस, सोलोन आणि थेमिस्टॉक्लिस आहेत' असा उल्लेख करण्यांत आला होता अन् पुढें म्हटलं होतं, "आतां अशी परिस्थिति निर्माण झाली आहे कीं, एकाद्या जाहीर सभेंत अगर मेजवानीच्या प्रसंगीं मार्क ट्वेन उपस्थित नसले तर ते निदान आपल्या अद्वितीय शैलींत पत्र पाठवून सल्ला आणि प्रोत्साहन देऊन ह्याची भरपाई करतील अशी सर्वांची अपेक्षा असते." यांतल्या आनंदोर्मींची जाणीव त्यांना अतिशय आवडे. आतां त्यांना त्याचा त्रास वाटत नसे. बाहेर पडून एकाद्या मेळाव्यांत अगर मेजवानीच्या प्रसंगीं त्यांनीं भाषण केलं नाहीं अशी सायंकाळ क्वचितच दिसे. एप्रिल महिन्यांत रॉबर्ट फुल्टन सोसायटीला मदत म्हणून त्यांनीं निरोपादाखल व्याख्यान दिलं. ते म्हणाले, "हें माझं अखेरचं व्याख्यान. तें ऐकायला लोकांनीं पैसे दिले पाहिजेत." हें व्याख्यान कार्नेजी हॉलमध्यें झालं. त्यावेळीं सारं सभागृह चिक्कार भरून गेलं होतं.

मे महिन्यांत मजकूर सांगण्याचं तें काम न्यू हॅम्पशायरमधील डब्लिन इथें पुढें चालू करण्यांत आलं. मोनाडनॉक उतरणीवरील अप्टन हाउसमधल्या लांब-

लचक व्हरांड्यांत तें चाले. आमचं काम असंच पुढं चालू ठेवण्याची इच्छा त्यांनीं व्यक्त केली. म्हणून मी आणि तो लघुलिपीलेखक लौकरच त्या खेड्यांत राहायला गेलों. रोज सकाळीं मोटारीनं त्यांच्या निवासस्थानीं जाऊन न्यू इंग्लंडमधल्या दुर्मिळ अशा सुंदर नैसर्गिक दृश्याकडे आम्ही पाहत बसलों असतांना ते जसं आठवेल आणि कल्पनेंत येईल तसं बोलत असत.

तो लांबलचक व्हरांडा नमुनेदार होता. आम्ही तिथं जाऊन पोंचण्यापूर्वींच ते तयार असत. आकाश आणि जंगल, निळसर सरोवर आणि दूरवरच्या टेकड्या यांच्या पार्श्वभूमीवर शुभ्र फ्लॅनेलमधली त्यांची प्रकाशमान मूर्ति इकडून तिकडे येरझारा घालतांना आम्हांला दिसे. मजकूर सांगण्याचं काम संपलं कीं वाद्यवृंद-संगीत सुरू करायला ते आपल्या चिटणिसांना सांगत. खूपसा खर्च करून तो सारा वाद्यवृंद न्यूयॉर्कहून इथपर्यंत आणला होता. डब्लिनमध्यें सामाजिक समारंभ बरेच असत. पण मजकूर सागण्याच्या ह्या कार्यक्रमांत क्वचित्‌च खंड पडे. वारंवार त्यांना एकाकीपणाची जाणीव होई. अन् मधूनच ते थोड्या दिवसांसाठीं न्यूयॉर्कला जाऊन येत किंवा फेअर हॅवन इथं जाऊन श्री. रॉजर्स यांना भेटून येत. पण ते परत येत ते आनंदित होऊन. कारण शांतता आणि विश्रांति त्यांना आवडे. अन् हें मजकूर सांगण्याचं काम म्हणजे त्यांची नोकरी होऊन बसली होती.

आपल्या मृत्यूनंतर शंभर वर्षें उलटून जाईपर्यंत आपलं कोणतंहि आत्मचरित्र प्रसिद्ध करायचं नाहीं असा त्यांचा निश्चय असूनहि त्यांतलीं कांहीं प्रकरणं 'दि नॉर्थ अमेरिकन रिव्ह्यू' मध्यें प्रसिद्ध करण्यासंबंधीं त्यांचं मन वळविण्यांत आलं. त्याचा मोबदला म्हणून जे तीस हजार डॉलर मिळणार होते त्या रकमेंत त्यांनीं स्वतःचं घर बांधण्याचा मानस जाहीर केला. कनेक्टिकटमधील रेडिंग येथें माझ्या खेड्याजवळच त्यासाठीं अगोदरच जमीन विकत घेऊन ठेवलेली होती. ते म्हणत, "दरसाल उन्हाळ्यांत जातां येईल असं एकादं निश्चित ठिकाण हवं." त्याला 'आत्मचरित्र-गृह' असं नांव द्यायचा त्याचा बेत होता.

❦ ❦ ❦

२१.

# मार्क ट्वेन यांच्या संगतींत

न्यूयॉर्कला परतल्यावर मार्क ट्वेन यांच्याशीं माझ्या निकटच्या साहचर्याचा कालखंड सुरू झाला. त्याचं असं झालं :—मार्क ट्वेन यांचं बिलियर्डचं प्रेम कधींच कमी झालं नाहीं. पंधरा वर्षांपूर्वीं हार्टफर्ड इथं त्यांच्या मालकीचं जसं टेबल होतं तसं पुन्हां कुठंच जमलं नव्हतं. नाताळानिमित्त त्यांना तसं एक टेबल घेऊन देण्याचा श्रीमती हेन्री रॉजर्स यांचा मानस होता. पण मार्क ट्वेन यांना एकाद्या मुलासारखी घाई झाली होती. ते थांबेनात. आतांच्या आतां आपल्याला टेबल मिळालं तर आपण लगेच त्याचा उपयोग करूं असं त्यानं सूचित केलं. टेबल आलं. फारच सुंदर होतं तें. सर्व प्रकारच्या खेळांना योग्य असंच होतं तें. चांगलीशी जागा पाहून तें बसविण्यांत आलं. त्या दिवशीं सकाळीं मजकूर सांगण्याचं काम संपल्यावर त्यांनीं मला विचारलं, "आज तुम्हांला विशेष कुठं जेवायला जायचंय् का दुपारीं?"

मीं म्हटलं, "नाहीं."

"मग जेवा कीं इथंच,"—ते म्हणाले—"नव्या बिलियर्डच्या टेबलावर खेळलों असतों थोडा वेळ."

मी थोडंसंच खेळलोंय् अन् तेंहि खूप वर्षांपूर्वीं, हें मीं कबूल केलं.

ते म्हणाले, "हरकत नाहीं. जितकं तुम्ही वाईट खेळाल तितकं मला चांगलं."

मग मी जेवायला थांबलों. जेवण झाल्यावर त्या 'ख्रिसमस' टेबलावर आम्ही अगदीं पहिला 'गेम' खेळलों. सबंध दुपारभर आम्ही खेळलों. संध्याकाळीं मीं पुन्हां यावं अन् आणखी कांहीं 'गेम्स' खेळावेत असं त्यांनीं सुचवलं. त्याप्रमाणें मी गेलों. आमचा खेळ मध्यरात्रीपर्यंत चालला होता.

सकाळचं मजकूर सांगायचं काम दुय्यम होऊन बसलं. एकाद्या बालकासारखे ते दुपारच्या खेळाची आतुरतेनं वाट पाहत. अन् जणुं त्यांना हवी तितक्या

लौकर दुपार होत नसे. मी नियमितपणें दुपारच्या जेवणासाठीं थांबूं लागलों. लौकर वरच्या मजल्यावर जाऊन बिलियर्ड खेळतां यावं म्हणून जेवणांतल्या पदार्थांची संख्याहि कमी करावी असं त्यांना वाटे. ते स्वतः मध्यान्हींचं जेवण घेत नसत. तरीहि खालच्या भोजनगृहांत येऊन येरझारा घालीत घालीत ते आपल्या विशिष्ट संथ लयींत सतत कांहीं तरी उत्कृष्ट बोलत राहत. हळू हळू तें ध्यानांत ठेवायची संवय मी स्वतःला लावूं लागलों, पण अर्थातच त्यांत संपूर्ण यश मला कधींच लाभलं नाहीं. निव्वळ वेळ काढण्यासाठीं ते बोलत असत. अन् मला आठवतं, एकदां एका महत्त्वाच्या विषयावर बोलतांना ते चांगलेच रंगले होते, तेवढ्यांत माझं जेवण संपत आल्याचं त्यांच्या ध्यानांत आलं अन् ते म्हणाले, " अच्छा! आतां आपण अधिक गंभीर विषयाकडे वळूं या— म्हणजे खेळाकडे!"

खेळाची नोंद आम्ही ठेवीत असूं. अन् दिवसअखेर त्यांची गुणसंख्या ताळेबंदांत अधिक भरली कीं, ते अधिक आनंदानं झोपायला जात. ते समतोल वृत्तीचे खेळाडू नव्हते. 'गेम' जर संथपणें त्यांच्याविरुद्ध जात आहे असं त्यांना दिसलं तर ते टीका करूं लागत, कधीं कधीं शेरे मारतांना मुद्दाम दोष दाखवीत. मग थोड्याच वेळांत त्यांना पश्चात्ताप होई आणि ते कमालीचे सौजन्यशील होत, खेळाकडे अधिक लक्ष पुरवीत, माझे चेंडू पॉकेट्समध्यें गेले कीं मोठ्या तत्परतेनें ते उचलून सेवाबुद्धीनें टेबलावर मांडीत. ते खूप संतापले, वाटेल तसे कडक बोलले तरी माझी हरकत नसे. त्यांचं वय, त्यांचं स्थान, त्यांची बुद्धिमत्ता—यामुळें त्यांना तसं वागण्याचा खास अधिकार लाभलेला होता. तरीहि त्यांच्यांतली दुसरी बाजू मला दिसे याचाहि आनंद होई. कारण त्या योगें त्यांच्यांतील मानवतेची बाजू पूर्ण होई. एकदां तर संतापाच्या उद्रेकांत त्यांनीं चेंडूवर असा हल्ला चढवला कीं, त्यांतले एक-दोन जमिनीवर आदळले. मीं ते गोळा केले अन् मग जणुं काहींच घडलं नाहीं अशा रीतीनं आम्ही दोघं खेळूं लागलों. थोड्याच वेळांत ते म्हणाले, " हा मोठा मनोरंजक खेळ आहे. जेव्हां तुम्ही वाईट खेळतां तेव्हां माझी करमणूक होते. अन् जेव्हां मी वाईट खेळतों आणि संतापतों तेव्हां खात्रीनं तुमचीहि करमणूक होत असली पाहिजे."

अशा वातावरणांत स्नेह वृद्धिंगत होत जाणं अपरिहार्य होतं. त्यांचा एकाहत्तरावा वाढदिवस आम्हीं सारा दिवसभर बिलियर्ड खेळून साजरा केला. ह्या समारंभानिमित्त त्यांनीं एक नव्या प्रकारचा 'गेम' काढला अन् जवळ जवळ

प्रत्येक फटक्याला एकेक नवाच नियम त्यांनीं लागू केला. रात्रींच्या जेवणाच्या वेळीं अगदीं आम्ही दोघंच होतों. अशा ह्या प्रसंगीं मीं एकट्यानंच त्यांचा पाहुणा असावं ह्यांत मला माझा मोठाच सन्मान झाल्यासारखं वाटलं. दिवसभर त्यांची मनोवृत्ति मोठी उल्हसित अन् विनोदी होती. रात्रीं खेळ संपल्यावर ते मला म्हणाले, "हा खेळ खेळतां खेळतां आजच्या इतका माझा दिवस चांगला कधींच गेला नव्हता."

मीं म्हटलं, "आजपासून आणखी दहा वर्षं आपण खेळत राहूं अशी मला आशा आहे."

"हो!" ते म्हणाले, "जगांतला सर्वोत्कृष्ट असा हा खेळ आपण खात्रीनं खेळत राहूं."

कॉपीराइटच्या प्रकरणांत त्यांनीं वॉशिंग्टनला भेट दिली त्या दौऱ्यांत मी त्यांच्याबरोबर होतों. स्पीकर 'अंकल जो' कॅनन यांनीं 'कॅपिटॉल'मधली आपली खासगी खोली आम्हांला दिली. तिथंच एके दिवशीं दुपारीं मार्क ट्वेन यांनीं कॉंग्रेस-सदस्यांची भेट घेतली अन् चिरुटाच्या धुरामुळें निळसर झालेल्या वातावरणांत 'कॉपीराइट'च्या तत्त्वाचं समर्थन केलं. तो दौरा ऐतिहासिक ठरला. माझ्या दृष्टीनंहि तो महत्त्वपूर्ण होता. कारण त्याच दौऱ्यावरून परत न्यूयॉर्कला येतांना मार्क ट्वेन यांनीं सुचवलं कीं, त्यांच्या घरींच मीं राहायला जावं. ते म्हणाले, "तिथली एक खोली रिकामीच राहणार आहे, अन् तुम्ही आलांत कीं सकाळीं लौकर आणि रात्रीं उशिरापर्यंत आपण बिलियर्ड खेळूं शकूं."

आज आतां भूतकाळाकडे वळून मी पाहूं लागलों कीं, तीन सुस्पष्ट चित्रें मला दिसूं लागतात. एक म्हणजे, सुशोभित लाल रंगाची बिलियर्डची खोली, तिच्यांत मध्यभागीं तें हिरवेंगार चौकोनी बिलिअर्ड-टेबल अन् त्यावर वाकून खेळांत रंगलेली त्यांची ती तेजस्वी, शुभ्रवस्त्रधारी मूर्ति. दुसरं म्हणजे, त्यांचा तो लांब-लचक प्रकाशमान दिवाणखाना, त्यांतल्या एका कोपऱ्यांतल्या एका कोचावर आरामशीर पहुडलेली, डुलक्या घेत घेत धूम्रपान करणारी, ऑर्गनच्या खणखणीत सुरावटींत इतरांना न दिसणारे पण त्यांना स्पष्ट दिसणारे चेहरे आणि देखावे आपल्यापुढें उभे करणारी तीच मूर्ति दिसते. कधीं कधीं ते उठून सबंध दिवाण-खानाभर येरझारा घालीत., पण बहुधा ते मऊ बिछान्यावर पडूनच असत. त्यांच्या रुपेरी केसांवर आणि शुभ्र वस्त्रांवर प्रकाश पडून त्या रंगांच्या तेजांत आणखी वाढच होई. त्यावेळीं त्यांनीं सारे शुभ्र कपडे वापरायची गोडी लावून घेतली होती. ते म्हणत, "काळा रंग पाहिला कीं, मला अंत्ययात्रांची आठवण येते."

तिसरं चित्र मला आठवतं तें जेवणाच्या टेबलाचं. तें सदैव सुंदर सजवलेलं असे. अन् जेव्हां जेव्हां ते हजर असत तेव्हां त्याला ज्ञानमंदिराचं स्वरूप प्राप्त होई. ते काहीं नेहमींच बोलत नसत. पण बहुधा ते बोलत. त्यांच्या त्या नेहमींच्या अद्वितीय शैलीनं एकादा नवाच दृष्टिकोन मांडीत असलेले, उत्सुकतेनं त्यांचा चेहरा उजळून निघालेला आहे असे, ते मला आजहि अगदीं स्पष्ट दिसतात. त्यांच्या बोलण्यांतले काहीं शब्दप्रयोग जसेच्या तसे आठवायची संवय मीं हळूहळू स्वतःला लावून घेतली. जेवणाच्या टेबलाशीं ते राजकीय, वैज्ञानिक अगर तत्त्वज्ञानविषयक प्रश्नांवर बोलण्याचा संभव अधिक असे. बिलियर्डच्या खोलींतलं संभाषण बहुधा जुन्या आठवणी अन् दंतकथांनीं परिपूर्ण असे, त्यामुळें त्यांत भाग घेणं मला जमे. खिडकींत मी एक वही ठेवीं अन् ते खेळूं लागले कीं त्या वहींत टिपण करीत असें.

एकदां त्यांनीं मला आपल्या स्वप्नांची माहिती सांगितली. ते म्हणाले, "एकहि महिना असा जात नाही कीं मला असलं स्वप्न पडत नाहीं :—माझी परिस्थिति बिघडली आहे अन् पुन्हां उदरनिर्वाहासाठीं नदीवर जाणं मला भाग पडलंय्. समोर सेल्मा ब्लफ् किंवा हॅट आयलॅंड किंवा रात्रींच्या अंधःकाराची नुसती काळीकुट्ट भिंतच आहे तें सांगतां येणार नाहीं पण बहुधा अशा निबिड अंधःकारांत घुसण्याच्या तयारींत असल्याचं मला स्वप्नांत दिसतं. दुसरं स्वप्न मला असं पडतं कीं, पुन्हां मला व्याख्यानासाठीं व्यासपीठावर जाणं भाग पडलंय्. त्यांत मी सदैव श्रोत्यांपुढें उठून उभा राहतों पण बोलण्यासारखं मजजवळ कांहींच नसतं, श्रोत्यांना हसविण्याचा प्रयत्न मी करतों, पण माझं मला कळतं कीं माझे विनोद निव्वळ मूर्खपणाचे आहेत. मग श्रोत्यांच्याहि तें ध्यानांत येतं अन् लौकरच ते उठूं लागतात आणि निघून जातात. अशा स्वप्नाचा शेवट बहुधा मी त्या अंधुक प्रकाशांत उभा राहून रिकाम्या सभागृहापुढं बोलत राहतों, अशा दृश्यांत होतो."

पुढच्या उन्हाळ्यांत ते डब्लिनला परतले नाहींत. टक्सेडो ह्या न्यूयॉर्कपासून अधिक जवळ असलेल्या गांवीं त्यांनीं घर घेतलं. मी तिथं त्यांच्याबरोबर गेलों नाहीं. कारण आमचं असं ठरलं होतं कीं, वसंत ऋतूंत मी मिसिसिपीची आणि पॅसिफिक किनाऱ्याची तीर्थयात्रा करून मार्क ट्वेनला तारुण्यापासून ओळखणारे जे थोडे लोक अजून हयात होते त्यांना भेटून यावं. ह्या दौऱ्यावर मी फार लौकर निघालों असं मुळींच म्हणतां येणार नाहीं. कारण नदीकांठीं अत्यंत आनंदांत काढलेल्या दिवसांत आपण त्या गुंफेपासून 'हॉलिडेज हिल'पर्यंत कसे जात

असू तें सारं मला सांगणारे मृदु अंतःकरणाचे जॉन ब्रिग्ज यांनीं कांहीं त्या वर्षाची अखेरदेखील पाहिली नाहीं. होरेस बिक्स्बी ८१ व्या वर्षी देखील तरुणच असून एक सरकारी ' स्नॅग-बोट ' चालवीत होते. जोसेफ गुडमन यांनाहि कोणत्याहि दृष्टीनं म्हातारे म्हणतां आलं नसतं. पण जिम जिलिस यांची अखेर मात्र जवळ येत चालली होती. स्टेव्ह जिलिस तर अपंग होऊन पडले होते. ते म्हणाले, "सॅमला म्हणावं, मी आतां अगदीं लौकरच मरणार आहें. तरीहि माझं त्याच्यावर प्रेम आहे. आयुष्यभर मी त्याच्यावर प्रेम करीत आलोंय्. अन् मरेपर्यंत मी त्याच्यावर प्रेमच करणार आहें." मी परतलों तेव्हां मार्क ट्वेन मोठ्या आनंदांत होते. वाङ्मयीन डॉक्टरेट ही पदवी स्वीकारण्यासाठीं इंग्लंडमधील ऑक्सफर्ड विद्यापीठाकडून त्यांना निमंत्रण आलं होतं. ८ जून १९०७ रोजीं—म्हणजे बरोबर ४० वर्षांपूर्वी ' क्रेकर सिटी ' ह्या बोटीनं अधिक प्रसिद्धि मिळविण्यासाठीं ते परदेशपर्यटनास ज्या दिवशीं निघाले त्याच दिवशीं ते बोटीनं इंग्लंडला जायला निघाले.

अमेरिकेबाहेर ते सहा आठवडे होते. आणि या खेपेला इंग्लंडनं त्यांचं एवढं प्रचंड स्वागत केलं कीं, यापूर्वीच्या तिथल्या कोणत्याच स्वागताशीं त्याची तुलना होऊं शकणार नाहीं. लंडनमधील सर्वश्रेष्ठ क्लबांनीं त्यांना मेजवान्या दिल्या, राजेसाहेबांच्या उद्यानोपहाराच्या वेळीं विशेष अगत्यानं त्यांचं स्वागत झालं अन् शाही आगगाडींतून ते फिरले. ऑक्स्फर्ड येथें ते रस्त्यावर येतांच मार्क ट्वेन हें नांव आगीच्या वार्तेसारखं दशदिशांना पसरलं अन् लोक पळत पळत बाहेर आले. शेल्डोनियन थिएटरमध्यें ती पदवी स्वीकारण्यासाठीं ते जेव्हां व्यासपीठावर आले तेव्हां एके काळीं टॉम सॉयर असणाऱ्या अन् हकलबेरी फिनबरोबर खेळणाऱ्या ह्या मुलाच्या नांवानं महाविद्यालयीन विद्यार्थ्यांनीं प्रचंड जयजयकार केला. दुसऱ्या दिवशींच्या वर्तमानपत्रांनीं त्यांच्या ह्या सत्काराचं वर्णन ' वादळी ' ह्या विशेषणानं केलं. सर्व सत्कार-समारंभावर त्यानं मात केली होती. नाहीं तर खरं म्हणजे त्याच वेळीं रुडयार्ड किपलिंग, जनरल बूथ, व्हाइटलॉ रीड प्रभृति ख्यातनाम व्यक्तींनाहि सन्माननीय पदव्या बहाल करण्यांत आल्या होत्या.

ह्या वेळीं मार्क ट्वेन यांचा सर्वांत मोठा सामाजिक सन्मान कशानं झाला असेल तर तो लंडन येथील ' पंच ' या नियतकालिकाच्या नोकरवर्गानं दिलेल्या मेजवानीमुळें. बोवेरी स्ट्रीटवरील ' पंच 'च्या त्या ऐतिहासिक संपादकीय खोल्यांत ही मेजवानी देण्यांत आली. ज्या पवित्र आसनावर थॅकरे आरूढ

झाले होते आणि जेथून डग्लास जेरॉल्ड प्रभृति थोर मंडळी निवृत्त झाली होती तेथें यापूर्वीं कुणाहि परकीय पाहुण्याला कधींहि निमंत्रण देण्यांत आलं नव्हतं.

ऑक्सफर्डची पदवी आणि समग्र इंग्लंडनें केलेला सत्कार ह्या गोष्टींनीं जणुं कांहीं मार्क ट्वेनच्या सफल कीर्तिमंदिरावर कळस चढविला. ते न्यूयॉर्कला येऊन पोंचल्याचं कळतांच मीं त्यांना टेलिफोन करून त्यांचं अभिनंदन केलं तेव्हां त्यांनीं मला ताबडतोब येऊन बिलियर्ड खेळण्याची सूचना केली. मी जाऊन पोचलों तेव्हां ते बिलियर्ड खोलींतच चेंडूंना फटके देत होते. त्या रात्रीं उष्मा होत असल्यानें त्यांच्या अंगांत कोट नव्हता. मी खोलींत शिरत असतांनाच ते म्हणाले, "हं चला! मीं एक नवा खेळ शोधून काढलाय्." बस्स. मौज संपली होती. पडदा पडला होता. पुनश्च व्यवहार पूर्ववत् सुरू झाले होते.

त्यानंतरच्या हिंवाळ्यांतले कांहीं दिवस त्यांनीं बर्मुडा येथें श्री. रॉजर्स यांच्या समवेत घालवले असले तरी मीं बहुतेक दिवस मार्क ट्वेन यांच्याच सहवासांत घालवले. मग आला वसंत ऋतु. अन् जून महिन्यांत कनेक्टिकटमधील रेडिंग येथील 'स्टॉर्मफील्ड' ह्या नव्यानंच बांधलेल्या स्वतःच्या घरांत मार्क ट्वेन राहायला गेले. यापूर्वीं त्यांनीं तें कधींच पाहिलं नव्हतं. मीं त्यांच्यासाठीं खरेदी केलेली जमीनदेखील त्यांनीं यापूर्वीं कधींच पाहिली नव्हती. "घर बांधून झालं, साऱ्या सामानासह सुसज्ज झालं आणि चुलीपाशी मांजर म्यांव म्यांव करूं लागलं कीं, तें घर मीं पाहायची वेळ येईल—" असं ते अनेकदां म्हणाले होते. खोल्या मोठाल्या असाव्यात अन् बिलियर्डच्या खोलीला लाल रंग द्यावा एवढंच त्यांनीं मुद्दाम सुचवून ठेवलं होतं.

अखेरीस १८ जून १९०८ रोजीं त्यांनीं घराचा ताबा घेतला. त्या दिवशीं हवेंत गारवा असला तरी सकाळीं स्वच्छ सूर्यप्रकाश चोहोंकडे पसरला होता. वेळेवर हजर होतां यावं म्हणून सकाळीं ६ वाजतां उठून मार्क ट्वेन यांनीं श्मश्रुकार्य उरकलं. दुपारीं चार वाजेपर्यंत गाडी नव्हती पण सकाळींच आमचा बिलियर्डचा कार्यक्रम होता अन् त्यांत खंड पडायला नको होता. आम्ही खेळत होतों ते जवळ जवळ तीन वाजेपर्यंत. अखेरीस निरोप आला कीं, "टॅक्सी तयार आहे." आम्ही स्टेशनवर पोंचलों, तिथं बरेचसे लोक जमले, बातमीदार वगैरे. मार्क ट्वेन यांनीं लौकर आपल्या नव्या घरांत पदार्पण करावं म्हणून सारे उत्सुक होते. तें साठ मैलांचं अंतर तोडायला लागलेला दीड तास कुठल्या कुठं निघून गेला.

तिथं एक प्रकारच्या खुल्या मैदानांतल्या स्वागताची जय्यत तयारी दिसून आली. फुलांनीं सुशोभित केलेल्या विविध प्रकारच्या वाहनांचा मेळावा भव्य

ग्रामीण स्वागतास सज्ज होता. लोकांनीं जयजयकार केला नाहीं. मार्क ट्वेन यांच्या शुभ्रवेषधारी मूर्तीकडे पाहून त्यांनीं सुहास्य केलं अन् रुमाल फडफडवले, त्यांनींहि प्रत्युत्तरादाखल स्मितहास्य करून रुमाल फडफडवला. पण कुणींहि कसलाहि आवाज केला नाहीं. त्यांच्या घरापर्यंतचं तीन मैलांचं अंतर मिरवणूक कापूं लागली. आघाडीवर मार्क ट्वेन यांची गाडी होती. हिरव्यागार टेकड्या, डेझी-फुलांनीं पांढरीं शुभ्र दिसणारीं शेत सर्वत्र दिसत होतीं. आम्ही चाललों होतो तेव्हां ते अगदीं शांत होते.

ज्या गल्लींत त्यांचं नवं घर होतं त्या गल्लीच्या तोंडाशीं आम्ही पोंचलों. मग मिरवणूक मागं पडली. आमची गाडी चढण चढून आणखी वर गेली. पलिकडची सॉगाटक व्हॅली, तिच्यांत सुखानं दडून बसलेलं खेडं, चर्चचे मनोरे अन् मळ्यांतली घरं अन् पलिकडे दूरवर टेकड्याची रांग तिथून स्पष्ट दिसूं लागली. अन् मग आलं त्यांचं घर—बांधणी साधी पण सुरेख; अमेरिकन हवामान-गरजांनुसार बदल करून बांधलेला तो एक इटालियन व्हिला होता. प्रवेशद्वारा-पाशीं त्यांचे घरगुती नोकर अभिवादनासाठीं उभे होते, अन् लौकरच उंबरा ओलांडून त्यांनीं आपल्या स्वतःच्या मालकीच्या घरांत सतरा वर्षांनंतर प्रथमच पाऊल टाकलं. अत्यंत सौजन्यानें ते म्हणाले, "किती सुंदर आहे हें सारं! हें इतकं सुंदर असेल असं मला मुळींच वाटलं नव्हतं." आणि नंतर घरांतल्या सगळ्या खोल्या पाहून झाल्यावर ते म्हणाले, "खरोखर, अगदीं सर्वांगपरिपूर्ण असंच घर आहे हें—अगदीं सर्व सोयींनीं परिपूर्ण! मी सदैवच इथं असतों तर!"

पहिल्या दिवशीं कांहीं पाहुणे-मंडळी होती. रात्रीं छोटीशी घरगुती मेजवानी झाली. नंतर थोड्या वेळानं शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं थोडी शोभेची दारू उडवली. मार्क ट्वेन म्हणाले, "ही सारी मंडळी माझ्यासाठीं इतका त्रास कां बरं घेत आहेत? मीं तर कधींच कुणासाठीं त्रास घेतलेला नाहीं." बिलियर्डचा डाव हाच त्या दिवशीं अखेरचा कार्यक्रम होता.

मार्क ट्वेन यांना स्टॉर्मफील्ड फार आवडलं. हिंवाळ्यासाठीं न्यूयॉर्कला परत जायचा बेत तर त्यांनीं जवळ जवळ तत्काळ सोडून दिला. अन् परत कधींच त्यांनीं त्या फिफ्थ ॲव्हेन्यूवरील घरांत पाऊल ठेवलं नसावं असं वाटतं. 'न्यूयॉर्कमधील सर्वांत सुंदर स्त्री' असण्याचे त्यांचे दिवस संपले होते. ते वरचेवर एखाद्या मोठ्या मेजवानीला हजर राहत पण नेहमीं कुरकुरत. अखेरीस त्यांनीं सरळ नकार द्यायला सुरुवात केली. पहिल्या उन्हाळ्यांत तिथं त्यांना खूप लोकांचा

सहवास लाभला. जुने मित्र आले. अन् त्यांना सदैव आवडणारी तरुण मंडळी तर सारखी त्यांच्या भोंवतीं होती.

त्यांच्या घरापासून माझं घर अर्ध्या मैलाहून थोडं अधिक दूर होतं. दोघांच्या मालकीचे जमिनीचे पट्टे एकमेकांना लागूनच होते. दररोज मी त्यांना भेटायला जाई—कधीं बिलियर्ड खेळायला, तर कधीं शेतांतून दूर फिरायला मिळावं म्हणून. त्या भागांत एक लघुलिपीलेखक होता. मजकूर सांगण्याचं त्यांचं कामहि चालू होतं. पण त्यांत नियमितपणा नव्हता. मधून मधून ते स्वतःहि लिखाण करीत. "इज् शेक्सपियर डेड?" हें छोटं पुस्तक त्यांनीं पुरं केलं.

हिंवाळा आला. फिरणं कमी झालं. अधिकच मंडळीं अवतींभवतीं जमूं लागली. त्या घरांत आनंद होता अन् बिलियर्डचे 'गेम्स' बराच वेळ लांबूं लागले.

फेब्रुवारींत मी युरोप अन् भूमध्यसागराचा दौरा करून आलों. त्यांच्या संपर्कांत आलेला प्रदेश पाहून घेतला. एप्रिलमध्यें परतल्यावर ते मला कांहींसे बदललेले दिसले. म्हणजे तसे ते कांहीं अधिक म्हातारे झाले नव्हते किंवा त्यांच्या अंगांतील उत्साहहि कमी झालेला नव्हता पण त्यांची कार्यप्रवणता किंचित् कमी झाली होती. आपल्या भोंवतींचा हास्यविनोद कमी व्हावा असं त्यांना वाटूं लागलं होतं. त्यांचं मजकूर सांगण्याचं काम बंदच पडलं होतं किंवा अगदीं क्वचित् चाले. त्यांची कन्या जीन आरोग्य-धामांत होती. त्यांची चिटणीस म्हणून काम करण्यासाठीं ती येत होती; या गोष्टीचा त्यांना अतिशय आनंद झाला. पुनश्च आमचा खेळ सुरू झाला; आमच्या गप्पा अन् शेतांतून दूरवर फिरायला जाणंहि पुनश्च सुरू झालं.

त्या दिवसांत मार्क ट्वेन हळूहळू चालत. ह्या उन्हाळ्याच्या प्रारंभींच हृदय-विकाराची चाहूल लागली. तदनंतर एक वर्षाच्या आंतच या विकारानं त्यांचा बळी घेतला. हृदयाच्या स्नायूंत बिघाड झाला असल्यानें कधीं कधीं त्यांना छातींत प्राणांतिक वेदना सहन कराव्या लागत. पण बाकीचा बहुतेक वेळ त्याना कांहींच त्रास होत नसे. हृदयविकार असूनहि त्यांना फिरायला जायची मुभा होती. त्यांच्या मालमत्तेपैकीं एक त्यांनीं यापूर्वी न पाहिलेला भाग एकदां मीं त्यांना दाखवला. आमच्या वांटणीची रेषा सरळ करण्यासाठीं कांहीं दिवसांपूर्वी त्यांनीं मला दिलेला एक कोपराहि परत येतांना मीं त्यांना दाखवला. त्या तुकड्यावर एक अभ्यासिका बांधून तिला 'मार्कलँड' असं नांव द्यायचा माझा विचार मीं त्यांच्यापाशीं बोलून दाखवला. मला वाटतं, तें नांव त्यांना आवडलं असावं. नंतर ते मला

म्हणाले, "तुमच्यापाशीं तें जादा बिलियर्ड टेबल ठेवायला जागा असेल तर तें मी तुम्हांला देऊन टाकीन—" (रॉजर्स यांनीं दिलेलं तें टेबल न्यूयॉर्कलाच कोठडींत पडून राहिलं होतं.) मीं म्हटलं, "त्या टेबलाचा समावेश करतां येईल अशा रीतीनें माझ्या अभ्यासिकेचा आकार मी बदलूं शकेन."

"हें फार चांगलं होईल. मला जेव्हां जेव्हां व्यायाम हवा असेल तेव्हां तेव्हां मी इथपर्यंत चालत येऊन तुमच्याशीं बिलियर्ड खेळत जाईन. अन् जेव्हां तुम्हांला व्यायाम हवा असेल तेव्हां तुम्ही येत जा आणि माझ्याशीं बिलियर्ड खेळत जा. ती अभ्यासिका तुम्ही बांधाच—" ते म्हणाले. अशा रीतीनं तिची योजना ठरली आणि लौकरच बांधकामहि सुरू झालं.

कितीतरी गोष्टींवर आम्ही बोलत असूं. खगोलशास्त्र हा एक त्यांचा अत्यंत आवडता विषय होता. अत्यंत नजीकचा तारा २५ कोटी अब्ज मैल दूर अंतरावर आहे या विचारानेंच त्यांचें अंग रोमांचांनीं पुलकित होई. विशेषतः धूमकेतूंचें आकर्षण त्यांना फार असे. एकदां ते म्हणाले, "१८३५ सालीं हॅले यांच्या धूमकेतूबरोबर मी जन्मलों. पुढल्या वर्षी पुन्हां धूमकेतु उगवतोय्. मला वाटतं, त्याच्याबरोबरच मीहि जाणार. हॅले यांच्या धूमकेतूबरोबर मी गेलों नाहीं तर माझी घोर निराशा होईल."

त्यांच्या शब्दांत भविष्यवाणी लपली होती यावर कुणाचाच विश्वास बसणं शक्य नव्हतं. पण छातींतल्या कळा वाढत होत्या अन् वारंवार येऊं लागल्या होत्या. त्यांचा 'अँजिना पेक्टोरिस' हा रोग बळावत होता. अन् किती धैर्यानें ते सारं सहन करीत होते! ते बिलियर्ड खेळत असतांना एकाएकीं जोरानें कळा येऊं लागतांच ते कसे कोसळत तें मीं पाहिलंय्. तरीहि आपली पाळी येतांच ते जिद्दीनं खेळण्याचा आग्रह धरीत; खालीं वाकून, चेहरा पांढरा फटफटीत पडलेला आहे आणि हातानें छाती गच्च दाबून धरलेली आहे अशाहि स्थितींत ते खेळत.

△ △ △

२२.

## जीनचा मृत्यु : बर्मुडा

त्या वर्षीच्या शरद्‌ऋतूंत क्लारा क्लेमेन्स हिचा विवाह रशियन पियानोवादक ऑसिप गॅब्रिलोविच् यांच्याशीं झाला आणि लौकरच तीं दोघं बोटीनं युरोपला गेलीं. तिथंच तीं स्थायिक होणार होतीं. आतां जीन क्लेमेन्स कुटुंबप्रमुख झाली होती. तिची अशक्त प्रकृति अन् तिच्यावर पडलेल्या विविध जबाबदाऱ्या पाहतां तिच्यावरील बोजा फारच अवजड होता. विविध प्रकारच्या प्राण्यांची तिला फार आवड होती. मळ्यांतल्या घराच्या एका कोपऱ्यांत तिनं बऱ्याच कोंबड्या अन् आणखी किती तरी प्रकारचे प्राणी पाळले होते. चिटणीस-पदावरील कांहीं कामांच्या जबाबदारींतून तिला मोकळं करायचा प्रयत्न मीं केला. पण ती कमालीची श्रद्धाळू आणि महत्त्वाकांक्षी होती. इतकं असूनहि तिची प्रकृति चिंताजनक कधींच वाटली नाहीं. हल्लीं मी बहुतेक वेळ, दिवसा व रात्रीं-देखील स्टॉर्मफील्ड इथंच राहूं लागलों होतों, कारण हवा कुंद होऊं लागली होती आणि मार्क ट्वेन यांना त्या घरांत अगदीं एकटं एकटं वाटत असे. नोव्हेंबरांत अकारणच त्यांना बर्मुडाला जावंसं वाटलं. त्या उन्हाळी बेटावरच्या ऊबदार वातावरणांत एक महिना आम्हीं घालवला अन् नाताळापूर्वी एक आठवडा परतलों.

नाताळामुळें जीनचं काम फारच वाढलं होतं. उदार अंतःकरणानं तिनं प्रत्येकाला कांहीं ना कांहीं देणगी द्यायचं निश्चित केलं होतं. खरेदी करण्यासाठीं वारंवार तिला शहरांत फेऱ्या माराव्या लागल्या. घरांत तिनं एक सुंदर 'ख्रिसमस ट्री' देखील उभारलं. दरम्यान, तिला जबरदस्त सर्दी झाली. तिला अपस्माराचे झटके येत. अन् हें सारंच तिला बाधक होतं. २४ डिसेंबरला सकाळीं थंड पाण्याच्या आंघोळीमुळें धक्का बसून ती एकाएकीं मरण पावली.

दफनविधीसाठीं जीनला एल्मिराला नेण्यांत आलं. हिंवाळ्यांत एवढा प्रवास सोसणार नाहीं म्हणून तिचे वडील गेले नाहींत. तिला धाडून देण्यांत आलं

तेव्हां सायंकाळचे सहा वाजले होते. बर्फवृष्टि चालू होती. त्या अल्पायुषी दिवसाचं दुःख बळावत होतं. उघडलेल्या दाराबाहेर दिवे पेटले होते. वरच्या मजल्यावरील एका खिडकींतून ज्याच्या रुपेरी केसांवर प्रकाश पडला आहे असा तिचा पिता तिचं अंतिम निर्याण पाहत होता.

नंतर दहा दिवसांनीं मार्क ट्वेन बर्मुडाला परतले. त्यावेळीं त्यांच्याबरोबर फक्त एकच नोकर होता. हिंवाळ्यांत माझं घर बंद ठेवून मीं स्टॉर्मफील्डच्या त्यांच्या घरांत राहावं म्हणजे ते केव्हांहि परतले तरी घर त्यांना सुसज्ज मिळेल, असं त्यांनीं सुचवलं. अर्थात् आम्ही तिथं गेलों. बर्मुडांत ते हॉटेलमध्यें उतरले नाहींत. व्हाइस-कॉन्सल ॲलन यांच्या घरीं ते पूर्वी येऊन गेले होते, तिथंच ते उतरले. बर्मुडा मार्क ट्वेन यांना मानवलं. कांहीं काळ त्यांची ताकद वाढली, उत्साह वाढला अन् त्यांची जुनी वृत्ति बऱ्याच अंशानीं परत आली. जवळ जवळ रोज त्यांचीं मला पत्रं येत. त्यांच्या प्रकृतीचं चांगलं इतिवृत्त त्यांत असे. खिलाडू सल्ला आणि सूचना त्यांत असत. मग हळू हळू त्यांचं स्वदस्तुरचं पत्र येईनासं झालं. पण श्री. ॲलन यांची तरुण कन्या हेलेन या नव्यानंच नेमलेल्या 'चिटणिसा'चीं पत्रं येऊं लागलीं. तरीहि तीं पत्रं आनंददायी असत. एकदां त्यांनीं म्हटलं होतं, "ही गोष्ट माझ्या मनांत ताजी आहे तोंवरच तिच्यावरील माझा अभिप्राय कळवून टाकतों. यापुढें कोणत्याहि पत्रांतील कागदाच्या शिरोभागीं क्रमांक न टाकतां जर तुमचं पत्र आलं तर मी माझ्याच हातानं तुम्हांला उत्तर पाठवीन. म्हणजे असल्या गुन्हेगाराचं वर्णन करण्यासाठीं वापरायचे शब्द मी मनसोक्तपणें आणि यत्किंचितहि क्षिति न बाळगतां वापरूं शकेन."

मार्चच्या अखेरीस आपण येत असल्याचं त्यांनीं मला कळवलं. "अर्थात् छातींतल्या कळांनीं विशेष जोर केला नाहीं तर. मला इथं मरायचं नाहीं. आपल्या मालकीच्या जागीं शेवटचे दिवस काढायचे असं एकसारखं मनानं घेतलं आहे" त्यांनीं लिहिलं होतं. आठवड्याभरानं आणखी काळजींत टाकणारं पत्र आलं. श्री. ॲलन यांनींहि स्पष्ट कळवलं कीं, परिस्थिति अतिशय चिंताजनक आहे. मी न्यूयॉर्कला गेलों आणि तत्काळ बोट पकडली. "ताबडतोब निघून या"—अशी केबल मीं गॅब्रिलोविच् पति-पत्नीला धाडली. बर्मुडा इथं मात्र मीं कांहींच कळवलं नाहीं. तिथं मी पोंचलों तों अगदीं अनपेक्षितपणें. मला पाहतांच आपला हात पुढं करून ते म्हणाले, "कां बुवा? तुम्ही येणार असल्याचं कांहीं अगोदर कळवलं नाहीं आम्हांला?"

मीं म्हटलं, "नाहीं. जरा अचानकच ठरलं. तुमच्या शेवटच्या पत्राचा सूर कांहीं आपल्याला आवडला नाहीं."

"पण त्यांत काळजी करण्यासारखं कांहीं नाहीं. तुम्ही माझ्यासाठीं यायला नको होतं."

यावर 'मी माझ्यासाठीं आलोंय्' असं उत्तर दिलं. मीं म्हटलं, "मलाच विश्रांतीची गरज होती. ताबडतोब इकडे येऊन तुमची भेट घ्यायचं मीं ठरवलं."

अत्यंत संथ आणि सौजन्यपूर्ण स्वरांत ते म्हणाले, "ठीक, ठीक! आतां मला तुमच्या भेटीनं आनंद होतोय्."

छातींत कळा किती जोरानं येतात, आपल्याला हायपोडर्मिक इंजेक्शनें कशीं चालू आहेत तें सारं त्यांनीं मला सांगितलं. त्या इंजेक्शनांचा उल्लेख त्यांनीं गमतीनं 'हिप्नॉटिक इंजेक्शनें' असा केला! त्यांचे दिवस किती थोडे उरले आहेत, पुढील दिवस किती अशाश्वत आहेत तें मला श्री. व सौ. ॲलन यांच्याकडून कळलं. श्री. ॲलन यांनीं मायदेशीं परत जायचं तिकीटहि १२ एप्रिलचं राखून ठेवलं होतं. मी आलों त्या दिवशीं दुपारीं आम्ही पूर्वींसारखेच मोटारींतून बाहेर फिरायला गेलों अन् तेहि माझ्याशीं जुन्या विषयांवर पूर्वींसारखेच बोलले. ज्या मळ्यांत जीननं प्राणी पाळले होते तो त्यांच्याच सांगण्यावरून मीं सहा हजार डॉलर्सना विकला होता. त्या रकमेंतून तिचं एकादं स्मारक उभारण्याचा त्यांचा मानस होता. रेडिंग गांवाला त्यांनीं अगोदरच देणगी म्हणून देऊन टाकलेल्या ग्रंथालयासाठीं इमारत बांधल्यास तें योग्य व उपयुक्त स्मारक होईल ही सूचना त्यांनाहि पसंत पडली. ताबडतोब त्यांच्या वकिलाला कळवून हें ठरवून टाकण्यासंबंधीं पत्र लिहायला त्यांनीं मला सांगितलं.

त्यानंतर पुन्हां कधींच आम्ही मोटारींतून बाहेर गेलों नाहीं. छातींत कळा पुष्कळ दिवस येत होत्या. तरी ते आनंदी असत, बाहेर हिरवळीवर येऊन बसत. पण बहुतेक वेळ ते बिछान्यांतच रेलून पडून वाचीत आणि धूम्रपान करीत. त्यावेळीं इतके आनंदी आणि उत्साही दिसत ते कीं, आमच्या मृत्यूनंतरहि ते जगणार नाहींत यावर विश्वास ठेवायला माझं मन त्यांच्याकडे पाहिल्यावर मुळींच तयार नसे.

मी दिवसाचा बहुतेक वेळ त्यांच्या बिछान्यापाशीं बसून वाचनांत घालवीं. ते झोपले कीं, त्यांना श्वासोच्छ्वास करताना त्रास होत असल्याचं मला दिसून येई. त्यांच्या प्रकृतींत सुधारणा होत नसल्याचं कळे. ते मात्र बहुधा आनंदी असत. सर्व कुटुंबियानीं आपल्या भोवतीं असावं, मौज करावी असं त्यांना वाटे. आम्ही बोटीनं निघालों त्याच्या अगोदर थोडे दिवस जोरानें छातींत कळा यायला पुन्हा सुरवात झाली होती. त्यानंतरच्या रात्री फारच वाईट जाऊं लागल्या. पण मग

ठरल्याप्रमाणें १२ एप्रिलला आम्ही बोटीनं निघालों अन् त्यांना विश्रांति मिळूं लागली. 'ओशियाना' बोटीनं त्यांना मायदेशीं आणलं. त्या बोटीवर आम्ही पोंचेपर्यंत मार्क ट्वेन चांगलेच उत्साही होते.

माझ्या स्मृतींत जोंवर कांहींहि राहूं शकतं तोंवर स्वदेशाच्या दिशेनें केलेल्या त्या जलपर्यटनांतील ते अठ्ठेचाळीस तास माझ्या स्मृतींत चिरंतन राहतील. प्रारंभीं ते ठीक होते. पण मग 'गल्फ' प्रवाहाच्या दमट आणि तापदायक हवेंत आम्ही येतांच त्यांना श्वासोच्छ्वासाला अतिशय त्रास होऊं लागला. आतां कोणत्याहि क्षणीं त्यांची अखेर होऊं शकेल असं मला वाटूं लागलं. हा विचार त्यांच्याहि मनांत होताच पण त्याची त्यांना यत्किंचितहि भीति वाटत नव्हती. त्यांची विनोद-बुद्धि अखेरपर्यंत शाबूत होती. एकदां बोटीनं गिरकी घेतल्यामुळें खुंटीवरून त्यांची हॅट खालीं पडून केबिनच्या जमिनीवर तिनं फेरी पूर्ण केलेली पाहून ते म्हणाले, "बोटदेखील ही हॅट दुसऱ्याला देऊं इच्छिते." हायपोडर्मिक इंजेक्शनें देण्याचें जुजबी शिक्षण मला देण्यांत आलेलें असल्यानें वेळोवेळीं मी त्यांना 'हिप्नॉटिक इंजेक्शनें' देत असे. पण त्यायोगें त्यांना संपूर्ण आराम असा कधींच वाटला नाहीं. कोणत्याहि एका अवस्थेंत त्यांना फार वेळ राहतां येत नसे. तरीहि त्यांनीं तक्रार केव्हांच केली नाहीं. उलट आपण इतरांना किती त्रास देतों असं त्यांना वाटे. एकदां ते म्हणाले, "पेन! मला तुमच्याबद्दल फार वाईट वाटतं. पण मला कांहींच करतां येत नाहीं. ही मरण्याची भानगड कांहीं मला चटकन् संपवतां येत नाहीं बुवा." अन् मग थोड्या वेळानं ते म्हणाले, "ओः! काय हें गूढ आहे पाहा! अन् याला वेळ तरी किती लागतोय्!" गोदींत त्यांचं स्वागत करायला नातेवाईक, डॉक्टर, बातमीदार वगैरे सज्ज होते. उत्तरेकडील ताज्या आणि थंड वाऱ्यानं उत्तेजित झाल्यामुळें त्यांना अनेक तास झोप लागली होती. त्यांची प्रकृतीहि सुधारल्यासारखी भासत होती. त्या गाडींतल्या ज्या खास डब्यांतनं आम्ही प्रथम रेडिंगला गेलों होतों त्याच डब्यांतून आम्ही आतांहि निघालों. त्यांचे डॉक्टर त्यांची प्रकृति तपाशीत होते. त्या प्रवासाचं अगर घरीं मोटारींतून आल्याचं त्यांना कांहींच वाटत नसावं असं दिसत होतं.

♠ ♠ ♠

२३.

# एका थोर जीवनाचा अंत

स्टॉर्मफील्डला पोंचल्यावर घोडागाडींतून कुणाचीहि मदत न घेतां खालीं उतरून त्यांनीं घरांतील मंडळींना अभिवादन केलं. जुन्याच रुबाबानें त्यांनीं प्रत्येकाशीं हस्तांदोलन केलं. मग आम्हीं आणलेल्या कॅनव्हसच्या एका खुर्चींत बसवून त्यांना वरच्या मजल्यावरील त्यांच्या खोलींत नेलं. त्या विशाल, सुंदर खोलींतून मावळतीच्या टेकड्या दिसत होत्या. १४ एप्रिल १९१० च्या गुरुवार सायंकाळची ही हकीकत.

त्यानंतर मार्क ट्वेन बरोबर एक आठवडा जिवंत होते. कांहीं वेळ ते जीवन-रसानें परिपूर्ण वाटत, अनिर्बंधपणें गप्पा मारीत आणि त्यांना त्रास थोडासाच होई. क्लारा आणि ऑसिप गॅब्रिलोविच् शनिवारीं येऊन पोंचलीं तेव्हां मार्क ट्वेन आनंदांत होते—अगदीं पूर्वीं असत तसे. मधून मधून ते वाचीत असत.

गुरुवार ता. २१ ला सकाळींहि त्यांचं मन बरंच शांत होतं. बिछान्यांतील ग्रंथांपैकीं एकांतलं थोडंसं त्यांनीं वाचलं. मला भेटायची इच्छा असल्याचा निरोप त्यांनीं क्लारामार्फत धाडला. मी आंत आल्यावर ते आपल्या दोन अपूर्ण हस्त-लिखितांविषयीं बोलले. तीं मीं 'फेकून द्यावींत' असं त्यांनीं म्हटलं असावं. कारण एव्हांना त्यांचे शब्द अस्पष्ट येऊं लागले होते. ते बोलतहि थोडंच. 'मी तें सारं ठीक करीन' असं मीं आश्वासन दिल्यावर त्यांनीं माझा हात दाबला. माझ्याशीं बोललेला तोच त्यांचा अखेरचा शब्द ठरला. दुपारीं क्लारा त्यांच्या शेजारीं उभी असतांनाच त्यांना एक डुलकी आली. तिच्यांतूनच त्यांना गाढ निद्रा लागली अन् मग मात्र त्यांनीं आमची यत्किंचितहि दखल घेतली नाहीं. वसंतऋतूंतील त्या दुपारच्या शांत वातावरणांत जीवनलाट ओहोटी लागून हळूहळू ओसरली. अगदीं हळूहळू चाललेलं त्यांचं श्वसन थांबल्याचं डॉ. क्विन्टार्ड यांच्या ध्यानांत आलं तो साडेसहाचा सुमार होता. संघर्षाचा मागमूसहि नव्हता.

तें उदात्त शिरकमल एका बाजूला किंचित् कललं, एक निःश्वास सुटला अन् धामधुमीचीं चौऱ्याहत्तर वर्षे अखंड चाललेलं तें श्वसन कायमचं बंद पडलं.

त्यांना अतिशय प्रिय असलेल्या शुभ्र वेषांत न्यूयॉर्कमधील ब्रिक चर्चमध्यें मृत्यूच्या मांडीवर मार्क ट्वेन पहुडले होते आणि असंख्य चाहते त्यांचं अखेरचं दर्शन घेत होते. सहस्रावधि लोक पुढं सरकत आहेत. क्षणमात्र थांबून त्यांच्या-विषयींचा आदर व्यक्त करीत आहेत अन् अत्यंत गंभीरपणें, विचारपूर्ण मुद्रेनें पुढं सरकत आहेत हें दृश्य अत्यंत परिणामकारी होतं. त्यांत सर्व प्रकारचे लोक होते. गरीब, श्रीमंत, छातीवर क्रूस काढणारे, नमस्कार करणारे, न्याहाळून पाहण्यासाठीं कांहीं क्षणमात्र थांबणारे!

त्याच रात्रीं आम्ही त्यांच्या मृतदेहासमवेत एल्मिराला गेलों. ज्या दिवाण-खान्यानें त्यांचा विवाह-सोहळा पाहिला होता त्याच शाही दिवाणखान्यांत दुसऱ्या दिवशीं त्यांचा मृतदेह ठेवण्यांत आला. जिथं लॅंग्डन, सुसी, सौ. क्लेमेन्स आणि जीन एवढीच मंडळी थोड्या वेळापूर्वी पहुडली होती तिथंच त्यांनाहि ठेवण्यांत आलं. जीर्ण शरीरानं प्रवासाचा अंतिम टप्पा गांठला होता पण त्यांतल्या चैतन्याला वार्धक्य केव्हांच ठाऊक नव्हतं. आजहि तो आत्मा तरुण असून थकल्या-भागल्या जगाला आनंद देऊन सुखवीत आहे.

